# THE

# SADVARTANA.

BY

GOVIND SHANKAR SHÂSTRÎ BÂPAT.

SEVENTH EDITION.

( *Registered under Act XXV of 1867.* )



PUBLISHED BY

TUKÂRÂM JÂVAJÎ,

PROPRIETOR OF JAVAJI DADAJI'S "NIRNAYA-SAGAR" PRESS,

Bombay.

1910.

# सद्वर्तन.



हें पुस्तक,

**गोविंद शंकरशास्त्री बापट,**
ह्यांनीं लिहिलें

तें

**मुंबईत,**

**तुकाराम जावजी** यांनी छापवून
प्रसिद्ध केलें.

---

**आवृत्ति सातवी.**

---



---

इ० सन १९१०.



# प्रस्तावना.

इंग्रजींत 'साम्युएल स्माइल्स' या प्रसिद्ध ग्रंथकारानें लिहिलेलें 'क्यारेक्टर' या नांवाचें अत्युत्तम पुस्तक वाचीत असतां अशा प्रकारचें पुस्तक मराठींत असावें असें वाटल्यावरून त्या पुस्तकाच्या आधारानें हें लहानसें पुस्तक लिहिलें आहे. मूळ पुस्तकाच्या मानानें हें फार लहान झालें आहे. मूळ पुस्तकाचा कर्ता उत्तम लिहिणारा असून त्याच्या देशांतील विद्याप्रसार, ऐश्वर्य, उद्योग, इत्यादि गुणांच्या योगानें पाहिजे त्या विषयावर पाहिजे तितकीं उदाहरणें सांपडण्यासारखीं असल्यामुळें तो ग्रंथ फारच उत्तम झाला आहे. ग्रंथसमागम व विवाहमैत्री हे दोन भाग जसे ग्रंथकारानें उदाहरणांनीं खुलवून दिले आहेत, तसे इकडील उदाहरणांनीं करतां येणें कठिण आहे. यामुळें या पुस्तकांतील सर्व भाग सारखे करतां आले नाहींत. पुस्तक तयार झाल्यावर हस्तलेख बऱ्याच विद्वानांनीं पाहिला. पुस्तक चांगलें झालें असून असें पुस्तक असावें असा सर्वांचा अभिप्राय पडला; परंतु कित्येक गोष्टींत मतभेद झाला त्याबद्दल दोन शब्द लिहिणें अवश्य आहे. कित्येकांचें ह्मणणें होतें कीं मूळ पुस्तकांतील बहुतेक सर्व भाग यांत आणावा; परंतु असें करण्यास बऱ्याच अडचणी होत्या. युरोपियन लोकांची देशस्थिति, री-

तमात, आचारव्यवहार, हे अगदीं भिन्न असल्यामुळें त्यांच्या सर्व गोष्टी आपणांस मनोरंजक किंवा अनुकरणीय होतील असें नाहीं. यासाठीं सामान्य रीतीनें सर्वांस लागू असणारा मूळ पुस्तकांतील बराच मजकूर यांत घेतला आहे. हल्लीं आपल्या देशांत नाटकें व कादंबऱ्या यांची जशी बरीच गोडी आहे तशी असल्या ग्रंथांची आहे असें वाटत नाहीं, त्यामुळें पुस्तक मोठें झालें असतां छापून प्रसिद्ध होण्याची अडचणच. मूळ ग्रंथाचा गुणलेश तरी यांत यावा ह्मणून त्यांतील सर्व प्रकारांचे नमुने या पुस्तकांत आणिले आहेत.

मूळ पुस्तकाच्या कर्त्यानें जशीं पूर्वीं होऊन गेलेल्या पुरुषांचीं अनुकरणीय उदाहरणें दिलीं आहेत तशींच विद्यमानकाळीं असणाऱ्या पुरुषांचीं उदाहरणें दिलीं आहेत. कारण डोळ्यांपुढील उदाहरणांचें माहात्म्य विशेष आहे. हीच गोष्ट मनांत आणून आपणांमधील कांहीं प्रसिद्ध पुरुषांचीं नांवें यांत उदाहरणार्थ घातलीं आहेत. युरोपांतील राज्यव्यवस्था, विद्याप्रसार, हीं सुधारणेच्या शिखरास पोंचल्यामुळें तिकडील लोकांस आपल्या आंगचे बुद्धि, विद्या, शौर्य, चातुर्य, इत्यादि गुण दाखविण्याचे प्रसंग येतात, त्यामुळें तिकडे जशीं विद्वान्, बुद्धिमान्, शूर, राज्यधोरणी, अशा पुरुषांचीं अनेक उदाहरणें विद्यमान काळीं आहेत तशीं इकडे नाहींत, यामुळें कालमानाप्रमाणें व देशस्थितीप्रमाणें जीं उदाहरणें अनुकरणीय वाटलीं तीं लिहिलीं आहेत. या गोष्टींतही कित्येकांचा मतभेद झाला. त्यांचें ह्मणणें कीं उदाहरणें सर्वांशीं निर्दुष्ट असावीं. हें ह्मणणें बरोबर नाहीं. सर्वदोषरहित असा मनुष्य कोण आहे? ज्या मनुष्यांमध्यें जे खरे अनुकरणीय गुण आहेत, त्यांची त्यांबद्दल प्रशंसा क-

रणें किंवा त्यांचा कित्ता घेणें योग्य आहे. मूळ ग्रंथकाराचा हाच उद्देश दिसतो. कारण त्यानें ज्यांचीं उदाहरणें दिलीं आहेत ते दोषमात्ररहित होते असें नाहीं. जो गुण जेथें दिसेल तेवढ्यापुरतें तें उदाहरण समजावयाचें. दुसरें कित्ये-कांचें असें ह्मणणें होतें कीं, जीं विद्यमानकालीन उदाहरणें दिलीं आहेत त्यांसारखीं आणखी पुष्कळ आहेत, तीं कां देऊं नयेत? हें ह्मणणें सयुक्तिक नाहीं. कारण उदाहरणें दिक्प्रदर्शनार्थ द्यावयाचीं तीं थोडीं दिलीं ह्मणून बाकी रा-हिलेहीं त्याज्य झालीं असें नाहीं.

'क्यारेक्टर या इंग्रजी शब्दांत बहुत अर्थांचा समावेश होतो यामुळें अर्थानें अगदीं तत्सदृश असा शब्द सांपडणें कठीण. बऱ्याच अंशीं त्यासारखा असा 'सद्वर्तन' हा शब्द वाटला, त्यावरून पुस्तकास हें नांव दिलें आहे.

सद्वर्तनाचे बहुत अवयव आहेत. त्यांपैकीं कित्येकांचें महत्व बहुतांशीं सारखें असल्यामुळें त्यांविषयीं लिहित अ-सतां कित्येक ठिकाणीं मूळ ग्रंथाप्रमाणें या पुस्तकांत एक प्रकारचाच लेख स्वरूपतः किंवा रूपांतरानें भिन्नस्थलीं आला असेल; तथापि अशा ग्रंथांत त्यास पुनरुक्तिदोष ह्म-णतां येत नाहीं हें सुज्ञांच्या ध्यानांत येईलच.

हें पुस्तक लोकप्रिय होऊन परमेश्वरकृपेनें दुसऱ्या आ-वृत्तीचा प्रसंग आल्यास यांत आणखी सुधारणा करतां येईल.

अहमदनगर, १८८०. } **गो. शं. शा. बा.**

# चवथ्या आवृत्तीची प्रस्तावना.

दुसऱ्या आवृत्तीप्रमाणेंच तिसऱ्या आवृत्तींतही विशेष फेरफार केला नसल्यामुळें प्रस्तावना लिहिण्याची गरज पडली नाहीं. प्रस्तुत आवृत्तींत एक मोठा विशेष फेरफार वाचकांच्या दृष्टीस पडेल. तो हा कीं, ठिकठिकाणीं प्रसिद्ध पुरुषांचीं नांवें आलीं आहेत, त्यांपैकीं कित्येकांचीं चित्रें त्या ठिकाणीं घातलीं आहेत. आणखी कित्येकांचीं घालावयास पाहिजे होतीं परंतु तसें करण्यास सवड झाली नाहीं.

आधुनिक ग्रंथसमूह हें पाश्चात्य शिक्षणाचें फल आहे. याकरितां पाश्चात्य ग्रंथसमूहाप्रमाणेंच एतद्देशीय आधुनिक ग्रंथसमूहाच्याही अन्तर्बाह्य स्वरूपांत उत्तरोत्तर सुधारणा होत जाईल यांत संशय नाहीं. वर्णनीय वस्तूंच्या वर्णनापासून जसा वाचकांच्या मनावर, नीतिशिक्षण व मनोरंजन यांचा इष्ट संस्कार होतो तसा त्यांच्या चित्रांच्या अवलोकनानेंही होतो असें पुष्कळांचें मत आहे. यामुळेंच युरोपांतील इतिहासादि गहन विषयांच्या पुस्तकांत सुद्धां चित्रें घालण्याचा परिपाठ आहे. त्याप्रमाणेंच ही चित्रयोजना केली आहे. चित्रें घातलीं तरी किंमत वाढूं नये ह्मणून अक्षरांतराची योजना केली आहे.

विद्यमानकालीं प्राच्यशिक्षणसंस्कार व पाश्चात्यशिक्षणसंस्कार या उभय वीरांचा भारतीयजनचित्तरणभूमीवर मोठा संघर्ष सुरू झाला आहे. अत्यल्प स्थलीं उभयतांचा बरोबरीचा सामना होऊन सल्ला होतो, तथापि बहुत ठि-

काणीं त्यांनीं परस्परांचा न्यूनाधिक पराभव केला आहे. यामुळेंच कधीं कधीं उभयपक्षांमध्यें समाजहितरूपसाध्य एक असूनही साधनाविषयीं मोठा विपर्यास होतो. संमतिवयाच्या कायद्याच्या वेळचा राजे सर टी. माधवराव, रावबहादूर रानडे, यांसारख्या सुशिक्षिताग्रणी लोकांचा मतभेद, सुशिक्षित पदवीधरांनीं चालविलेल्या केसरी व सुधारक या पत्रांचा बहुतेक सर्व गोष्टींमध्यें मतभेद, इत्यादि प्रकार वरील गोष्टींची साक्ष देत आहेत. हीच गोष्ट ग्रंथरचनेस लागू आहे. जो मजकूर एका पक्षास ग्राह्य तोच दुसऱ्यास अग्राह्य होतो, याकरतां उभयसंस्कारांचें योग्य संमेलन करण्याविषयीं यथाशक्ति यत्न केला आहे.

केवळ लोकाश्रयावर थोड्या वर्षांत पुस्तकाच्या चार आवृत्ती निघाल्या अशीं उदाहरणें आधुनिक महाराष्ट्र ग्रंथसमूहांत फारच थोडीं आहेत, त्यांपैकींच हें एक आहे. हीच गोष्ट पुस्तकाच्या गुणाची साक्ष आहे. याकरतां त्याबद्दल आणखी कांहीं लिहिण्याची गरज नाहीं. ज्या जगच्चालकाच्या प्रेरणेनें हें पुस्तक तयार झालें त्याच्याच कृपेनें याचा प्रसार होऊन लोकशिक्षणास उपयोग होवो.

तारीख १५ मे,<br>इसवी सन १८९५

# सद्वर्तन.

## भाग १.

### सदाचरणमाहात्म्य.

यत्कर्म कुर्वतोस्य स्यात्परितोषोन्तरात्मनः ॥
तत्प्रयत्नेन कुर्वीत विपरीतं तु वर्जयेत् ॥ मनुः ॥

**सद्वर्तन** हें मनुष्यास ऐहिक आणि पारलौकिक सुख प्राप्त करून घेण्याचें सर्वांत मोठें साधन होय. सद्वर्तनासारखी मनुष्याच्या अंगांत दुसरी कोणतीही शक्ति नाहीं. इतर प्राण्यांपेक्षां मनुष्य किती श्रेष्ठ आहे, हें सद्वर्तनाच्या योगानें कळतें. सुखाचीं इतर सर्व साधनें असून अंगीं सद्वर्तन नसलें तर सुख व्हावयाचें नाहीं. खरे सदाचरणी असून उद्योगी, प्रामाणिक व उदार असे जे मनुष्य असतात त्यांविषयीं मनुष्यांच्या मनांत आपोआप पूज्यबुद्धि उत्पन्न होते. ते ह्मणतील त्यावर विश्वास ठेवावा व ते वागतील तसें वागावें असें वाटूं लागतें. किंबहुना जगांतील सर्व सद्व्यवहार सदाचरणी मनुष्यांच्याच योगानें चालतात, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. जगांत सदाचारी मनुष्य नसतील तर त्यांत रहाणें नरकवासासारखेंच होईल.

बुद्धिमान् मनुष्यास आपण वाखाणितों, परंतु सदाचरणी मनुष्याविषयीं आपल्या मनांत जी पूज्यबुद्धि उत्पन्न होते ती बुद्धिमानाविषयीं होत नाहीं. बुद्धिमत्ता ही आपोआप प्राप्त झालेली आहे. ती असणें किंवा नसणें हें मनुष्याच्या स्वाधीन नाहीं, परंतु सदाचरण हें मनुष्याच्या स्वाधीन आहे. जगांत बुद्धिमत्तेपेक्षां सदाचरणाचा उपयोग फार होतो. मनुष्याच्या अंगीं जशी बुद्धि, तसे लोकसमुदायांत बुद्धिमान् लोक. तसेंच, मनुष्याच्या अंगीं जसें सदाचरण, तसे लोकसमुदायांत सदाचरणी मनुष्य. बुद्धि-

मानाची लोक प्रशंसा करतात; परंतु सदाचरणी मनुष्याचें अनुकरण करतात.

जगांत मोठे लोक फारच थोडे असतात, व मोठेपणा हाही सापेक्ष आहे. मोठेपणा प्राप्त करून घेण्याचा प्रसंग जगांत फारच थोड्यांस असतो; परंतु आपल्या समजुतीप्रमाणें, प्रामाणिकपणानें व सदाचरणानें वागणें सर्वांच्या स्वाधीन आहे. परमेश्वरानें आपणास दिलेल्या गुणांचा सद्व्यय किंवा अपव्यय करणें हें प्रत्येक मनुष्याच्या स्वाधीन आहे. प्राप्त झालेल्या स्थितीप्रमाणें अत्युत्तम वागणें हें त्याच्या स्वाधीन आहे. कोणतेंही यत्किंचित् काम करावयाचें असलें तरी खरेपणा, सचोटी, प्रामाणिकपणा, विश्वासूपणा हे गुण त्यांत दाखवितां येतील. सारांश, ईशसत्तेनें आपणास जी स्थिति प्राप्त झाली तींत आपलें कर्तव्य बजावणें प्रत्येक मनुष्याच्या स्वाधीन आहे.

आपलें कर्तव्य करणें हे शब्द साधारण दिसतात, पण यांत सदाचरणानें वागून जन्मास आल्याचें साफल्य करणें या गोष्टीचा समावेश होतो. आपलें कर्तव्य करणें यांत मोठें शौर्य दिसत नाहीं; पण शौर्याची गरज जगांत फारच थोड्यांस आहे. आपलें कर्तव्य करण्याकडे मनुष्य नेहमीं लक्ष ठेवील तर त्याची योग्यता वाढेल, इतकेंच नाहीं, तर त्यास संसारांत अनेक विघ्नें यावयाचीं नाहींत. कर्तव्यकर्म प्रत्येक मनुष्याच्या मागें लागलेंच आहे. तें चांगल्या रीतीनें करणें हाच चांगला संसार होय. ज्या सद्गुणांपासून सर्वकाळ संसारांत सुख होतें तेच गुण हितावह होत. त्यांचा उपयोग होऊन ते पुष्कळ दिवस अंगीं रहातात. साधारण सर्व मनुष्यांस ज्यांचें संपादन करितां येत नाहीं, अशा गुणांच्या योगानें मनुष्याची वाखाणणी झाल्यानें तो गर्विष्ठ होऊन दुर्मार्गाकडे वळण्याचें भय असतें. एकाद्या मनुष्याची खरी योग्यता त्यानें केलेल्या ग्रंथावरून किंवा सभेंतील त्याच्या भाषणांवरून किंवा त्यानें मोठमोठीं हुद्द्याचीं कामें केलीं असतील त्यांवरून कळावयाची नाहीं. ती

जाणणें झाल्यास तो आपल्या भाऊबंदांशीं व इष्टमित्रांशीं कसा वागतो, रोजचीं साधारण कामें कोणत्या रीतीनें करतो, तें पाहिलें पाहिजे. इंग्लंदांतील प्रसिद्ध विद्वान् 'लार्द बेकन' यानें तत्त्वज्ञान-प्रतिपादक उत्तम ग्रंथ लिहिले त्यावरून त्यास 'अर्वाचीनतत्त्व-ज्ञानजनक' असें ह्मणतात. त्याचें वर्तन कित्येक प्रसंगीं अत्यंत लज्जास्पद होतें. त्यानें नीतिविषयक उत्तम निबंध लिहिले आहेत, तथापि स्वतः न्यायाधीश असतां तो लांच खात असे.

कर्तव्यकर्माकडे लक्ष असल्यानें संसारांतील हलकींसलकीं कामें सुरळीत चालतात, एवढेंच नाहीं, मोठमोठ्या बिकट प्रसंगीं त्याच्या योगानें धैर्य येऊन मनुष्याचें सद्वर्तन सुटत नाहीं. अशा मनुष्या-जवळ संपत्ति नसेल, विद्या नसेल व त्यास मोठा अधिकारही नसेल; तथापि मनाचें स्थैर्य, सचोटी, सत्य, सद्वर्तन हीच त्याची संपत्ति होय. जो मनोभावानें आपलें कर्त्तव्य करण्यास जपतो, त्या-नेंच आपल्या जन्माचें सार्थकत्व केलें असें ह्मणावें. तोच खरा शूर होय. जगांत असे कित्येक मनुष्य आढळतील कीं, सद्वर्तना-शिवाय त्यांपाशीं कोणतीही संपत्ति नाहीं; तथापि ते तेवढ्यानेंच राजापेक्षांही मोठे आहेत. रामशास्त्री किंवा साक्रेतिस यांसारखे मनुष्य आपणास राजापेक्षां श्रेष्ठ वाटतात, याचें कारण काय?

सद्वर्तनास अंगीं मोठी बुद्धिमत्ता किंवा विद्या असणें आवश्यक आहे असें नाहीं. नीतिशास्त्रकारांनीं सदाचारी मनुष्याचीच योग्यता बुद्धिमत्तापेक्षां जास्त मानिली आहे. भर्तृहरीनें सदाच-रणाची फार प्रशंसा केली आहे.

**या साधूंश्च खलान्करोति विदुषो मूर्खान्हितान्द्वेषिणः**
**प्रत्यक्षं कुरुते परोक्षममृतं हालाहलं तत्क्षणात् ॥**
**तामाराधय सत्क्रियां भगवतीं भोक्तुं फलं वांछितं**
**हे साधो व्यसनैर्गुणेषु विपुलेष्वास्थां वृथा मा कृथाः ॥**

सदाचरणानें सर्व संसारदुःखाचा नाश होतो. विद्या निरर्थक आहे असें नाहीं, परंतु ती सदाचरणयुक्त असली तरच हितावह

होते. कित्येक मोठमोठे विद्वान् दुराचारी असून श्रीमंतांची खुशामत करणारे आणि गरीबांस त्रास देणारे असतात. मनुष्य मोठा विद्वान्, शास्त्री, व्युत्पन्न असा असून नीतिसंबंधानें एकाद्या अडाणी कुळंब्यापेक्षांही हलका मानला जाईल. मद्यपानादिकांच्या संबंधानें ज्यांची अशिक्षित लोक सुद्धां निंदा करतात असे आधुनिक पदवीधर विद्वानांमध्यें थोडे आहेत काय? मनुष्य विद्वान् असूनही त्याच्या अंगीं औदार्य, विचारीपणा, समंजसपणा, व्यवहारज्ञान, सभ्यपणाची रीतभात, हातीं धरलेलें काम तडीस नेण्याचें सामर्थ्य, युक्ति, धैर्य, सत्याची आवड, प्रामाणिकपणा आणि सुस्वभाव हे गुण नसतील; परंतु एकाद्या अविद्वान् दरिद्याच्या अंगीं जर हे गुण असतील, तर तो विद्वानापेक्षांही श्रेष्ठ होय.

इंग्लंदांतील सर वाल्टर स्काट् या विद्वान् गृहस्थाजवळ एकदा कोणी असें ह्मणाला कीं, विद्या व संभावितपणा हे गुण सर्वांत श्रेष्ठ व मान्य होत. यावर सर वाल्टर स्काट् ह्मणाला, हें मत खरें असेल तर जगाची फार वाईट स्थिति होईल. म्यां पुष्कळ ग्रंथ वाचले आहेत, व पुष्कळ विद्वान् लोक पाहिलेही आहेत. त्यांच्याशीं संभाषणही केलें आहे. परंतु मी तुह्मांस खात्रीनें सांगतों कीं संकटांत व दुःखांत असतांही शांतपणानें व धैर्यानें वागणाऱ्या अशा गरीब अशिक्षित मनुष्यापासून सामान्य गोष्टींच्या प्रसंगानें मीं पुष्कळ सुविचार ऐकिले आहेत. अंतःकरण सुशिक्षित झाल्याशिवाय सर्व गोष्टी गुलाम्यासारख्या आहेत, हें कळल्याशिवाय आपणास सदाचरणाचें स्वरूप कळणार नाहीं.

सद्वर्तन चांगलें ठेवण्यास द्रव्य जवळ असलें पाहिजे असें कित्येकांस वाटतें, परंतु संपत्तीचा आणि सदाचरणाचा काडीमात्र संबंध नाहीं. उलटें बहुत वेळ असें आढळतें कीं, संपत्तीच्या योगानेंच मनुष्याचें सदाचरण सुटतें. संपत्ति आणि दुराचरण, सुखोपभोग आणि दुर्गुण, यांचा एकत्र वास बहुत ठिकाणीं आढळतो. असमंजस व अजितेंद्रिय अशा मनुष्यांच्या हातीं संपत्ति असली तर ती त्यांस संकटांत पाडण्यास कारण होते. तिजपासून ते स्वतःचा व

आपल्या इष्टमित्रांचा नाश करून घेतील. जगांत जे मोठे उत्तम सदाचरणी मनुष्य दृष्टीस पडतात, ते बहुशः गरीबच असतात. उद्योग, मितव्यय, हुशारी, धैर्य हीच खरी संपत्ति होय.

सदाचरणाचें अत्युत्तम उदाहरण हें पुस्तक लिहिणाराच्या डोळ्यांपुढें आहे, तें पुण्यांतील माजी वेदशास्त्रसंपन्न केशवशास्त्री नेने यांचें होय. शास्त्रीबावा एवढे विद्वान् असून जन्मभर गरीबींत होते, तरी त्यांच्या सद्वर्तनाची स्तुति करावी तेवढी थोडीच. त्यांचें दर्शन झाल्याबरोबर पहाणाऱ्यास हे पुराणांत वर्णिलेल्या ऋषींसारखे कोणी ऋषीच आहेत असें वाटे. कसाही मनुष्य असला तरी त्यांच्या समागमीं राहिल्यावर त्याचें चित्त सदाचरणाकडे वळल्याशिवाय राहूंच नये असें त्यांचें स्वतःचें वर्तन असे. विद्येचा उपयोग ह्मटला ह्मणजे सत्याचें ज्ञान होय; हें शास्त्रीबावांचें दृढ मत होतें, त्यामुळें ते व्याकरण व न्याय या शास्त्रांत प्रवीण असतांही शुष्कवादांत कधीं पडले नाहींत. सत्यपालनाविषयीं हे फार झटत असत. हे बाह्य डामडौल करीत नसत; त्यामुळें फार थोड्या लोकांस यांची खरी माहिती होती, तथापि ज्यांस हे ठाऊक होते त्यांची यांविषयीं मोठी पूज्यबुद्धि असे. मोठमोठ्या श्रीमान् लोकांचा देखील यांवर इतका विश्वास असे कीं त्यांच्या घरांत पितापुत्र, भाऊभाऊ, नवराबायको, यजमान व कारभारी यांमध्यें कांहीं कारणानें गैरसमज झाला तर उभयतांनीं ह्मणावें कीं शास्त्रीबावांस पुसूं, ते सांगतील तें प्रमाण! शास्त्रीबावांच्या बोलण्यांत व कृतींत कधींही फेर पडला नाहीं.

चांगली अब्रू हीच मनुष्याचें ऐश्वर्य आहे. हिच्यासारखी खरी संपत्ति कोणतीच नाहीं. हिच्या योगानें पाहिजे ती वस्तु मिळेल असें नाहीं, परंतु जें कांहीं मिळेल त्याची योग्यता मोठी आहे. उद्योगी, सद्गुणी, सज्जन अशांसच जगांत श्रेष्ठ मानणें योग्य आहे. लबाडीपेक्षां खरेपणाचा संसारांत सतत उपयोग होतो. त्यापासून अंतःकरण स्वस्थ असतें. त्याच्या योगानें मनुष्य सदाचरण सोडीत नाहीं. त्याच्या योगानें मनुष्याच्या अंगीं धैर्य व सरळपणा येऊन

तो उद्योगी होतो. श्रीमान् किंवा विद्वान् होणें मनुष्याचें कर्तव्य नाहीं, पण खरेपणानें वागणें हें प्रत्येक मनुष्याचें कर्तव्य आहे.

सदाचरण करण्यास केवळ प्रामाणिकपणाच अंगीं असला ह्मणजे पुरे आहे असें नाहीं. सर्वकाळ कांहींतरी सत्कार्य करण्याचा उद्देश बाळगून तो खरेपणानें, सचोटीनें व धैर्यानें तडीस नेण्यास झटलें पाहिजे. गलबत समुद्रांत तरण्यासारखें असलें तरी त्यास सुकाणू नसलें तर तें कोठेंतरी जाईल. त्याचप्रमाणें मनुष्याच्या मनांत निरंतर सत्कार्य करण्याचा उद्देश असल्याशिवाय त्याचें सद्वर्तन कायम रहाणार नाहीं. सत्कार्याचा उद्देश हाच लोककल्याणाचा मार्ग असून दुर्गुण व अव्यवस्था यांचा शत्रु आहे.

जगांत बुद्धिमत्ता किंवा विद्वत्ता फारच थोड्यांच्या अंगीं असते असें नाहीं. परंतु केवळ बुद्धिमत्तेनेंच लोक मोठेपणास पावले आहेत काय ? ज्या बुद्धिमानांच्या अंगीं खरेपणा व सत्कार्य करण्याचा उद्देश होता, तेच श्रेष्ठत्वास पावले. रामशास्त्रीबुवा, शिवाजी महाराज, यांसारखे पुरुष सत्कार्य करण्याच्या उत्कट इच्छेशिवाय केवळ बुद्धिमत्तेनें लोकपूज्य झाले असते काय? मार्टिन् लूथर हा अगदीं गरीब होता. कधीं कधीं तर त्याला श्रम करून निर्वाह करावा लागे. तथापि तो मनानें बळकट असल्यामुळें जर्मनींतील सर्व राजांपेक्षां लोकांस मान्य झाला. खरेपणाच्या योगानेंच मनुष्य जगांत पूज्य होऊन लोकांविश्वासास पात्र होतो. सत्य हा मनुष्याच्या चांगुलपणाचा



शिवाजी महाराज.

पाया होय. तो मनुष्याच्या आचरणांत दिसून येतो. खरेपणा मनुष्याच्या प्रत्येक शब्दांत व कृतींत दिसून येतो. त्याच्या योगानें आपल्या ठिकाणीं लोकांचा विश्वास उत्पन्न होतो. हा जसा बोलेल तसें करील, व जें करतों ह्मणेल तें केल्याशिवाय कधीं रहाणार नाहीं, अशी लोकांची खात्री असते. त्याच्या योगानें मनुष्याची पत वाढते; पत वाढणें हा जगांत लहान लाभ आहे असें नाहीं. पतीमुळेंच जगांत मनुष्याची योग्यता वाढते. संसारकृत्यांत किंवा इतर व्यवहारांत जसा सद्वर्तनाचा उपयोग होतो, तसा बुद्धीचा होत नाहीं. सरळपणा, मनोनिग्रह, सहनशीलता, व्यवस्थितपणा, विचारशीलता ह्या गुणांचा व्यवहारांत उपयोग होतो तसा विद्येचा किंवा बुद्धीचा होत नाहीं. समंजसपणा व खरेपणा हे दोन गुण संसारांत व व्यवहारांत मुख्यत्वें हितावह आहेत. अनुभव आणि सौजन्य यांहींकरून युक्त जो समंजसपणा त्याचेंच नांव शहाणपण. वास्तविक विचार करितां शहाणपणा व चांगुलपणा हे गुण भिन्न आहेत असें नाहीं. बहुशः ते एकत्रच वास करतात. किंवा एक दुसऱ्यास आपल्याजवळ आणतो. जसा शहाणपणानें मनुष्य चांगला होतो तसाच चांगुलपणानें शहाणा होतो.

सदाचरणानें मनुष्याचें लोकांत वजन उत्पन्न होतें. हा खरा मनुष्य आहे अशी खात्री असल्यास लोक त्यास वचकतात. विद्वानासारखा सदाचरणी मनुष्याचा लौकिक भराभर वाढत नाहीं, तरी त्याचा चांगुलपणा लोकांस कळल्याशिवाय रहात नाहीं. त्याच्या चांगुलपणास कित्येक लोक नांवें ठेवतील, कित्येकांस त्याचे गुण समजणार नाहींत, दुःख व दारिद्र्य यामुळें त्याचा मोठेपणा लोकांस दिसणार नाहीं, तथापि कधीं तरी त्याची खरी योग्यता कळल्याशिवाय रहाणार नाहीं. मुंबईत दुसवाडींतील राममंदिराचे संस्थापक हरिबावा हे वर सांगितल्या प्रकारचे सदाचरणी मनुष्य होते. वय लहान असतांच त्यांचे वडील वारले. वडील वारल्याबरोबर वडिलांच्या शत्रूंनीं हरिबावांस पीडा देण्यास आरंभ

केला. त्यांवर अनेक संकटें आलीं, तथापि त्यांचें पाऊल सन्मार्गापासून तिळमात्र ढळलें नाहीं, यामुळें थोड्याच वेळांत ते लोकमान्य झाले.



हरिबावा.

एके समयीं एक मोठा श्रीमान् वकील एपिक्तेतस नांवाच्या तत्त्वज्ञाच्या भेटीस गेला असतां ह्मणाला आपलीं कांहीं मतें ऐकावीं अशी इच्छा आहे. हा सद्भावानें विचारीत नाहीं असें समजून एपिक्तेतस ह्मणाला, तुह्मी माझ्या भाषणावर टीका मात्र कराल; त्याचें तात्पर्य जाणण्याची तुह्मांला मुळींच गरज नाहीं. हें

ऐकून वकील ह्मणाला, तुह्मी ह्मणतां तसा वागूं लागलों तर मी तुह्मांसारखा भिकारी मात्र होईन; मग अलंकारभूषणें, संपत्ति, जहागीर हीं कोठून मिळणार ? यावर एपिक्तेतस ह्मणाला, मला यांची गरजच नाहीं. एकंदरींत तुह्मी मजपेक्षां भिकारी आहां. मला कोणाचा आश्रय असो किंवा नसो, मला कोणाची गरज नाहीं, तुह्मांला गरज आहे. मी तुह्मांपेक्षां श्रीमान् आहें. राजाला मजबद्दल काय वाटतें याची चौकशी मी करित नाहीं. मी कोणाची खुशामत करित नाहीं; हीच माझी संपत्ति. तुह्मांजवळ संपत्ति आहे परंतु लोभामुळें ती असूननसून सारखीच. माझें मन हेंच माझें राज्य. तुमच्या दगदगीपेक्षां तत्त्वविचारांत माझा वेळ चांगला जातो. तुमचें ऐश्वर्य तुह्मांला थोडें वाटतें; माझें मला पुष्कळ वाटतें. तुह्मी अतृप्त आहां; मी संतुष्ट आहें.

भर्तृहरीनें असेंच ह्मटलें आहे:—

**वयमिह परितुष्टा वल्कलैस्त्वं दुकूलैः**
**सम इह परितोषो निर्विशेषो विशेषः ॥**
**स तु भवति दरिद्रो यस्य तृष्णा विशाला**
**मनसि हि परितुष्टे कोऽर्थवान् को दरिद्रः ॥ १ ॥**

**अर्थ**—आह्मी वल्कलांनीं संतुष्ट आहों, तूं उंची वस्त्रांनीं संतुष्ट आहेस. दोघांला संतोष सारखाच, याकरितां भेद राहिला नाहीं. ज्याला लोभ मोठा तो दरिद्री; मन संतुष्ट असल्यावर श्रीमंत कोण व दरिद्री कोण ?

इंग्लंद देशांत शेरिदन या नांवाचा एक विद्वान् वक्ता होऊन गेला. तो फार उधळ्या, व्यसनी, अव्यवस्थित असल्यामुळें त्याची योग्यता वाढावी तशी वाढली नाहीं. एके दिवशीं त्याचा चाकर पगाराची बाकी मागूं लागला. तो मला पैसे आज पाहिजेतच असें ह्मणाला; तेव्हां शेरिदन ह्मणाला, आपली योग्यता विसरून फाजील बोलूं नको. त्यावर तो गरिब मनुष्य ह्मणाला 'महाराज, नाहीं बरें, नाहीं, मी आपली योग्यता विसरलों नाहीं; तुमच्या व माझ्या-

मधला भेद मला पूर्णपणें माहीत आहे. मोठ्या कुलांत उत्पन्न होणें, विद्या, या गोष्टींनीं तुह्मी मजपेक्षां श्रेष्ठ आहां; पण व्यवहार, वागणूक, स्वभाव यासंबंधानें मी तुह्मांपेक्षां श्रेष्ठ आहें.'

शेरिदन याच्या वेळचाच महापंडित व वक्ता बर्क याचें आचरण अगदीं वेगळें. विलक्षण उद्योगानें व अप्रतिम सदाचरणानें या महात्म्यानें आपलें नांव इंग्लंदाच्या इतिहासांत अमर केलें आहे.

अंगीं सदाचरण बिंबण्यास लहानमोठीं पुष्कळ कारणें आहेत. चांगले किंवा वाईट गुण लावणाऱ्या पुष्कळ गोष्टी घडतात. यःकश्चित् क्षुल्लक गोष्ट असली तरी तिजपासून कांहीं तरी परिणाम घडतोच. प्रत्येक कृति व प्रत्येक विचार यांचा मनुष्याच्या समजुतीशीं संबंध असतो, त्यामुळें त्यांच्या योगानें त्याच्या पुढील वर्तनांत फेर पडतो. अशा रीतीनें मनुष्याचें वर्तन नेहमीं चांगलें किंवा वाईट होत असतें. सत्कर्म करित असलें ह्मणजे त्याचीच आवड उत्पन्न होते. असेंच दुर्वर्तनाचेंही आहे. सत्कर्म किंवा दुष्कर्म करणें हें मनुष्याच्या स्वाधीन आहे. याकरितां आपणास मोठेपणा किंवा लहानपणा आणणारा ज्याचा तोच आहे. ह्मणून गीतेमध्यें 'आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः'[१] असें ह्मटलें आहे.

अंगीं उत्तम वर्तन बिंबणें हें प्रयत्नाशिवाय घडावयाचें नाहीं. तें साधण्यास नेहमीं जितेंद्रिय राहून लक्षपूर्वक व्यवस्थितपणानें वागलें पाहिजे. असें करित असतां अनेक विघ्नें येतील. पुष्कळ वेळ आपल्या हातून चुकाही घडतील. पुष्कळ वेळ मन हें उनाड गुराप्रमाणें दुर्मार्गाकडे जाऊं लागेल, त्याचें आकलन करण्याचें फार कठिण पडेल, तथापि दृढनिश्चय धरला असतां इतक्यांसही हटवून टाकतां येईल. चांगुलपणा वाढविण्याची जों जों अधिकाधिक उमेद धरावी तों तों केलेला प्रयत्न कठिण वाटत नाहींसा होतो. पूर्ण चांगुलपणा येण्यास उशीर लागला तरी

१ आपला मित्र आपणच व आपला शत्रु आपणच.

दिवसेंदिवस त्याची वृद्धि झाल्याशिवाय रहाणार नाहीं. जगांत जे मोठे अनेक लोक उत्पन्न झाले, ज्यांनीं देह त्यागून मागें सत्कीर्ति ठेविली आहे, अशांचीं उदाहरणें आहेत त्यांस अनुसरणें हें प्रत्येक मनुष्याचें कर्तव्य आहे. एक श्रीमंत झाला ह्मणून दुसऱ्यास श्रीमंत होतां येईलच याचा नेम नाहीं. एकानें मोठ्या हुद्द्याची जागा मिळविली ह्मणून दुसऱ्यास मिळवितां येईलच असा नियम नाहीं. एक मोठा विद्वान् झाला असतां त्याप्रमाणें दुसऱ्यास खचित होतां येईल असें नाहीं. एकाचें लोकांत वजन वाढलें ह्मणजे दुसऱ्याचें वाढेलच असें नाहीं. तथापि एकाचें धैर्य पाहून दुसऱ्यास धैर्य धरितां येईल. एक कसा प्रतिष्ठेनें वागतो हें पाहून दुसऱ्यास वागतां येईल. एकाचे सद्गुण दुसऱ्यास धरतां येतील. एकाचा खरेपणा व सचोटी हे गुण पाहून दुसऱ्यास ते धरतां येतील.

लहानपणीं मुलांस गोष्ट सांगत असतात ती तात्पर्याच्या संबंधानें ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. बापानें एका वेळीं दोघां मुलांस दोन मक्याचे दाणे दिले. एकानें लागलाच आपला तोंडांत टाकून खाऊन टाकला. दुसऱ्यानें तो मातींत लावून त्याला पाणी घालून त्याचें झाड केलें. त्यावर कणिस आल्यावर पुनः त्याचे दाणे पेरून मक्याचें शेत केलें, हीच गोष्ट मनुष्यांच्या वागणुकीस लागू आहे. ज्यांचें बुद्धिबल व अंगबल सारखें असून स्थितींत पुष्कळ भेद आहे अशीं पुष्कळ मनुष्यें जगांत दृष्टीस पडतात, त्याचें कारण हेंच कीं जे उद्योग करून आपलें बल सत्कर्माकडे लावितात त्यांचा उदय होतो, व जे आळसानें दुर्मार्गाकडे वळतात त्यांची हानि होते.

जें आपणास करावयाचें तें प्रामाणिकपणानें, सचोटीनें व शहाणपणानें मनुष्य करूं लागला ह्मणजे लोकांत त्याचें सदाचरण दिसून येतें. मनुष्य धार्मिक, नीतिमान् व शहाणा असला ह्मणजे लोकांस तेव्हांच त्याचें सदाचरण दिसून येतें. अशा मनुष्यास कीर्तीपेक्षां आपलें कर्तव्य करणें हेंच अधिक महत्त्वाचें वाटतें.

लोकांच्या स्तुतीपेक्षां आपल्या अंतःकरणाच्या समाधानापासून त्यास विशेष आनंद होतो. सदाचरणी मनुष्य लोकांचा मान राखतो, तथापि त्याच्या अंतःकरणास चांगलें वाटेल तें करण्यास तो भीत नाहीं. एकादें चांगलें कृत्य भोंवतालच्या लोकांस आवडलें नाहीं तरी पुढें याची प्रशंसा झाल्याशिवाय रहाणार नाहीं, असें मनांत बाळगून तो तें करण्यास धैर्यानें पुढें सरसावतो.

मनुष्याच्या अंगीं सदाचरण बिंबण्यास भोंवतालीं सदाचरणी मनुष्यांचीं उदाहरणें पाहिजेत हें खरें, तथापि सदाचरण न सोडण्याचा निश्चय स्वभावतः मनुष्याच्या मनांत उद्भवला पाहिजे. असें असलें तरच मनुष्याचें सदाचरण सुटणार नाहीं. मनुष्याच्या अंगीं स्वतःचा दृढनिश्चय नसल्यास तो जसा चांगल्या उदाहरणांनीं चांगला होतो, तसा वाईट उदाहरणांनीं वाईटही होईल. अंतःकरणाचा दृढनिश्चय हें सदाचरणवृक्षाचें मूळ होय; व शहाणपणा हा त्याचा विस्तार होय. हीं दोन्हीं अंगीं असलीं तर मनुष्याचें जीवित्व सदाचरणरूप नदीच्या स्वच्छ प्रवाहानें सर्वांस सुखी करील. हीं नसलीं तर डबक्यांतील पाण्याप्रमाणें त्यांत दुराचरणरूप किडे पडून दुर्गंधाची लोकांस पीडा करून तें लवकरच सुकून जाईल.

अंगीं दृढनिश्चय असून सत्कार्य करण्याचा उद्देश असला ह्मणजे मनुष्य कितीही निर्बल असला तरी तो आपलें कर्तव्य करण्यांत भीत नाहीं. हेंच मनुष्यत्वाचें उत्तम व खरें स्वरूप होय. असा मनुष्यच मनुष्य या शब्दाचा खरा अर्थ होय. याच्याच योगानें पशु आणि मनुष्य यांत भेद काय, हें कळतें. अशा मनुष्याच्या आचरणाच्या उदाहरणानें जगांत पुष्कळ लोकांचा फायदा होतो. शंकराचार्य, गौतमबुद्ध, रामदास, तुकाराम, साक्रेतिस, लूथर यांसारखे जगांत जे धर्मप्रवर्तक व नीतिप्रवर्तक झाले, त्यांजपाशीं एवढेंच साधन होतें. मोठाल्या लढाया मारून देखील न होणारीं कार्यें केवळ त्यांच्या भाषणानेंच झालीं.

अंगीं उत्साह व धैर्य असून अंतःकरणांत सत्य, दया वगैरे गुण नसतील तर त्यापासून नफा न होतां उलटें फार नुकसान होईल. ज्याच्या अंगीं चांगुलपणा नाहीं त्यास धैर्यादि गुण नसलेले बरे. ते असले तर मनुष्याचा दुष्टपणा मात्र वाढतो. यामुळेंच तैमुरलंग, जुलियस् सीझर, नेपोलियन बोनापार्त यांसारखे, लाखों माणसांची प्राणहानि करणारे, पुरुष जगांत उत्पन्न झाले. सद्गुणी मनुष्याच्या उत्साहापासून लोकांस पुष्कळ उपयोग होतो. आपलें कर्तव्य कोणत्या रीतीनें उत्तम बजाविलें जाईल, याकडे नेहमीं त्याचें लक्ष असतें. तो सर्वकाळ लोकांशीं व इष्टमित्रांशीं सचोटीनें वागतो. त्याच्या बोलण्यांत व कृतींत नेहमीं प्रामाणिकपणा असतो. तो आपल्या शत्रूंशीं सुद्धां औदार्यानें वागतो, व अशक्तांवर दया करतो. अशा मनुष्याची कीर्ति झाल्याशिवाश रहात नाहीं. पहा, पुण्यांतील माजी सावकार दयाराम आत्माराम ह्मणजे मोठा राजा किंवा संस्थानिक होता असें नाहीं; किंवा त्यानें सर जमशेटजी जिजीभाई यांसारखीं अनेक धर्मकृत्यें केलीं असेंही नाहीं, पण केवळ प्रामाणिकपणानेंच त्याची कीर्ति वाढली. सरकारच्या भावावर विश्वास नाहीं असा दयारामाच्या पेढीवर लोकांचा विश्वास असे. दयारामाच्या पेढीवरील पैसा लोक आपल्या पेटींत ठेविल्यापेक्षां सुरक्षित समजत. त्याच्या येथें पैसा ठेविल्यानें कोणत्याही कारणानें नुकसान झालें हें कोणासही माहीत नाहीं. एकाद्याच्या बायकोच्या किंवा मुलाच्या नांवानें पेढीवर पैसा ठेविलेला असून त्याकडे बाकी थकली तरी दयारामानें तो पैसा बाकींत वळवून घेतला नाहीं. हुंडी स्वीकारल्यावर हुंडी देणाराचें दिवाळें निघाल्याची बातमी ऐकिली तरी पैसा देण्यास त्यानें हरकत केली नाहीं; अशी त्या दुकानाची सचोटी होती. मुनिमाच्या मूर्खपणानें ती सचोटी मोडतांच दिवाळें वाजून हजारों लोकांचें नुकसान झालें, व त्यानें मिळविलेली कीर्ति व्यर्थ गेली.

फॉक्स या नांवाचा एक प्रसिद्ध वक्ता व मुत्सद्दी पुरुष इंग्लं-

दांत होऊन गेला. त्याच्या चांगुलपणाची एक चमत्कारिक गोष्ट लिहिलेली आहे. त्यास औदार्याची व प्रामाणिकपणाची मोठी आवड असे. त्यास एका सावकाराचे बरेच पैसे देणें होतें. एके दिवशीं तो सावकार दस्तऐवज हातीं घेऊन फॉक्स याच्या घरीं आला, तेव्हां फॉक्स सोन्याचीं नाणीं मोजीत होता. हें पाहून सावकार त्यास ह्मणाला, त्यांतूनच माझे पैसे द्या. यावर फॉक्स ह्मणाला, हे पैसे मला शेरिदान यास द्यावयाचे आहेत. त्याचें कर्ज हातावरचें आहे, माझें बरेंवाईट झालें तर त्याजवळ कांहींएक पुरावा रहाणार नाहीं. हें ऐकून सावकार ह्मणाला, असें असेल तर माझेंही कर्ज मी हातावरचें करतों. असें ह्मणून लागलाच त्यानें तो दस्तऐवज फाडून टाकिला! हें पाहून फॉक्स यास मोठें आश्चर्य वाटलें. आपणावर इतका विश्वास ठेविल्याबद्दल सावकाराचे उपकार मानून तो त्यास ह्मणाला, असें आहे तर शेरिदान याचें कर्ज मागून देईन, कारण तुमचें कर्ज त्याच्या अगोदरचें आहे. असें बोलून त्यानें त्याचें कर्ज तत्काळ फेडलें!

सदाचरणी मनुष्य नेहमीं ईश्वराला भिऊन वागतो. कामकाज, बोलणेंचालणें वगैरे कोणत्याही गोष्टींत तो खोटसाळपणा करित नाहीं. असे पुष्कळ मनुष्य जवळ असल्याशिवाय राजासही मोठालीं कामें करतां यावयाचीं नाहींत. असे खरेपणानें झटणारे विश्वासू मोठाले लोक मिळाल्यामुळेंच शिवाजीस गोब्राह्मणांस यवनांपासून सोडविण्याचा यत्न करतां आला.

सदाचरणी मनुष्य चांगल्या गोष्टीस सर्वदा मान देतो. त्याची आपल्यापूर्वीं होऊन गेलेल्या व आपल्या वेळेस असलेल्या चांगल्या मनुष्यांविषयीं पूज्यबुद्धि असते. सत्कृत्यें, सद्विचार, सद्धेतु, यांकडे सर्वकाळ त्याचें लक्ष असतें. असा एक मनुष्य कुटुंबांत असला ह्मणजे कुटुंब जसें सुखी होतें, त्याप्रमाणेंच असे पुष्कळ पुरुष देशांत असले ह्मणजे देश सुखी होतो. असे मनुष्य असल्याशिवाय विश्वासाचीं व सचोटीचीं कामें चालावयाचीं नाहींत. दे-

शांत शांतता राहून रीतीभातींत सुधारणा व्हावयाची नाहीं. लोक सन्मार्गप्रवृत्त व्हावयाचे नाहींत. सदाचरण हा धर्मशब्दाचाच अपरपर्याय आहे. त्याच्या योगानें मनुष्यांमध्यें परस्परांत प्रेम आणि ईश्वरभक्ति हीं वाढतात.

स्वतःचा दृढनिश्चय हें सदाचरणाचें मूळ होय. तो जेथें आहे तेथें सर्व कांहीं आहे. तो नाहीं ह्मणजे कांहींच नाहीं. 'निश्चयाचें बळ, तुका ह्मणे तेंचि फळ.'

भर्तृहरीनेंही ह्मटलें आहे:—

**प्रारंभ्यते न खलु विघ्नभयेन नीचैः**
**प्रारभ्य विघ्नविहता विरमंति मध्याः ।**
**विघ्नैः पुनः पुनरपि प्रतिहन्यमानाः**
**प्रारब्धमुत्तमजना न परित्यजंति ॥ १ ॥**

दृढनिश्चयी मनुष्य स्वतःच सत्कृत्यें किंवा महत्कृत्यें करतो असें नाहीं. तो आपल्या बरोबर इतरांसही चांगल्या कामास लावतो. त्याच्या प्रत्येक कृत्यापासून लोकांस उत्साह, स्वातंत्र्य, स्वपराक्रम, इत्यादिकांचा कित्ता मिळतो. त्यामुळें लोक आपल्या आपण त्याची कीर्ति गाऊं लागतात. शिवाजी, थोरले बाजीराव, रामदास, तुकाराम, रामशास्त्री, वगैरे मोठ्या मनुष्यांची कीर्ति केवळ त्यांच्या गुणांमुळेंच चिरस्थायी झाली आहे.

एक मनुष्य मोठा पराक्रमी असला तर त्याच्या उदाहरणानें देशांत अनेक मोठे पुरुष उत्पन्न होतात. एकट्या शिवाजीच्या योगानें मराठ्यांमध्यें अनेक शूर सरदार उत्पन्न झाले. पराक्रमी पुरुषांच्या महत्कृत्यांचा ठसा लोकांच्या मनावर उठल्याशिवाय रहात नाहीं. तुंबळ युद्धामध्यें एकाद्या पक्षाचा पराभव होण्याचा प्रसंग आला

१ विघ्नें येतील ह्मणून हलके लोक काम आरंभितच नाहींत; मध्यम असतात ते विघ्नें आलीं ह्मणजे सोडून देतात; उत्तम असतात ते विघ्नें पुनः पुनः आलीं तरी आरंभिलेलें कार्य सोडीत नाहींत.

असून केवळ एका शूराच्या प्रोत्साहानानें सर्व सैन्यास नवा दम येऊन त्यानें शत्रूंचा पराभव केला अशीं उदाहरणें इतिहासांत पुष्कळ आहेत. शिवाजी जवळ असला ह्मणजे कितीही मुसलमान असले तरी मावळ्यांस त्यांचें भय वाटत नसे. नेपोलियन बोनापार्तीच्या चरित्रांत अशीं उदाहरणें पुष्कळ आहेत. सैन्याचें धैर्य खचलें जसतां त्यानें एकदा वर पाहिलें कीं सर्वांस पहिल्यासारखा पुनः धीर येई. केवळ त्याच्या उदाहरणानें त्या वेळेस फ्रान्स देशांत अनेक महाशूर उत्पन्न झाले. अमेरिकेंतील प्रसिद्ध पुरुष **वाशिंग्तन** याचेंही असेंच असे. केवळ त्याच्या नांवानेंच मोठालीं कार्यें होत. तो राज्यकारभार सोडून बसल्यावर पुष्कळ वर्षांनीं अमेरिकेस फ्रान्स देशाशीं लढाई करण्याचा प्रसंग आला, तेव्हां त्या वेळच्या मुख्य कारभाऱ्यानें वाशिंग्तन यास लिहिलें कीं, "तुह्मी परवानगी द्याल तर आह्मी सैन्याच्या पटावर



जार्ज वाशिंग्तन.

पुनः तुमचें नांव घालतों; कारण तुमच्या नांवानेंच जें काम होईल, तें मोठाल्या सैन्यांनीं देखील व्हावयाचें नाहीं." एके समयीं वाशिंग्तन राज्यकारभार सोडून घरीं स्वस्थ बसणार होता, तेव्हां एका गृहस्थानें त्यास आपलें काम न सोडण्याविषयीं आग्रहपूर्वक पत्र लिहिलें. त्यांत असें लिहिलें कीं, "सर्वांचा विश्वास तुह्मांवर आहे. राज्यकारभाराचें सुकाणूं तुमच्या हातांत असलें ह्मणजे लोकांमध्यें बखेडा किंवा फुटाफूट होण्याचें भय नाहीं. एकाद्या

मनुष्याचें सद्वर्तनच असें असतें कीं, लोकांच्या सुखाकरितां त्यास स्वतःचें सुख एकीकडे ठेवून त्यांच्या आशीर्वादापासूनच समाधान मानून घ्यावें लागतें. तुमची स्थिति अशीच आहे; याकरितांच तुमच्यासारखा सत्पुरुष ईश्वरानें उत्पन्न केला असें ह्मटलें पाहिजे. त्यामुळेंच अशा गोष्टी घडून आल्या. मी आपल्या स्वतःच्या किंवा दुसऱ्याच्या काळजीकरितां तुह्मांस आपली इच्छा एकीकडे ठेवण्याचा आग्रह करतों असें नाहीं. कारण तसें करण्यास आह्मांस हक्क नाहीं. पण वर सांगितलेल्या कारणाकरितां मी तुह्मांस राजीनामा न देण्याचा आग्रह करतों."

संसारांतील कोणत्याही गोष्टीविषयीं असेंच आहे. सज्जन असतात ते आपल्या सद्वर्तनानें पुष्कळांस सन्मार्ग दाखवितात. घरचा मुख्य धनी चांगला असला तर घरांतील सर्व माणसें चांगलीं वागतात. मुख्य कामदार प्रामाणिक असला तर हाताखालचे आपोआप प्रामाणिक होतात. रामशास्त्र्याचें पेशव्यांचे दरबारीं केवढें वजन असे! थोरल्या माधवरावांच्या वेळेस सर्व कामदार आपापलें काम जपून फार उत्तम रीतीनें करीत असत.

खरे सत्पुरुष असतात ते जीवंत असतांच लोकांस शिक्षण देतात असें नाहीं; तर मरणोत्तर सुद्धां केवळ त्यांच्या नांवानें मोठमोठालीं कृत्यें होतात. त्यांच्या नाशवंत शरीरांचा नाश झाला तरी त्यांचीं कृत्यें अजरामर होतात. त्यांच्या योगानें पुढील लोकांच्या कृत्यांस वळण प्राप्त होतें. असे पुरुषच खरी सुधारणा करणारे होत. उच्चस्थानीं ठेविलेला दीप जसा चोहोंकडे प्रकाश पाडतो, त्याप्रमाणें ते आपल्या सद्वर्तनाच्या ज्योतीनें मनुष्यांचीं अंतःकरणें सतत प्रकाशित करतात.

सत्पुरुषांविषयीं सर्वांच्या मनांत पूज्यबुद्धि उत्पन्न होते, हें स्वाभाविकच आहे. ते आपल्या देशाचे हितकर्ते असून पुढें उत्पन्न होणाऱ्या माणसांचे शिक्षकही होतात. त्यांच्या उदाहरणांचा सर्वांस सारखा उपयोग होतो. त्यांचीं महत्कृत्यें व सद्विचार हीच त्यांनीं सर्वांस दिलेली उत्तम देणगी होय. हे पूर्वीं होऊन गे-

लेल्या व पुढें होणाऱ्या लोकांचे मध्यस्थ होऊन पुढील काल अधिक सुखाचा होण्यास कारण होतात. नीति व सद्वर्तन वाढवून सदाचरणाकडे लोकांची प्रवृत्ति करतात.

'देह त्यागितां कीर्ति मागें उरावी' हेंच मनुष्याचें अमरत्व होय. सत्पुरुषांच्या मुखांतून आलेलें वाक्य शेंकडों वर्षें लोकांच्या मनांत राहून त्याच्या योगानें त्यांच्या मनांस चांगलें वळण लागतें. शंकराचार्य, मध्वमुनि, इत्यादिक धर्मप्रवर्तकांचा लोकांच्या मनावर केवढा अंमल आहे! दादोजी कोंडदेव मरून गेला, पण त्यानें शिवाजीस केलेल्या उपदेशापासून देशांत केवढी उलटापालट झाली! एका महंमदाच्या उद्योगानें सर्व जग हालून गेलें! एका लूथरानें सर्व युरोपखंडांत धर्मांतर केलें! तुकारामाचे अभंग व रामदासाचे श्लोक लाखों लोकांनीं गाइले आहेत, व त्याच्या योगानें हजारों लोकांचें अंतःकरण भक्तिरसानें द्रवलें आहे! महाराष्ट्रदेशांतील लोकांच्या वर्तनास या साधूंच्या वचनांचें केवढें वळण आहे! ज्ञानोबा महाराजांनीं तर महाराष्ट्र देशांत लक्षावधि भक्त उत्पन्न केले! साक्रेतिस, प्लेतो, सिनिका, आरिस्तातल, सिसरो वगैरे प्राचीनकाळीं युरोपखंडांत होऊन गेलेल्या सत्पुरुषांच्या भाषा देखील हल्लींच्या युरोपांतील भाषांहून अगदीं वेगळ्या



आरिस्तातल.

होत्या, तथापि त्यांनीं आपल्या भाषेंत लिहून ठेवलेल्या सुविचारांनीं युरोपांतील सर्व भाषांतले ग्रंथ व्यापले आहेत ! व्यास, वाल्मीकि, यांच्या सुविचारांची छाया ज्यांत नाहीं, असा भरतखंडांतील कोणत्याही भाषेंतला एक तरी ग्रंथ सांपडेल काय ? तुकारामासारखा एक पुरुष मोठाल्या राजांपेक्षांही मोठा होय. शिवाजीचें केवळ नांव मात्र राहिलें आहे, पण रामदास, तुकाराम हे अजूनपर्यंत लोकांवर अंमल करित आहेत; असें ह्मटलें तरी चालेल. नरसी मेहता याचें नांव गुजराथी लोक कधीं तरी विसरतील काय ?

सदाचारी, विद्वान्, शूर, उद्योगी, असे पुरुष ज्या देशांत होऊन जातात, त्याचाच इतिहास चांगला होतो. असे पुरुषच इतिहासास कारण आहेत असें ह्मटलें पाहिजे; कारण इतिहास ह्मणजे मनुष्यांच्या कृतींचेंच वर्णन होय. भरतखंडाचा प्राचीन इतिहास ह्मणजे, मनु, शिबि, भगीरथ, दिलीप, रघु, अज, दशरथ, राम, जनक, युधिष्ठिर, इत्यादि राजे; वसिष्ठ, याज्ञवल्क्य, व्यास, पराशर इत्यादि ऋषि; गार्गी, अनुसूया, शकुंतला, सावित्री, जानकी इत्यादि स्त्रिया, यांचाच इतिहास होय. भोज, विक्रम, कालिदास, भवभूति इत्यादिकांनीं हिंदुस्थानाच्या इतिहासास किती शोभा आणिली आहे ! मराठ्यांचा इतिहास ह्मणजे शिवाजी व थोरले बाजीराव यांसारखे शूर, बाळाजी विश्वनाथ व नाना फडणवीस यांसारखे राज्यधोरणी, रामशास्त्र्यांसारखे विद्वान्, रामदास, तुकाराम यांसारखे साधु; मोरोपंतांसारखे कवी, अहल्याबाईसारख्या स्त्रिया, यांचास इतिहास होय असें ह्मणण्यास हरकत नाहीं. कारण अशा पुरुषांचीं कृत्यें वजा केलीं तर त्यांत काय रहाणार ? वर सांगितलेल्या प्रकारचे पुरुष हेंच देशाचें खरें जीवित व वैभव होय. यांच्या योगानेंच देश उन्नतीस येऊन कीर्तिमान् होतो. अशा पुरुषांची कीर्ति हाच देशांतील लोकांचा ठेवा होय. स्वराज्य नष्ट झालें तथापि हा आपला ठेवा कधीं नाहींसा होईल काय ? जर यवनांपासून गाईब्राह्मणांस सो-

डविण्याकरतां शिवाजीनें यत्न केला नसता, तर आज आह्मीं कोणाची कीर्ति गाइली असती ? अमेरिकेंतील लोकसत्ताक राज्याचा स्थापक खरा महात्मा वाशिंग्तन याची कीर्ति अजरामर कशानें झाली ? केवळ देशभक्तीनें व सद्वर्तनानें त्यानें आपलें नांव सर्वांस प्रिय केलें. अशीं रत्नें इतिहासांत फारच थोडीं सांपडतील.

सदाचरणी पुरुष देशाचें जीवित होय हें खरें आहे, तथापि एकंदर देशाची योग्यता त्यावरून कळत नाहीं. ती कळण्यास देशांतील लोकसमुदायाच्या वर्तनाची स्थितिच पाहिली पाहिजे. मनुष्यास आपलें सद्वर्तन जसें संभाळलें पाहिजे, तसें देशासही संभाळलें पाहिजे. देशाचें सद्वर्तन सुटल्यावर त्याची दुर्दशा झाल्याशिवाय रहाणार नाहीं. त्यांतील गरीबगुरीब वगैरे सर्वच लोक उद्योगी पाहिजेत. मनुष्याचें जसें मन, तसे देशामध्यें विद्वान् लोक. मनुष्याचे जसे हातपाय, तसे देशांतील इतर लोक. याच अभिप्रायानें श्रुतीमध्यें ब्राह्मण ह्मणजे विद्याभ्यासांत काळ घालविणारे हें विराट्पुरुषाचें ह्मणचे विश्वाचें मुख कल्पिलें आहे. क्षत्रिय ह्मणजे बलानें देशाचें रक्षण करणारे हे बाहु कल्पिले आहेत. वैश्य ह्मणजे व्यापाराच्या योगानें देशास संपन्न करणारे हे ऊरू (मांड्या) कल्पिले आहेत; शूद्र ह्मणजे वरील तीन प्रकारचे लोक आपापलें देशरक्षणाचें काम करित असले ह्मणजे दुसरीं कामें करणारे यांस चरण असें ह्मटलें आहे. सर्वही दृढ असल्याशिवाय चांगली स्थिति रहावयाची नाहीं. शिवाजीच्या वेळेस जी आपल्या लोकांची स्थिति होती, ती कायम रहाती तर पुढें दुर्दशा झाली नसती. देशांतील लोकसमुदायाच्या वर्तनास वळण लागण्यास पुष्कळ अंशीं राजदरबारचें वळण कारण होतें. संभाजी, धाकटे बाजीराव, यांसारखे राज्याचे सूत्रधार झाले तेव्हां लोकांचें आचरण सुटलें. देशांतील लोक प्रामाणिक, शूर, सदाचारी असल्याशिवाय देशास कोणी मान देणार नाहीं, व

त्या देशाची जगांत कीर्ति व्हावयाची नाहीं. ज्या देशांतले लोक आपल्या कर्तव्याकडे लक्ष न देतां केवळ लक्ष्मीभक्त व विषयासक्त रहातात तो देश कधींहि ऊर्जित दशेस यावयाचा नाहीं.

देशांत केवळ नीतिग्रंथ पुष्कळ झाल्यानें किंवा शाळा पुष्कळ घातल्यानें लोकसमुदायाचें वर्तन चांगलें होतें असें नाहीं. लोकांस उदाहरण घेण्यासारखे देशांत खरे सदाचरणी पुरुष असले पाहिजेत. 'यथा राजा तथा प्रजा' असें लोकांच्या ह्मणण्यांत आहे. तथापि युरोपखंडांतील कित्येक देशांचा इतिहास पाहिला असतां असें दिसून येईल कीं, 'यथा प्रजा तथा राजा' असें ह्मणण्यास हरकत नाहीं. इंग्लंदचा पहिला चार्लस व फ्रान्सचा सोळावा लुई यांनीं लोककल्याणाकडे किती लक्ष दिलें पाहिजे हें राजांस चांगलें शिकविलें आहे. भरतखंडाच्या प्राचीन इतिहासांतही अशीं उदाहरणें सांपडतील. लोककल्याणाकडे लक्ष न देतां यथेच्छ आचरण केल्यामुळें प्रजेनें वेननामक राजास पदभ्रष्ट केलें. जेथें लोक चांगले हुशार, प्रामाणिक, नीतिमान् आहेत, तेथें राजास त्यांस चांगल्या रीतीनें वागवावें लागतें. जेथें लोकच लबाड, तोंडपुजे, आपलपोटे, असे असतात, तेथें राजाही तसाच जुलमी होतो. कांहीं वर्षांपूर्वीं सरकारच्या एका बड्या विलायती कामदाराच्या नांवानें जो लांच खाण्याविषयीं डांगोरा पिटून त्याची चवकशी करण्यास पुण्यास सरकारानें सुरवात केली, तेव्हां त्या संबंधानें कित्येक लोक असें ह्मणूं लागले कीं मोठाले हजारों रुपये दरमहा पगार खाणारे व आपणांस सुशिक्षित समजणारे कामदार जर लांच खाऊं लागतील तर शेंपन्नास रुपये दरमहा मिळविणाऱ्या सुशिक्षित ह्मणवेणाऱ्या लोकांनीं लांच देऊन बढतीच्या जागा मिळविल्या यांत काय आश्चर्य ? यावर कित्येकांचें असें ह्मणणें पडलें कीं, कांहीं दिवस बढतीची जागा मिळाली नाहीं तरी हरकत नाहीं पण ती अशा पापकृत्यानें मिळवायाची नाहीं. अशा प्रकारचें दार्ढ्य जर नवीन सुशिक्षित ह्मणविणाऱ्यांमध्यें असतें तर विलायती बड्या का-

मदाराच्या दुर्गुणाचा इतका विस्तार न होतां तो जागच्या जागींच कृश झाला असता. चवकशीचा परिणाम कांहीं होवो तथापि ह्या दोन्ही ह्मणण्यांत पुष्कळ सत्यांश आहे यांत संशय नाहीं.

देशांत लोकसमुदायामध्यें बहुमत असेल तेंच चांगलें, असें समजून सर्वदा चालतां येत नाहीं. एखादे वेळेस लबाड व मसलती लोकांच्या उद्योगानें भलभलतींच मतें लोकांस खरीं वाटूं लागतात. सरकारी कामदार कितीही वाईट असला तरी त्याच्या मेहेरबानींतले खटपटी मसलती लोक वर्तमानपत्रांत त्याची स्तुती करून त्याचा पुतळा करण्याकरतां लोकांपासून वर्गणी सुद्धां गोळा करतात. अशा गोष्टी पुष्कळ वेळ होत नाहींत काय? लोकांनीं कांहीं ह्मटलें तरी स्वतंत्रपणें आपण विचार करून जें योग्य वाटेल त्याप्रमाणें धैर्यानें आचरण करणारे पुरुष देशांत असले पाहिजेत. यासंबंधानें 'ओ. ह्यूम' नांवाचे सद्गृहस्थ राष्ट्रीय सभेचे उत्पादक यांची वाखाणणी करावी तितकी थोडीच. पुष्कळ वजनदार लोक त्यांच्या उद्योगास अडथळा आणित असतां तिकडे लक्ष न देऊन त्यांनीं आपला उत्तम उद्योग धैर्यानें व प्रामाणिकपणानें चालविला आहे. त्यांच्या उद्योगाचा परिणाम काय होईल तें आज सांगतां येत नाहीं, तथापि तो स्तुत्य आहे यांत संशय नाहीं. असे पुरुष देशांत असल्याशिवाय खरी स्वतंत्रता मिळावयाची नाहीं. कायदेकानू कितीही चांगले असले तरी जेथें लोकांचें वर्तन चांगलें नाहीं, तेथें देशस्थिति कधींही चांगली होणार नाहीं. जेथें लोकसमुदाय नीतिमान् नाहीं, तेथें देशास स्वतंत्रता मिळावयाची नाहीं; व मिळाली तरी ती निरुपयोगी होय.

मनुष्यानें, आपलें कुल मोठें, आपल्या पूर्वजांची कीर्ति मोठी; त्याप्रमाणें आपणास आचरण केलें पाहिजे असें नेहमीं मनांत बाळगलें तर देशांत चांगले लोक पुष्कळ होतील. त्याचप्रमाणें देशांतील लोकांनीं, आपल्या पूर्वजांनीं केवढाले पराक्रम केले, त्यांनीं जुलुमांतून सुटून स्वतंत्रता मिळविण्यास केवढाले यत्न केले,

ही गोष्ट नेहमीं लक्षांत ठेवून त्याप्रमाणें आचरण केलें, तर ते कधींही जुलुमांत रहाणार नाहींत. पूर्वजांचा लौकिक मोठा असल्यापासून मनुष्यास जगांत पुढें येण्यास जसा उपयोग होतो, तसा देशाचा प्राचीन इतिहास चांगला असला ह्मणजे लोकसमुदायास पुष्कळ उपयोग होतो. यासाठीं आहे हीच स्थिति पूर्वीपेक्षां चांगली असें दाखविण्याकरितां परकीय लोक जिंकिलेल्या देशाचा इतिहास होईल तितका वाईट रीतीनें लिहितात. प्राणसंकटीं अफजुलखानाशीं केलेल्या शिवाजीच्या आचरणास दोष लावतात तेच इतिहासकार क्लैव, हेस्तिंग्ज, यांनीं केलेल्या दुष्ट कृत्यांवर पांघरूण घालतात. सत्यशोधकांनीं दुसऱ्याच्या डोळ्यांनीं न पाहतां सत्याचा विचार केला पाहिजे. परकीय लोकांनीं ब्राह्मण लुच्चे असें ह्मटलें कीं त्याच्याच प्रतिध्वनीनें दशदिशा न भरतां, मनु, व्यास, गौतम, कणाद, कपिल, वाल्मीकि हे जशी आपली कीर्ति युरोप, व अमेरिका यांत गाजवितात, तशीच आह्मी गाजवूं असें मनांत आणून वागलें तर बरें. पूर्वीं होऊन गेलेल्या प्रसिद्ध पुरुषांनीं जे पराक्रम व जीं महत्कृत्यें केलीं, तीं डोळ्यांपुढें असल्यानें लोकांमध्यें धैर्य व उत्साह हे गुण आणण्यास उपयोगीं पडतात.

देशाचा इतिहास ह्मणजे मनुष्यांचीं चरित्रेंच आहेत. थोरांचीं चरित्रें हीं अनुभवभांडारेंच आहेत, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. त्यांचा योग्य रीतीनें उपयोग केला असतां दिवसेंदिवस देशामध्यें सुधारणा झाल्याशिवाय रहाणार नाहीं. मनुष्यावर जसे बिकट प्रसंग येतात, तसे देशावरही येतात. चरित्र किंवा इतिहास यांत ज्या कित्येक उत्तम गोष्टी असतात, त्या अशा बिकट प्रसंगांमुळेंच झालेल्या असतात. नुसती स्वतंत्रतेची इच्छा व देशाभिमान पुष्कळांमध्यें असतो, परंतु जे त्यांच्याकरितां दुःखें भोगितात, त्यांचेंच आचरण स्तुत्य होय. केवळ आपल्या पूर्वजांचे गुण वाखाणीत बसणें किंवा आपणामध्यें चालत आलेल्या चाली कशाही असल्या तरी त्यांचें मंडन करणें हाच कित्येकांस स्वदेशा-

भिमान वाटतो; परंतु ही त्यांची समजूत चुकीची आहे. नष्टवैभवाचा गर्व धरून त्याकरितां हळहळत बसणें याचा काय उपयोग? तसेंच स्वदेशाभिमान दाखविण्याकरितां लांबलचक व्याख्यानें झोडणें किंवा वर्तमानपत्रांत निबंध लिहिणें याचा काय उपयोग? त्यापासून देशास कांहीं उपयोग नाहीं. खरा व स्तुत्य देशाभिमान वेगळाच आहे. तो ज्यांच्या अंगीं असतो, ते पुरुष आपलें कर्तव्य स्वतः धैर्यानें व प्रामाणिकपणानें करून देशास फायदा होण्यासारखें कांहीं नवें कृत्य करून लोकांमध्यें धैर्य व उत्साह उत्पन्न करतात. ते प्रसंग आला असतां पूर्वींच्या लोकांनीं धर्म किंवा स्वतंत्रता यांच्या रक्षणाकरतां अनेक दुःखें भोगून जी अक्षय्य कीर्ति मिळविली तिचीं उदाहरणें लोकांच्या दृष्टीपुढें आणून त्यांस सन्मार्गाकडे वळवून देशांत अनेक चांगल्या गोष्टी उत्पन्न करतात. देश मोठा होण्यास राज्य फार मोठें पाहिजे असें नाहीं, देशांतील लोक मोठे पाहिजेत. ज्या देशांतील लोक मोठे तो देश मोठा खरा. ग्रीस देशाचें राज्य अगदीं लहान होतें, तथापि त्या देशांतील लोकांच्या पराक्रमाची, विद्येची, कलाकौशल्याची व स्वदेशाभिमानी लोकांची कीर्ति जगांत अजरामर झाली आहे. शिवाजीनें यवनांच्या पीडेपासून गाईब्राह्मणांस सोडविण्याचा यत्न केला, तेव्हां त्याचें राज्य मोंगलांच्या राज्यापेक्षां मोठें होतें काय? रोमन लोकांचें राज्य अति विस्तीर्ण झालें होतें; परंतु ते लोक आळशी, गर्विष्ठ, चैनी, असे झाल्यामुळें तें विलयास गेलें. शिवाजी किंवा थोरले बाजीराव यांसारखे निआळशी पुरुष राज्यांत असते तर मराठ्यांच्या राज्याचा विध्वंस झाला असता काय? रोम शहराप्रमाणेंच पेशवाईत पुण्याची व्यवस्था झाली म्हटलें तरी चालेल. जसजसी पुण्याची संपत्ति वाढत चालली तसतसा गृहकलह व आळस वाढूं लागला. शेवटीं आनंदीबाई आणि त्यांचे चिरंजीव यांनीं दोन्ही गोष्टींचा कळस करून मराठी राज्याचा शेवट केला.

फ्रान्स देशांत चौदावा लुई हा राजा मोठा हुशार व राज्यकारस्थानी होता. त्यानें हालंद देश जिंकण्यास पुष्कळ वर्षें यत्न चालविला होता; परंतु तो सिद्धीस गेला नाहीं. तेव्हां त्यानें प्रधानास विचारलें कीं, एवढ्या थोरल्या फ्रान्स देशाचा राजा असून यःकश्चित् हालंद देश माझ्यानें जिंकवत नाहीं, हें आश्चर्य नव्हे काय ? प्रधान ह्मणाला, महाराज, याचें कारण असें आहे कीं, राज्य विस्तीर्ण असलें ह्मणजे देश मोठा होतो असें नाहीं. ज्या देशांतले लोक चांगले तो देश चांगला होय. उद्योग, मितव्यय, उत्साह, इत्यादि गुणांनीं हालंदचे लोक तुह्मांस अजिंक्य झाले आहेत.

देशांत सुधारणा होणें आणि ती सतत चालणें यास कारण लोकांचें सद्वर्तन होय. लोकांत धैर्य, शौर्य, ऐक्य, हे गुण सद्वर्तन असल्याशिवाय यावयाचे नाहींत, व त्याशिवाय देशास राष्ट्रपणा यावयाचा नाहीं. देशांतील लोक आपलपोटे, चैनी, असे झाले ह्मणजे देश सुधारणेच्या शिखरास पोंचला असला तरी त्याची दुर्दशा झाल्याशिवाय रहाणार नाहीं. लोकांचें सद्वर्तन सुटलें ह्मणजे त्याचा नाश झालाच ह्मणून समजावें. जो देश निकृष्टस्थितीस आला आहे त्यांत दैवयोगानें व परमेश्वरकृपेनें खरे स्वदेशाभिमानी पुरुष उत्पन्न झाल्यास त्यांनीं लोकांमध्यें सद्वर्तन वाढविण्याचा उद्योग करावा; कारण त्याशिवाय कोणत्याही गोष्टीनें देशाचा उदय व्हावयाचा नाहीं.

---

# भाग २.

## गृहशिक्षा.

**माता शत्रुः पिता वैरी येन बालो न पाठितः ।**
**न शोभते सभामध्ये हंसमध्ये बको यथा ॥** हितोपदेश ॥

सद्वर्तन अंगीं बिंबण्यास घर ही मुख्य शाळा होय. प्रत्येक

मनुष्यास नीतीचें किंवा अनीतीचें वळण लागणें तें प्रथमतः घरीं लागतें. हें घरीं लागलेलें वळण जन्मभर त्याच्या अंगीं रहातें. मनुष्यास जशी घरची शिक्षा चांगली किंवा वाईट असेल, तसा तो होतो. गृहशिक्षा हाच सद्वर्तनाचा पाया होय. सद्गुणाची आवड व दुर्गुणाची नावड, सभ्यपणाची गोडी व छिचोरपणाचा तिटकारा, विद्येची अभिरुचि व आळसाचा कंटाळा, या सर्व गोष्टी घरीं अंगीं बिंबतील त्याप्रमाणें मनुष्य चांगला किंवा वाईट होईल.

देशांतील लोकांत ज्या चांगल्या किंवा वाईट चाली आहेत, त्यांस सुद्धां गृहशिक्षाच कारण आहे असें ह्मणण्यास हरकत नाहीं. किंबहुना कायदेकानू चांगले किंवा वाईट होण्यास देखील गृहशिक्षाच कारण आहे ह्मटलें तरी चालेल. कारण, देशांत कोणतीही चाल पाडणें किंवा कायदेकानू करणें हें पुढारी लोकच करतात. तेव्हां अर्थात् त्यांस जशी गृहशिक्षा मिळाली असेल, त्याप्रमाणें त्यांच्या हातून या गोष्टी होतात. याकरितां राज्यकारभार करणाऱ्यापेक्षांही मुलांस शिकविणारे फार चांगले असले पाहिजेत.

मनुष्यास लोकांशीं वागण्यापूर्वीं घरच्या माणसांशीं वागण्याचा प्रसंग येतो, हा सृष्टिक्रमच आहे. यासाठीं त्याचें वर्तन घरींच चांगलें झालें पाहिजे; ह्मणजे सहजच तो लोकांत चांगला वागेल. घरच्या मनुष्यांशीं वागण्याचे जितके वेगळाले प्रसंग मनुष्यास आहेत, तितके लोकांशीं नाहींत. याकरतां घरांत जो चांगला असतो, तो लोकांतही चांगला होतो. यामुळें गृहशिक्षा ही देशाच्या सुधारणेचा पाया आहे असें ह्मटलें तरी चालेल; कारण ज्या देशांत चांगले लोक आहेत, त्यास सुधारलेला देश असें ह्मणतात. चांगले लोक निपजण्यास गृहशिक्षा कारण आहे, तेव्हां अर्थात् गृहशिक्षाच सुधारणेचा पाया होय. आपल्या सद्वर्तनानें घरांतील बायकामुलांस सन्मार्ग न दाखवितां घरीं यथेच्छ आच-

रण करून, विद्याप्रसार झाला पाहिजे, स्त्रीशिक्षण वाढलें पाहिजे, असा वर्तमानपत्रांत गोंगाट करून उपयोग नाहीं. ठरींव नियमाप्रमाणें परीक्षेंत उतरल्यानें कृतकृत्यता न मानतां, ग्रंथसंपादित ज्ञानाचा उपयोग उदाहरणरूपानें आधुनिक विद्वान् करून दाखवूं लागले तर सुधारणा शीघ्रगतीनें चालूं लागेल.

मनुष्य कितीही बुद्धिमान् असला तरी लहानपणीं तो ज्या लोकांत वागलेला असेल, त्यांचे कांहींतरी गुण त्यामध्यें आल्याशिवाय रहाणार नाहींत. मनुष्य जन्मास येतो तेव्हां तो चांगला किंवा वाईट नसतो. त्याचा चांगुलपणा किंवा वाईटपणा जे त्याचें पालनपोषण करितात किंवा त्यास शिक्षण देतात, त्यांच्या आचरणावर अवलंबून आहे. जन्मास आल्यापासून मनुष्याचें शिक्षण सुरू होतें. एका आईचा चार वर्षांचा मुलगा होता. तिनें एका विद्वानास विचारलें कीं, महाराज, मुलाच्या शिक्षणास आरंभ केव्हां करावा ? विद्वानानें उत्तर केलें, बाई, अजून त्वां आरंभ केला नाहीं काय ? तर मग हीं चार वर्षें फुकट गेलीं. मुलाचा जन्मकाळ हाच त्याच्या शिक्षणाचा प्रारंभकाळ होय.

मुलें ज्या गोष्टी पहातात किंवा ऐकतात, त्यांचें तीं अनुकरण करतात. अनुकरण हेंच त्यांचें प्रथम शिक्षण होय. उदाहरण हाच त्यांचा मोठा गुरु होय. लोकांस या अनुकरणाचें माहात्म्य विशेष वाटत नाहीं, पण याचा अंमल जन्मभर रहातो. लहानपणीं मुलांचा स्वभाव बनतो तसाच पुढें रहातो. मोठेपणच्या शिक्षणानें मनुष्यास कितीही सद्गुण प्राप्त झाले तरी बाळपणचा स्वभाव पालटत नाहीं. ह्मणूनच 'जो गुण बाळा तो जन्मकाळा' अशी ह्मण पडली आहे. लहानपणीं मुलांस ज्या गोष्टी शिकवाव्या, त्या त्यांच्या मनांत चांगल्या दृढ बिंबून शेवटपर्यंत तशाच रहातात. सद्गुण किंवा दुर्गुण यांचें बीजारोपण त्याच वेळेस होतें. यासाठीं सद्वर्तनाचा पाया घालण्याचा मुख्य काल बाळपण होय.

मूल जन्मास आलें ह्मणजे त्यास सर्व वस्तु नव्या आहेत. त्यांच्या नवीनपणामुळें त्यास मोठें आश्चर्य वाटतें. या वेळेस जी भाषा त्याच्या कानीं पडते तीच तें बोलूं लागतें, त्याप्रमाणें या वेळेस त्याचें मन वळवावें तसें वळणारें आहे. त्यास वळण देणारा शहाणा असेल तर मूल उदयास आल्याशिवाय रहाणार नाहीं. लहानपणीं मुलांचें अंतःकरण आरशासारखें निर्मळ असतें. त्यांत जे ज्ञानसूर्याचे किरण पडतील, त्यांचें परावर्तन झाल्याशिवाय रहाणार नाहीं. या वेळेस तें जें शिकेल तें जन्मपर्यंत जाणार नाहीं.

विद्वानांत देखील कोणास गणिताचा, कोणास काव्याचा, कोणास शास्त्राचा अधिक नाद असतो. याचें कारणही त्याच्या लहानपणीं त्याच्या विषयाकडे अधिक मन वळण्यासारखी त्यास संगति प्राप्त झाली असेल हें होय,'असें' कित्येकांचें मत आहे. इंग्लंद देशांतील प्रसिद्ध कल्पित कथानकें लिहिणारा सर वाल्तर स्कात् याची अशी गोष्ट सांगतात कीं, तो आई आणि आजी यांपासून मागील जुन्या गोष्टी ऐकत असे; त्यामुळें नेहमीं जुन्या गोष्टींच्या ग्रंथांकडे त्याचें मन लागलें.

सुस्वभाव, उद्योगीपणा, चांगल्या संवयी, इत्यादि मनुष्याच्या सुखास साधन असे सद्गुण लहानपणापासूनच हळहळ मनुष्याच्या अंगीं वाढत जातील तर तो सदाचरणी होईल. मनुष्याच्या अंगीं उपजत कांहीं गुण प्राप्त झालेले असतात, तथापि त्याचें आचरण चांगलें किंवा वाईट होण्यास भोंवतालच्या लोकांचें वागणेंही विशेष कारण होतें. मोठा विद्वान् मनुष्य पुष्कळ वर्षें दुष्ट व दुराचारी लोकांत राहिला तर त्यांचे कांहीं तरी दुर्गुण त्यास लागल्याशिवाय रहात नाहींत; मग अज्ञान मुलांचें आचरण त्यांच्याहून वेगळें कसें होईल? मराठी भाषा बोलणाऱ्या घरांत मूल कानडी भाषा बोलूं लागणार नाहीं, त्याप्रमाणें दुराचारी लोकांत सदाचारी मनुष्य निपजणें असंभाव्य आहे.

मुलास गृहशिक्षा चांगली किंवा वाईट मिळणें हें घरांतील

गुण तिच्या अंगीं आहेत असेंही नाहीं. तथापि ती प्रतिष्ठित होऊन भरजरीच्या चंचींत बसूं लागल्यापासून तंबाकू खाणें हा एक प्रतिष्ठितपणा होऊन तिचा प्रवेश नाहीं असें घर सांपडणें कठिण, अशी स्थिति झाली आहे. कित्येक गृहस्थ आपण प्रतिष्ठितपणें तंबाकू खात बसून मुलांनीं तिला हात लावला तर रागें भरतात; तेव्हां अर्थात् मुलांस त्यांचा डोळा चुकवून चंची घ्यावी लागते ! जेथें वाईट उदाहरणें भोंवतालीं आहेत तेथें मुलांस नीतीचीं वचनें न शिकविलेलीं बरीं. कारण त्यांपासून ढोंगीपणा हा अति वाईट दुर्गुण मात्र वाढतो. हीं वचनें तोंडानें मात्र बोलावयाचीं असें त्यांस वाटूं लागतें. अलीकडे आमच्यांतील मोठे ह्मणविणाऱ्या कित्येक गृहस्थांच्या वर्तनानें आमच्या देशांत ढोंगीपणा फार वाढत चालला आहे ही शोचनीय गोष्ट आहे. नव्या समाजांत मूर्तिपूजेची निंदा करावी, घरांत देव आणून हलक्या कोंपऱ्यांत मांडावा, जुन्या भटाकडून त्याची पूजा करवावी, नव्या पदवी धारण करणाऱ्याजवळ त्याची थट्टा करावी, म्लेंच्छाकडे मेजावर अभक्ष्य भक्षण करावें, जुन्या लोकांत पीतांबर नेसून पाटावर बसावें, जातिभेद मानूं नये, लग्नकार्याची वेळ आली ह्मणजे जातींत यावें; लग्नांत पुष्कळ खर्च करूं नये ह्मणावें, मुलास पुष्कळ हुंडा मागावा; अशा वर्तनानें मुलांस व जवळील माणसांस नीतीचें वळण लागेल काय ? मुलें कितीही लहान असलीं तरी आपलीं आईबापें बोलल्याप्रमाणें करणारीं आहेत किंवा नाहींत हें त्यांस कळतें. बिदागीकरितां कथा करणारे गोंसावी तुकारामबोवांचे उत्तम अभंग ह्मणून लोकांस उपदेश करतात, परंतु त्यापासून एका तरी श्रोत्याचें मन विरक्त झालें असेल काय ? ठीकच आहे, आडांत असेल तर पोहऱ्यांत येईल.

लहानपणापासून चांगल्या मनुष्याचें अनुकरण करतां करतां पुष्कळ वेळानें मनुष्याच्या अंगीं सद्वर्तन बिंबतें. एकदा बिंबल्यावर तें सुटावयाचें नाहीं. मुलांदेखत एकादी वाईट गोष्ट केली ह्मणून

त्यापासून काय होणार असें पुष्कळांस वाटतें; परंतु याविषयीं मुंग्यांच्या वारुळाकडे दृष्टि दिली पाहिजे. मुंगीचा जीव केवढा, ती तोंडांत माती किती आणणार? पण अशी तिळाइतकी माती आणून मोठाले भयंकर नाग आंत रहाण्यासारखीं वारुळें मुंग्या करतात! त्याप्रमाणेंच मुलांनीं आईबापांचा कधीं कधीं वाईटपणा पाहिला तरी कांहीं दिवसांनीं ती त्यांची संवय बनून तिजपासून अनेक वाईट परिणाम घडतात. जसें तिळतिळ माती एके ठिकाणीं रचल्यानें वारूळ होतें, तसेंच थोडेंथोडें सुशिक्षण जमून सद्वर्तन उत्पन्न होतें.

बापाच्या अगोदरच मुलास आईपासून शिक्षण प्राप्त होतें. ह्मणूनच तिला वेदांतही इतकें महत्व दिलें आहे. कारण प्रथमतः 'तूं मातृदेव हो' असें सांगून मग 'पितृदेव[1] हो' 'आचार्यदेव हो,' असें सांगितलें आहे. मुलांवर आईचा जसा पूर्ण अंमल असतो, तसा दुसरा कोणाचाही असत नाहीं. दिवसभर तिची मूर्ति त्यांच्या अंतःकरणांत असते; त्यामुळें एकसारखें तीं तिचें अनुकरण करतात.

बाळपणीं मनुष्याच्या मनास जो संस्कार होतो, तो कधींही नाहींसा व्हावयाचा नाहीं. लहानशा बीपासून मोठा वृक्ष होतो; त्याप्रमाणें मुलांच्या मनोभूमीवर बाल्यवसंतामध्यें ज्या गोष्टींचें बीजारोपण होतें, त्यांपासून मोठाले परिणाम घडतात. आईच्या मनांत मुलांविषयीं परमेश्वरानें निरुपम प्रेम उत्पन्न केलें आहे. त्याच्या सृष्टीमध्यें ज्या असंख्य उत्तमोत्तम योजना आहेत त्यांपैकींच ही एक आहे. हा प्रेमबंध अविच्छिन्न आहे. तो कधींही तुटावयाचा नाहीं. जगांत मोठी संपत्ति मिळाली, कीर्ति वाढली, अधिकार प्राप्त झाला, तथापि आईच्या प्रेमानें सद्गदित झाला नाहीं असा कोणी तरी मनुष्य असेल काय? दुःख झालें असतां आईपासून सांत्वन होतें तसें दुसऱ्या कोणापासून होईल

---

१ माता देव ज्याचा असा बहुव्रीहि समास आहे. त्याप्रमाणेंच पुढील वाक्यांत बाप व गुरु यांस देवासारखें मानणारा असा अर्थ.

काय ? सहज ठेंच लागली तर मनुष्याच्या तोंडांतून आपोआप आई आई असें निघतें; इतकें मातेचें आणि बालकाचें ऐक्य आहे. याकरितां ती ज्या चांगल्या गोष्टी शिकवील त्यांचा संस्कार कधींही नाहींसा होणार नाहीं.

देशांत मागल्या पिढीचे लोक चांगले असले ह्मणजे अर्थात् पुढलेही चांगले होतात. तसेंच मागल्या पिढीच्या बायका ह्मणजे आया चांगल्या असल्या तर पुढल्याही चांगल्या निघतील. देशांतील लोकसमुदाय चांगला होण्यास जसें चांगले पुरुष असणें आवश्यक आहे, तसें चांगल्या बायकाही असणें आवश्यक आहे. घरांतील पुरुष चांगला असून बायको सुधी नसली तर मुलें चांगलीं निघणें कठीण आहे. मूल मोठेपणीं कसें निपजणार हें बहुतांशीं मातेच्या कृतीवर अवलंबून आहे. मुलास बापापासून शिक्षण प्राप्त होतें, परंतु तें कठोर असतें. बापापासून एकादी गोष्ट शिकण्यास मूल कंटाळा करतें, तीच गोष्ट आई त्यास गोडीगुलाबीनें शिकवील. मनुष्याच्या ठायीं जसे बुद्धिमत्ता, न्यायीपणा, शौर्य हे गुण तसे लोकसमुदायांत पुरुष होत; परंतु स्त्रिया ह्मटल्या ह्मणजे दया, शांति, मार्दव या गुणांसारख्या होत. पुरुषाच्या धाकानें जें काम होणार नाहीं, तें स्त्री मंजुळ भाषणानें करील. मुलांस बापाचा धाक असतो, पण आईविषयीं प्रेम असतें. बाप मुलांस विद्या शिकवितो, पण सद्गुणांचें शिक्षण आईपासूनच प्राप्त होतें. याकरितां मूल चांगलें निपजण्यास चांगली आई असणें आवश्यक आहे. आई आळशी, दांडगी असली ह्मणजे मूल उद्योगी, नम्र, कधींही होणार नाहीं.

घरांतील बायको चांगली सुस्वभाव असली तर जें सुख त्या घरीं असेल तें मोठ्या श्रीमंताच्या सुद्धां घरीं असणार नाहीं. सुस्त्री आपल्या कोमल स्वभावानें पुरुषास सुखी करील; त्यास दारिद्र्याचे किंवा श्रमाचे कष्ट वाटूं देणार नाहीं, व त्यास सर्वदा संतुष्ट राखील.

ज्या घरांतील गृहस्थिति चांगली आहे, तें घर केवळ मुलांसच सुशिक्षण प्राप्त होण्यास योग्य आहे असें नाहीं. त्यापासून मोठ्या मनुष्यास सुद्धां पुष्कळ गोष्टी प्राप्त होतात. उल्हासीपणा, शांति, आत्मसंयमन इत्यादि गोष्टी शिकण्याची खरी शाळा ह्मटली ह्मणजे चांगलें घराणें होय. फार काय पण परोपकार, स्वदेशप्रीति, हे गुण सुद्धां गृहशिक्षा चांगली असल्याशिवाय यावयाचे नाहींत. ज्याचें वर्तन घरांत चांगलें नाहीं, तो लोकांशीं चांगला कोठून वागणार ?

गृहशिक्षा चांगली असली ह्मणजे जसे फायदे आहेत, तसेच ती वाईट असल्यानें तोटेही फार आहेत. बाळपणापासून वीस वर्षांच्या वयापावेतों जे दुर्गुण जडतात, त्यांपासून सर्व जन्माचें नुकसान होतें. आईबापांपासून जे दुर्गुण लागतात, ते पुढें गुरु कितीही चांगला असला तरी नाहींतसे व्हावयाचे नाहींत. आईबापें दुराचारी, व्यसनी, कर्जेदलाल, तिरसट, आळशी अशीं असलीं ह्मणजे मुलें कोठून चांगलीं होणार ? अशा आईबापांच्या पोटीं जन्मास येणें हें मुलांचें मोठें दुर्दैव होय. अशा मुलांस सुख कोठून प्राप्त होणार ? तीं स्वतः दुःखी होऊन लोकांस त्रास देणारीं होतील. नेपोलियन बोनापार्त हा मोठा मातृभक्त होता. तो ह्मणत असे कीं, मूल चांगलें किंवा वाईट निपजणें हें आईच्या स्वाधीन आहे. हा आपल्या आईला मोठा मान देत असे. माझ्यामध्यें जे चांगले गुण आहेत ते माझ्या आईच्याच शिक्षणापासून आलेले आहेत असें तो ह्मणत असे. तो लहानपणीं तिच्या धाकांत असे, तथापि तिच्याशीं प्रेमानें वागत असे. तिचें ह्मणणें त्यानें कधींही मोडलें नाहीं.

बाप वाईट असून आई चांगली असली तरी मुलें चांगलीं निघाल्याचीं पुष्कळ उदाहरणें सांपडतील, पण आई वाईट असून बाप चांगला असला तरी तीं चांगलीं निघाल्याचें उदाहरण क्वचित् आढळेल. बापानें मुलांस दिलेल्या शिक्षणाचा लोकांत लौकिक होतो,

तसा आईच्या शिक्षणाचा होत नाहीं; तथापि मुलें चांगलीं निपजण्यास तिचेंच शिक्षण विशेष महत्वाचें आहे. बापापेक्षांही आईविषयीं मुलांचा प्रेमळपणा जास्त असतो, याचें कारण असें कीं, बापाचें शिक्षण जसें कायदा नीति शिकवितो तसें असतें; परंतु आईचें शिक्षण हें शब्दालंकारांनीं युक्त अशा काव्यरूपानें नीतिशिक्षणासारखें आहे. कायद्याचें शिक्षण ह्मटलें ह्मणजे अमुक गोष्ट केली तर अमुक शिक्षा होईल, असें धाकाचें असतें. आईचें शिक्षण प्रेमाचें होय. आई सांगेल तें ऐकण्यांत मौज वाटते. पितापुत्र उभयतां सारखे विद्वान् किंवा शूर असून परस्परांमध्यें वैमनस्य असल्याचीं पुष्कळ उदाहरणें सांपडतील; तथापि मुलगा केवढाही झाला तरी त्याच्या मनांतील आईविषयीं प्रेम कमी होईल काय ? शिकंदर बादशहाच्या प्रधानानें त्यास त्याच्या आईचीं गाऱ्हाणीं लिहून पाठविलीं, तेव्हां तो ह्मणाला, माझ्या आईचा एकच अश्रुबिंदु हीं सर्व पत्रें पुसून टाकील !

कित्येकांस स्त्रियांचें विशेष महत्त्व वाटत नाहीं, ह्मणून ते मुलांच्या शिक्षणाकडे जसें लक्ष देतात, तसें मुलींच्या शिक्षणाकडे देत नाहींत; पण ही मोठी चूक आहे. व्यवस्था, नीटनेटकेपणा, उद्योग, मितव्यय, नियमितपणा, समंजसपणा, संसारकृत्यांची माहिती, आपल्या स्थितीप्रमाणें वागणें, हे गुण लहानपणापासून मुलींस शिकविले पाहिजेत. ज्या घरांतील स्त्रियांमध्यें हे गुण असतील, तींच घराणीं चांगलीं होतील. तेथेंच मुलांस गृहशिक्षा मिळेल. घरांतल्या स्त्रियांनीं वेळच्या वेळेवर आपलें काम केलें नाहीं तर पुरुषांच्या कामाची अव्यवस्था होऊन मुलेंही तशींच निघतील. घरांतल्या बायकांनीं जपून खर्चवेच केला नाहीं तर पुरुषांनीं कितीही मिळविलें तरी दारिद्र्य नाहींसें व्हावयाचें नाहीं. सारांश, गृहशिक्षा चांगली होण्यास घरांतील स्त्रिया व पुरुष हीं संसारशकटाचीं दोन्हींही चक्रें चांगलीं पाहिजेत. केवळ एक चांगलें असून होणार नाहीं. सास्वा वाईट असल्यामुळें सुशील मुलींस

लहानपणीं सासरीं दुःख झाल्याचीं उदाहरणें शेंकडों आहेत. सून नम्र असली तरी तिला कडक रीतीनें वागविण्याचा आपणाला हक्कच आहे असें बहुतेक सास्वा समजतात. दुसऱ्याचें मूल आपल्या मुलाकरतां आपण घरांत आणिलें आहे तर त्यास प्रेमानें वागविणें हें आपलें कर्तव्य आहे असें मानणाऱ्या सास्वा किती असतील ? यामुळें 'सासुरवास' हा शब्द सुद्धां भयंकर झाला आहे.

नीतीच्या संबंधानेंच मुलें चांगलीं होण्यास केवळ स्त्रिया सुशिक्षित पाहिजेत असें नाहीं. स्त्रिया सुशिक्षित असल्याशिवाय मुलांची शरीरप्रकृति देखील नीट रहात नाहीं. पुष्कळ स्त्रियांस स्वच्छता, आरोग्यरक्षण, पाकनिष्पत्ति, इत्यादिकांविषयीं चांगली माहिती नसल्यामुळें मुलांचे फार हाल होतात. आईच्या मूर्खपणानें मुलें आजारी होऊन कित्येक वेळां तीं प्राणासही मुकतात. कित्येक आया मुलांचे फार लाड करून त्यांस बेताबाहेर खाऊं घालतात, श्रम करूं देत नाहींत, त्यांचे हेच लाड मुलांस अपकारकारक होतात. वास्तविक पहातां गरीबांपेक्षां श्रीमंतांचीं मुलें सशक्त व निरोगी अशीं असावीं, पण आईबापांस आरोग्यरक्षणाचे नियम ठाऊक नसल्यामुळें तीं स्वतः अशक्त होऊन त्यांची संततीही तशीच निपजते.

स्त्रिया ह्या केवळ पुरुषांच्याच सुखाकरितां ईश्वरानें उत्पन्न केल्या आहेत असें नाहीं. पुरुषांप्रमाणें जगांत स्त्रियांचीही अनेक कर्तव्यें आहेत. पुरुष आणि स्त्री यांमध्यें बुद्धीच्या संबंधानेंही विलक्षण भेद आहे, असें दिसत नाहीं. पुरुष आणि स्त्री हीं उभयतां मिळून मनुष्य पूर्ण होतो. असें आहे तर स्त्रियांस विशेष शिक्षण नको ह्मणणें हें कोत्या समजुतीचें आहे. कारण शरीराच्या एका भागास फारच जपलें व दुसऱ्याची हयगय केली तर सर्व शरीर चांगलें चालणार नाहीं. तसेंच देशांतील पुरुषांसच शिक्षण मिळालें आणि स्त्रिया तशाच अज्ञान राहिल्या तर, देशांतील लोकसमुदाय कधींही ऊर्जितदशेस यावयाचा नाहीं.

स्त्रिया आणि पुरुष यांचें कर्तव्य जगांत वेगळालें आहे, याक-

रतां एकास जें शिक्षण मिळतें तेंच दुसऱ्यास उपयोगीं पडेल असें नाहीं. कित्येक गोष्टी पुरुषांस अवश्य शिकल्या पाहिजेत, त्या स्त्रियांस न आल्या तरी चालतील. स्त्रियांस शिकविण्याच्या मुख्य गोष्टी न शिकवून दुसऱ्या शिकविल्या तर त्यांपासून कांहींएक नफा होणार नाहीं. मनूनें स्त्रियांचें कर्तव्य सांगितलें आहेः—

**सदा प्रहृष्टया भाव्यं गृहकार्येषु दक्षया ॥**
**सुसंस्कृतोपस्करया व्यये चामुक्तहस्तया ॥**

**अर्थ**—स्त्रीनें सर्वदा आनंदी असावें, गृहकृत्यांमध्यें दक्ष असावें, घरांतील सामान नीट ठेवावें, आणि काटकसरीनें खर्च करावा.

इतकीं कर्तव्यें स्त्रियांचीं आहेत, तर तिला पुष्कळ शिक्षण पाहिजे. सर्वदा आनंदित रहाण्यास धर्म व नीति यांचें शिक्षण पाहिजे. गृहकृत्यांमध्यें कुशल असण्यास पाकनिष्पत्ति वगैरे क्रिया चांगल्या आल्या पाहिजेत. सामानसुमान नीट ठेवण्यास आरोग्यरक्षणाचे नियम वगैरे गोष्टी माहीत असल्या पाहिजेत. काटकसरीनें खर्च करण्यास थोडेंबहुत हिशोबाचें ज्ञान पाहिजे.

वस्तुतः विचार केला तर स्त्रिया व पुरुष या दोघांसही शिक्षण आणि विद्या पाहिजे. एरव्हीं संसारांत सुख व्हावयाचें नाहीं. संसारांत अडचणी, विघ्नें, दुःखें, हीं सर्वांस प्राप्त होतात; परंतु जे विद्वान् व सुशिक्षित असतात ते त्यांतून पार पडतात. जशा पुरुषांस अडचणी आहेत तशा स्त्रियांसही आहेत. संसारांत पुरुषांस जशी दूरदृष्टि लागते तशी स्त्रियांसही लागते. द्रव्य संपादन करणें पुरुषाकडे आहे, पण त्यानें संपादिल्याचा योग्य उपयोग करणें हें बहुतांशीं स्त्रियांच्या स्वाधीन आहे. स्त्री स्वभावतः कितीही चांगली असून अशिक्षित असेल तर तिला आपल्या पातिव्रत्यादि गुणांचें सुद्धां रक्षण करण्यास अडचण पडेल. लोकांपासून फसवून न घेण्यास अंगीं केवळ चांगुलपणा असणें एवढेंच पुरत नाहीं. त्यास शहाणपणाही पाहिजे. कारण स्वहिताकरतां भोळ्या सुजनास फसविणारे जगांत पुष्कळ आहेत. यांकरतांच एका कवीनें

ह्मटलें आहे, 'विद्यते हि नृशंसेभ्यो भयं गुणवतामपि.'[१] स्त्री सुशिक्षित, धार्मिक व नीतिमान् असली तरच प्राप्त झालेल्या स्थितींत सुख मानून पतीस व मुलांबाळांस सुख देईल.

ज्या देशांत पुरुष वाईट आहेत त्या देशांत स्त्रिया चांगल्या रहात नाहींत, त्याप्रमाणेंच ज्या देशांत स्त्रिया वाईट आहेत तेथील पुरुष चांगले रहाणार नाहींत. याकरितां देशाची सुधारणा करूं इच्छिणाऱ्यांनीं केवळ पुरुषांचीच स्थिति सुधारण्याकडे लक्ष दिलें ह्मणजे पुरे आहे असें नाहीं. पुरुषांबरोबर स्त्रियांचीही सुधारणा झाली पाहिजे. स्त्रिया व पुरुष या दोघांचीही सुधारणा चालू असल्यास देशांत चांगलीं घराणीं होऊन मुलांसही चांगलें शिक्षण मिळेल. असें झालें ह्मणजे दिवसेंदिवस लोकस्थिति आपोआप चांगली होईल.

---

## भाग ३.

### संगति.

महाजनस्य संसर्गः कस्य नोन्नतिकारकः ॥
पद्मपत्रस्थितं वारि धत्ते मुक्ताफलश्रियम् ॥ १ ॥ सुभाषित.

मुलांच्या अंगीं सद्वर्तन बिंबण्यास गृहशिक्षा चांगली पाहिजे ह्मणून मागें सांगितलें. घर ही सद्वर्तन शिकण्याची पहिली शाळा; परंतु मूल मोठें होऊन शाळेंत जाऊं लागलें ह्मणजे त्याचा लोकांशीं वागण्याचा आरंभ होतो, ही त्याची दुसरी शाळा होय. लहानपणीं गृहशिक्षा चांगली मिळालेली असली तरी बाहेर जी संगति लागेल तिचा गुण लागल्याशिवाय रहाणार नाहीं. मनुष्य लहान अथवा मोठा कसाही असला तरी त्यास संगतीचा गुण लागावयाचाच. पौष्टिक अन्न खाल्लें तर शरीरास पुष्टि येते, तसेंच

---

१ दुष्टांपासून गुणवानांला देखील भय आहे.

संगति चांगली असली तर अंतःकरणांत सदाचरणाची आवड वाढते.

मनुष्य लहानपणींच दुसऱ्याचें अनुकरण करतो असें नाहीं; अनुकरणानें शिकणें, हा त्याचा उपजत स्वभाव आहे. तो जन्मपर्यंत जावयाचा नाहीं. बोलणेंचालणें, रीतभात, बसणेंउठणें, विचारसमजूत हीं सर्व दुसऱ्यापासूनच मनुष्य शिकतो. संगति हा मनुष्याचा सर्वांत मोठा गुरु आहे.

दुसऱ्याचें अनुकरण मनुष्य मुद्दाम समजून उमजून सर्वदा करतो असें नाहीं; तें त्यास न कळतां आपोआप होत असतें. दोन मनुष्य एके ठिकाणीं जमले ह्मणजे एकमेकांचे विचार परस्परांत मिसळल्याशिवाय रहाणार नाहींत. ज्यांचें वर्तन दृढ घटलें आहे असे दोन वृद्ध मनुष्य एके ठिकाणीं जमले तर त्यांच्या देखील समजुती पालटतील; मग ज्यांचा स्वभाव पुरता बनला नाहीं अशीं लहान मुलें ज्यांशीं वागूं लागतील त्यांचे गुण त्यांच्या अंगीं आल्याशिवाय कसे रहातील? अंगीं विद्या असून संगति वाईट असेल तर मनुष्य सदाचरणी निपजणार नाहीं. तरुणपणीं संगतीचा गुण लवकर लागतो. त्या वेळेस संगति चांगली मिळाली ह्मणजे मनुष्याचें वर्तन आपोआप चांगलें होतें. तारुण्यांत एकदा दुर्गुण जडले ह्मणजे, ते वाईट आहेत, टाकून द्यावे असें मनुष्यास वाटलें तरी ते सुटत नाहींत. याकरितां बाळपणापासूनच सद्गुणांची आवड व दुर्गुणांचा तिटकारा हे गुण अंगीं बिंबले पाहिजेत.

संगतीचा गुण आपोआप लागतो ह्मणून मनुष्यास चांगली संगति असली ह्मणजे पुरे आहे असें नाहीं. आपण ज्या सुजनाची संगति धरितों, तो कसा वागतो हें लक्षपूर्वक पाहून तसें करण्यास झटलें पाहिजे, एरव्हीं सद्वर्तन अंगीं बिंबणार नाहीं. कुसंगतीचा त्याग करण्याविषयीं दृढनिश्चय पाहिजे. एकादे वेळेस एकादी गोष्ट वाईट वाटूनहि अंगीं दृढनिश्चय नसल्यामुळें दुसऱ्याच्या भिडेनें मनुष्य ती करतो.

मनुष्याची पारख तो ज्या मंडळींत वागतो तिजवरून सहज होते. निर्व्यसनी मनुष्य व्यसनी मनुष्याची संगत धरणार नाहीं. विद्वानास अडाण्याचा सहवास आवडणार नाहीं. सभ्य मनुष्यास चावट मंडळींत जाण्यास रुचणार नाहीं. व्यसनी, दुराचारी अशा मनुष्याबरोबर सहवास केल्यावर मनुष्याचें वर्तन बिघडल्याशिवाय रहाणार नाहीं. आपलें वर्तन दिवसेंदिवस अधिक चांगलें होत जावें अशी इच्छा ज्यास असेल, त्यानें सर्वदा आपल्यापेक्षां चांगल्या माणसांची संगति धरण्याचा यत्न केला पाहिजे, व हलकटांची संगति टाकली पाहिजे. हितोपदेशांत सांगितलें आहे:—

**हीयते हि मतिः पुंसां हीनैः सह समागमात् ।**
**समैश्च समतामेति विशिष्टैश्च विशिष्टताम् ॥ १ ॥**

हलक्या मनुष्याची संगत धरल्यानें अनेक प्रकारांनीं त्याचे दुर्गुण आपल्या ठिकाणीं येऊं लागतात. तो आपल्याशीं खोटेपणानें वागला ह्मणजे आपणास त्याच्याशीं खरेपणानें वागण्याची अडचण पडते. तो कुजका असला ह्मणजे आपण मन मोकळें करून वागलों तरी त्यास आपला चांगुलपणा वाटत नाहीं; तेव्हां अर्थात् त्याशीं तसेंच वागावें असें वाटूं लागतें. तो कुबुद्धि व संकुचित मनाचा असल्यामुळें लहानसहान क्षुल्लक गोष्टींकडे लक्ष देऊं लागला ह्मणजे आपली दृष्टि कोती होते. तो भित्रा असल्यामुळें प्रसंगीं आपलेंहि धैर्य खचतें.

सज्जनाच्या संगतीपासून सर्व प्रकारांनीं मनुष्याचें हितच होतें. त्याच्या चांगल्या समजुतीमुळें आपल्या समजुती बदलतात. सद्वर्तन राखण्याचा त्याचा दृढनिश्चय पाहून आपलें मनहि त्याविषयीं दृढ होत जातें. त्याच्या शहाणपणामुळें आपणास पुष्कळ माहिती

१ वाइटावरोबर संगति केल्यास पुरुषांची बुद्धि वाईट होते. सारख्याबरोबर केल्यास तशीच रहाते; आणि चांगल्याबरोबर केल्यास चांगली होते.

होते. त्याचा परोपकारी स्वभाव पाहून आपणास परोपकाराची आवड लागते. त्याच्या प्रोत्साहनानें सत्कृत्य करण्याविषयीं आपणास धैर्य येऊन तें तडीस नेण्याचें चातुर्य प्राप्त होतें. यासाठींच भर्तृहरीनें सत्संगतीपासून सर्व गोष्टी घडतात असें ह्मटलें आहे:—

**जाड्यं धियो हरति सिंचति वाचि सत्यं**
**मानोन्नतिं दिशति पापमपाकरोति ॥**
**चेतः प्रसादयति दिक्षु तनोति कीर्तिं**
**सत्संगतिः कथय किं न करोति पुंसाम् ॥**

**अर्थ**—बुद्धीचा जडपणा हरण करिते, बोलण्यामध्यें सत्य आणिते, मान वाढविते, पाप दूर करिते, मन संतुष्ट करिते, आणि लोकांत कीर्ति वाढविते. सत्संगति पुरुषाचें काय करित नाहीं ?

मनुष्य एकलकोंडा राहूं लागला तर तो चांगला व्हावयाचा नाहीं. मनाचें औदार्य, परोपकार, सभ्यपणा, सहनशीलता, इत्यादि गुण त्यास लागणार नाहींत. त्याच्या कोत्या समजुती जावयाच्या नाहींत. एकलकोंडा राहूं लागल्यानें सुखानें काळ जात नाहीं, इतकेंच नव्हे, तर लौकिकज्ञानहि प्राप्त होत नाहीं. अतिव्यासंगी मनुष्य असतात ते प्रथमतः लोकांशीं वागूं लागले ह्मणजे पढतमूर्ख दिसून लोकांत त्यांची फजिती होते; पण कांहीं दिवस गेल्यावर सहवासानें ते चांगले हुशार होतात. एकलकोंड्या मनुष्याचें सद्वर्तन ढिलें होय. तें केव्हां सुटेल याचा नेम नाहीं. लोकांत वागून टक्केटोणपे खाऊन जें सदाचरण कायम राहील तेंच दृढ होईल. एकलकोंड्या मनुष्याची केवळ सद्वर्तनाच्या संबंधानेंच हानि आहे असें नाहीं; सुखदुःखांच्या संबंधानेंहि त्याचा मोठा तोटा आहे. मित्रांच्या योगानें सुख वाढतें आणि दुःख कमी होतें; तसें न होतां त्याचें सुख जितकेंचें तितकेंच राहून विभागी कोणी नसल्यामुळें, दुःखाचा भार मात्र

एकट्यासच सोसावा लागतो. मित्रमंडळींत मनुष्य आपलें दुःख विसरून जातो.

संसारांत कांहीं विशेष स्थितींतच सत्संगतीचा उपयोग आहे असें नाहीं. सर्व अवस्थांमध्यें तिजपासून फायदा आहे. व्यापारी मंडळीमध्यें एक दोन गृहस्थ वजनदार व प्रामाणिक असले तर त्यांच्यामुळें इतर व्यापाऱ्यांस प्रामाणिकपणा धरावा लागतो. आळींत एक मनुष्य चांगला असला तर लोक त्यास वचकून चालतात. त्याचें लोकांवर चांगलेपणाचें वजन पडल्याशिवाय रहाणार नाहीं. एकाच्या चांगुलपणापासून इतरांमध्यें चांगुलपणा वाढल्याशिवाय रहाणार नाहीं.

सुजनाच्या उपदेशानें किंवा संगतीनें मनुष्याचें दुराचरण सुटून त्यास सद्वर्तन लागल्याचीं उदाहरणें पुराणांत व इतिहासांत पुष्कळ आहेत. संगति ही सद्वर्तन शिकण्याची मुख्य शाळा आहे. सज्जनाचें आचरण हेंच नीतिशास्त्राचें पुस्तक आहे. सदाचरणाच्या योगानें मनुष्याचीं मनें सज्जन आपणाकडे वळवून घेतो. लोकांच्या मनांवर त्याचा जसा अंमल असतो, तसा राजाचा देखील नसतो. तुकाराम, रामदास, यांस मनुष्यांस आपणांजवळ बोलवावें लागत नसे. ते जातील तिकडे लोकांचे थव्यांचे थवे मागें असतच. यशवंतराव भोसेकर यांचें 'देवमामलेदार' असें नांव पडून देवाप्रमाणें ते असतील तेथें यात्रा भरूं लागली. सत्समागम हा स्वभावतःच मोठा सुखावह आहे. लहान मोठा, सज्ञान अज्ञान, चांगला वाईट, या सर्वांस त्यापासून आनंद होतो.

मोठा वारा सुटला ह्मणजे ढग क्षणांत नाहींतसे होतात, त्याप्रमाणें सत्समागम घडल्याबरोबर मनांतील दुर्विचार पळूं लागतात. थोर पुरुषाचें नांव ऐकिल्यानेंच मनाची स्थिति पालटते. मागें होऊन गेलेले साधू, शूर व विद्वान्, यांचे पुतळे किंवा तसबिरी, लोकांच्या डोळ्यांपुढें ठेवण्याचा हेतु हाच आहे कीं, त्यांकडे पाहिल्यानें सत्कृत्यें करण्याविषयीं लोकांची प्रवृत्ति व्हावी. जसा सज्ज-

नाच्या मृदु उपदेशानें कठोर हृदयास द्रव येईल, तसा राजाच्या कडक शासनानेंही येणार नाहीं. विद्या, शौर्य, भक्ति, इत्यादि गुणांचें बीजारोपण मनुष्यांच्या अंतःकरणांत जसें थोरांच्या समागमानें होतें, तसें दुसऱ्या कोणत्याही गोष्टीनें होत नाहीं. तुकाराम, रामदास, यांच्या योगानें देशांत अनेक भक्तिमान् साधु झाले. शिवाजीच्या योगानें महाराष्ट्र देशांत पुष्कळ शूर पुरुष निपजले. नीळकंठशास्त्री थत्ते यांच्या योगानें राघवेंद्राचार्य, मोरशास्त्री, त्र्यंबकशास्त्री, कुप्पाशास्त्री, यांसारखे अनेक पंडित उदयास आले.

सत्संगतीपासून आणखी एक मोठा लाभ आहे, तो हा कीं, तिच्यामुळें मनुष्याचा मोठा शत्रु जो गर्व त्याचा अंतःकरणांत प्रवेश होत नाहीं. आपल्यापेक्षां कमी योग्यतेच्या मंडळींत मनुष्य नेहमीं राहूं लागला तर इतरांपेक्षां आपण श्रेष्ठ आहों असें वाटून तो अंगीं सामर्थ्य असतांही आपले विद्यादि गुण वाढविण्यास झटणार नाहीं. यासाठीं आपल्यापेक्षां मोठ्याचा सहवास हा आपला मोठेपणा वाढविण्यास कारण होतो.

मुलांच्या ठिकाणीं सज्जनाच्या सहवासाची गोडी लहानपणापासूनच लाविली पाहिजे. लहानपणीं हलकटांची संगत लागून हलक्या गोष्टी आवडूं लागल्या म्हणजे चांगल्या गोष्टींकडे त्यांचें लक्ष लागणार नाहीं. ज्यास ज्या गोष्टी आवडतात, त्यांवरून त्याचा स्वभाव कळतो. ज्यास विद्वान् लोक आवडतात, त्यास विद्येची अभिरुचि आहे असें सिद्ध होतें. जो व्यसनी लोकांस वाखाणतो तो स्वतः व्यसनी असतो. जो प्रामाणिक, सरळ, धीट, अशा मनुष्यांची स्तुति करतो तो प्रामाणिक, सरळ व धीट असेल यांत संशय नाहीं. तसेंच जो दुसऱ्याचे गुण घेणारा आहे तो लोकप्रिय झाल्याशिवाय रहाणार नाहीं. कित्येक लोक असे असतात कीं, त्यांस दुसऱ्याच्या गुणांपासून संतोष होत नाहीं,इतकेंच नाहीं, तर त्यापासून उलटें त्यांस वाईट वाटतें. दुसऱ्याची वाहवा झाली कीं, त्यांच्या अंगाची आग होते. लोकांनीं एकाद्यास बुद्धिमान् म्हटलें कीं ते

त्याच्या चुका असतील त्या बाहेर काढूं लागतात. एकाद्यास कोणीं नम्र म्हटलें कीं ते त्यास भव्ळ म्हणतात. कोणाची धार्मिक म्हणून वाहवा झाली कीं हे गुलाम त्यास मोठा ढोंगी आहे म्हणतात. यामुळेंच भर्तृहरीनें म्हटलें आहे:—

**जाड्यं ह्रीमति गण्यते व्रतरुचौ दंभः शुचौ कैतवं ।**
**शूरे निर्घृणता ऋजौ विमतिता दैन्यं प्रियालापिनि ॥**
**तेजस्विन्यवलिप्तता मुखरता वक्तर्यशक्तिः स्थिरे ।**
**तत्को नाम गुणो भवेत्सुगुणिनां यो दुर्जनैर्नांकितः ॥१॥**

**अर्थ**—नम्र असला म्हणजे मूर्ख, धर्माचरण करणारा असला म्हणजे ढोंगी, स्वच्छ वागणारा असला म्हणजे लुचा, शूर असला म्हणजे निर्दय, सरळ असला म्हणजे अप्रबुद्ध, गोड बोलणारा असला म्हणजे बापडा गरीब, तेजस्वी असला म्हणजे गर्विष्ठ, वक्ता असला तर बडबड्या, शांत असला म्हणजे अशक्त; याप्रमाणें गुणवानांचा असा कोणता गुण आहे कीं, ज्यास दुर्जनांनीं नांव ठेविलें नाहीं !

आपल्यामध्यें जो गुण आहे त्यामुळेंच कोणाची वाहवा झाली कीं ज्यांच्या अंतःकरणांत फार वाईट वाटतें असे लोक पुष्कळच आहेत. ते कांहीं तरी खरे खोटे दुर्गुण काढून त्या गुणी मनुष्याची अपकीर्ति करण्याचा यत्न करतात. मोठ्या मनुष्याची बरोबरी करण्याचे दोन मार्ग आहेत; त्याप्रमाणें मोठेपणा मिळवावा हा एक किंवा त्यास आपल्याप्रमाणें लहान तरी करावा हा दुसरा. पहिला मार्ग कठीण आहे; अंगीं खरा गुण असल्याशिवाय तो साधत नाहीं, याकरितां हलके मनुष्य बहुशः दुसराच मार्ग धरतात. त्यामुळें गुणी मनुष्यांची फजिती न होतां त्यांचा मात्र हलकेपणा प्रगट होतो. अशा मनुष्यांस दुसऱ्याचें काम चांगलें असतां जितकें वाईट वाटतें त्यापेक्षां तें बिघडलें तर अधिक आनंद होतो. दिवसभर दुसऱ्यांच्या दोषांकडे त्यांची दृष्टि असते.

दुसऱ्याचा कमीपणा हेंच त्यांचें समाधान. एका विद्वानानें ह्मटलें आहे कीं, थोर पुरुषांमध्यें जर मुळींच दोष असणार नाहींत तर नीच मनुष्यांस मोठी पंचाईत पडेल. शहाणे असतात ते नीचांचे दोष पाहून ते टाकून त्यांपासून देखील आपला फायदा करून घेतात, याकरतांच 'निंदकाचें घर असावें शेजारीं' असें तुकाराम-बावांनीं ह्मटलें आहे. मूर्ख शहाण्यांच्या गुणांपासून देखील आपलें हित करून घेत नाहींत.

दुसऱ्याचे गुण वाखाणण्यापासून मनुष्यास मोठा नफा आहे. त्यापासून त्याचें अनुकरण करण्याची इच्छा उत्पन्न होते. प्राचीन-काळीं ग्रीस देशांत थेमिस्टोक्लीस या नांवाचा एक महावीर होऊन गेला. त्याची गोष्ट अशी लिहिली आहे कीं, माराथान नांवाच्या विख्यात रणभूमीवर इराणी लोकांशीं ग्रीक लोकांचें मोठें युद्ध झालें, त्यांत ग्रीक लोकांचा सेनापति मिल्तैदीस याच्या पराक्रमानें मोठा जय मिळाला. हें ऐकून थेमिस्टोक्लीस हा अगदीं खिन्न झाला. त्याच्या मित्रानें त्यास खिन्न होण्याचें कारण विचारिलें. तेव्हां तो ह्मणाला, मिल्तैदीस यासारखा पराक्रम करून विजय मिळविल्याशिवाय मला झोंप येणार नाहीं. पुढें कांहीं वर्षांनीं तो अथेन्स येथील सैन्याचा अधिपति झाला; तेव्हां आपल्या चातुर्यानें व पराक्रमानें त्यानें आर्तिमिशिअम् व सालामिम् येथील युद्धांत इराणी लोकांचा अगदीं पराभव करून ग्रीस देशांत मोठी वाहवा मिळवून अक्षय कीर्ति संपादिली.

ग्रीस देशांतील प्रख्यात इतिहासकार थ्युसिदिदिस् याची अशीच गोष्ट सांगतात. त्याच्या पूर्वीं होऊन गेलेला जो विद्वान् इतिहासकार हिरोदोतस याचा ग्रंथ कोणी वाचीत असतां त्यानें ऐकिला. तेव्हां, थ्युसिदिदिस् याच्या डोळ्यांतून अश्रुधारा चालल्या. त्या ग्रंथाच्या श्रवणानें तो इतका मोहित झाला कीं, तेव्हांपासून आपण असा ग्रंथ लिहावा असें त्यास वाटूं लागून पुढें तो जग-द्विख्यात इतिहासकार झाला.

ग्रीस देशांतील वक्तृशिरोमणि जो दिमास्थनीस् याचीहि अशीच चमत्कारिक कथा आहे. एके दिवशीं त्यानें कालिस्त्रेतस् नांवाच्या वक्त्याचें भाषण ऐकिलें, त्यामुळें तो इतका आनंदित झाला कीं, स्वतः वक्तृत्वकलेंत निपुण होण्याचा त्यानें निश्चय केला; परंतु हा त्याचा हेतु तडीस जाण्यास फारच अडचणी होत्या. तो जात्या अशक्त असून त्याचा स्वर व वर्णोच्चार चांगला नव्हता. इतक्या अडचणी होत्या, तरी त्यानें असा विलक्षण दृढनिश्चय केला कीं, पुष्कळ वर्षें सारखा अभ्यास करून वरील सर्व दोष नाहींतसे करून तो उत्तम वक्ता झाला. तो केवळ ग्रीस देशांतीलच नाहीं, पण सर्व जगांतील वक्तृमालिकेमध्यें आद्यमणि होऊन निरंतर प्रकाशमान होत आहे !

याप्रमाणें थोर पुरुषांच्या सान्निध्यानें मनुष्य शूर, विद्वान्, वक्ते, कवि, झाल्याचीं उदाहरणें इतिहासांत पुष्कळ सांपडतील. थोर पुरुषांच्या सान्निध्यापासून जें सुख होतें, तें दुसऱ्या कशानेंहि प्राप्त होणार नाहीं. एवढा थोरला महापराक्रमी शिवाजी, तथापि तो रामदास स्वामींच्या भेटीकरितां मोठा भुकेला असे. रामदासाच्या दर्शनानें त्यास जो आनंद होई, तसा दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीनें होत नसे. थोरले बाजीराव साहेब धावडशीच्या स्वामींच्या दर्शनास वारंवार जात. एवढे हुशार श्रीमंत थोरले माधवराव पेशवे, पण रामशास्त्रिबुवांप्रमाणें ते दुसऱ्या कोणास मान देत नसत. अगदीं आलीकडील उदाहरण प्रसिद्ध हरदास गोविंदबावा नाशिककर यांचें आहे. त्यांच्या गुणामुळें शिंदेसरकारचा व त्यांचा परिचय होऊन ते शिंदेसरकारचे गुरु झाले.

नीच मनुष्य असतात त्यांस दुसऱ्याचें वर्चस्व सहन होत नाहीं, पण सज्जन असतात त्यांस दुसऱ्याचा गुणांपासून मोठा आनंद होतो. तेच गुणग्राहक होत. दुसऱ्याचा अल्पस्वल्प गुण असला तरी ते त्याची वाखणणी केल्याशिवाय रहात नाहींत.

हेवा हा दुर्गुण त्यांच्या स्वप्नींही नसतो. असे पुरुष वंद्य होत. ह्मणूनच मयूरपंतांनीं ह्मटलें आहे:—

**ज्यांच्या हृत्कासारीं होय गुणस्नेहबिंदुही फार ।**
**सारज्ञ असूयोज्झित त्यांला माझा असो नमस्कार ॥ १ ॥**

मोरोपंत स्वतः एवढा कवि होता तरी तो दुसऱ्याच्या कवितेस फारच वाखाणीत असे. त्यानें वामनाच्या कवितेस ह्मटलें आहे:—

**रसभवना तत्कवना मानीं या तेंवि वामं न स्वा मी ॥**

तसेंच अमृतरायाविषयीं ह्मटलें आहे:—

**कीर्तनसुखार्थ झाला अवतारचि अमृतराय जीवांचा ।**
**भलत्या मुखांतुनि अशी सुरसखनि निघेल काय जी वाचा**

थोरांच्या भाषणांपासून व ग्रंथांपासून मनुष्याच्या अंतःकरणावर जो संस्कार होतो, तो कधींही नाहींसा होत नाहीं. रामायण व महाभारत यांतील कथा, व दादोजी कोंडदेव याचें संभाषण, यांपासून शिवाजीच्या अंतःकरणावर जो संस्कार झाला तो कधींही गेला नाहीं. त्यामुळें देशबंधूंस दुष्ट यवनांच्या पीडेपासून सोडविण्याचा त्याचा प्रयत्न मरेपर्यंत चालू होता. थोर पुरुषांचीं चरित्रें लिहून ठेवण्याचा उद्देश तरी हाच आहे कीं, तीं वाचून मनुष्याच्या अंतःकरणांत सद्वर्तनाची आवड उत्पन्न व्हावी.

एकाच कालीं सर्व ठिकाणीं बहुशः थोर पुरुष उत्पन्न होत नाहींत, व जेव्हां होतात तेव्हां तरी सर्वांस त्यांचा समागम घडतो असेंही नाहीं. परंतु चरित्रें लिहिलेलीं वाचल्यामुळें ते जसे काय आपणाजवळच सर्वदा आहेत असें वाटतें. त्यांचीं सत्कृत्यें वाचून क्षणभर मनुष्य आपलीं सर्व दुःखें विसरतो. तो संसारांत वागण्याचें धैर्य धरतो, आणि त्यांच्या सदाचरणाचें अनुकरण क-

१ सुंदर. २ बृहस्पतीचा.

रण्यास यत्न करतो. याकरितांच तुकारामबावांनीं ईश्वराजवळ 'संतसंग देईं सदा,' असें मागणें मागितलें आहे. ऐहिक व पारलौकिक सुखाचें साधन जें सद्वर्तन तें अंगीं ठसण्यास सत्संगति हें मुख्य साधन होय, याकरतां तें प्राप्त करून घेण्याचा सर्वांनीं यत्न करावा.

---

## भाग ४.

### उद्योग.

नात्मानमन्वमन्येत पूर्वाभिरसमृद्धिभिः ॥
आमृत्योः श्रियमन्विच्छेन्नैनां मन्येत दुर्लभाम् ॥ मनुः ॥
उद्योगिनं पुरुषसिंहमुपैतिलक्ष्मीर्दैवंप्रधानमितिकापुरुषावदंति ॥
दैवंनिहत्यकुरुपौरुषमात्मशक्त्या, यत्नेकृतेयदिनसिध्यतिकोत्रदोषः.
भर्तृहरि.

उद्योगामुळें मनुष्याच्या अंगीं सद्वर्तन बिंबून तें सतत रहातें. उद्योग हा मोठा मित्र होय. याकरितांच 'नास्त्युद्यमसमो बंधुः' असें कवीनें ह्मटलें आहे. उद्योग हा मोठा गुरु आहे. त्यापासून मनुष्याच्या अंगीं व्यवस्थितपणा, नम्रपणा, जितेंद्रियता, चित्तैकाग्र्य, दृढनिश्चय, इत्यादि गुण प्राप्त होतात. उद्योगाच्या योगानें मनुष्य आपल्या कामांत हुशार होऊन त्यास आपला संसार सुखानें करतां येतो.

उद्योग करून मनुष्यानें सुखी व्हावें असाच सृष्टिनियम दिसतो. कारण सृष्टीमध्यें सुखाचीं अनेक साधनें आहेत, परंतु तीं उद्योगाशिवाय प्राप्त होत नाहींत. व्यक्तीची किंवा समूहाची सुधारणा उद्योगाशिवाय होत नाहीं. श्रम केल्याशिवाय ज्यांचा निर्वाह होईल, असे लोक जगांत फारच थोडे आहेत. निर्वाहाकरितां श्रम करण्याची गरज नसली तरी सुखानें आपलें आयुष्य

जावें अशी ज्यास इच्छा असेल त्यानें कांहीं तरी उद्योग केलाच पाहिजे.

उद्योगापासून श्रम व त्रास होतो, तथापि त्याशिवाय कीर्ति व वैभव मिळणार नाहीं. त्याशिवाय कांहींच होणार नाहीं. आजपर्यंत जगांत ज्या चांगल्या गोष्टी झाल्या आहेत, त्या उद्योगामुळेंच झाल्या आहेत. सुधारणा हें उद्योगाचेंच फळ आहे. ज्या राष्ट्रामध्यें आळसाचें प्राबल्य झालें, त्याचा निःपात झालाच. याकरितांच 'आलस्यं हि मनुष्याणां शरीरस्थो महारिपुः' असें ह्मटलें आहे. या शत्रूनें अनेक बुद्धिमान् मनुष्य व संपन्न देश धुळीस मिळविले आहेत. शिकंदर बादशाहानें इराणी लोकांस जिंकून त्यांचें राज्य घेतलें तेव्हां तो ह्मणाला, "आळसानें विषयोपभोगांत काळ घालविणें, हा मोठा नीचपणा आहे, व उद्योग करणें हें मोठें भूषण आहे. ही गोष्ट इराणी लोकांच्या ध्यानीं मनीं सुद्धां नाहीं."

भरतखंडांतील प्राचीनकाळचे ऋषि व राजे मोठे उद्योगी होते, असें त्यांच्या इतिहासावरून सिद्ध होतें. पहांटेच्या प्रहररात्रीपासून तों आवशीच्या प्रहररात्रीपर्यंत कोणकोणतीं कामें करावयाचीं त्याविषयीं त्यांचे नियम बांधलेले असत. विद्या, कला, वगैरे कोणत्याहि गोष्टीविषयीं त्यांनीं आळस केला नाहीं. त्या वेळेस कृषिकर्माचें मोठें माहात्म्य होतें असें दिसतें. वेदांत पुष्कळ ठिकाणीं आह्मांस पशू पुष्कळ दे, आमचीं शेतें चांगलीं होऊं दे, पाऊस पुष्कळ पडूं दे, अशा प्रार्थना आढळतात.

प्राचीनकाळापासून चीन देशांत उद्योगाचें माहात्म्य मोठें आहे. निर्वाहाचे पदार्थ उत्पन्न करण्याविषयीं चिनी लोकांची आख्या आहे. निर्वाहाच्या पदार्थांकरितां दुसऱ्या देशाची गरज न बाळगणारा असा चीन देशासारखा दुसरा देश सांपडणें कठीण. ते लोक कोंड्याचा मांडा करणारे खरे. त्यांच्यांत प्राचीन काळापासून शेतकीची मोठी प्रतिष्ठा आहे. प्रतिवर्षीं शेतें पेरण्यास

आरंभ होतो तेव्हां मोठा उत्साह होतो. राजा स्वतः शेतांत जाऊन पेरणीस आरंभ करतो.

प्राचीनकाळीं युरोपखंडांत रोमन लोकांचा उदय होऊं लागला तेव्हां त्यांमध्यें शेतकीच्या धंद्यास मोठा मान असे. मोठमोठे वीर रणांगणांत पराक्रम करून परत आल्यावर आनंदानें शेतांत काम करीत. परंतु पुढें रोमन लोकांचें राज्य मोठें वाढून भरभराट झाली, तेव्हां शेतीचा धंदा हलकेपणाचा आहे असें वाटून तिकडे दुर्लक्ष झाल्यानें त्यांच्या संपत्तीनेंही मागें पाहण्यास आरंभ केला.

शिवाजीचे साह्यकारी मराठे हे आलीकडच्या मराठ्यांसारखे मिशांला पीळ घालून वांकडी पगडी घालून रिकामपणीं काळ घालविणारे असते, तर त्यांच्यानें एवढाले पराक्रम झालेच नसते. ते शेतांत काम करून शिवाजीस पाहिजे तेव्हां मदत करण्यास तयार असत. मराठ्यांचें राज्य स्थापन करून शिवाजी निवर्तल्यावर पुढें मराठे आयत्या पिठावर रेघा ओढूं लागले, तेव्हां त्यांच्यांत मराठमोळा वगैरे अनेक मूर्खपणाच्या चाली पडूं लागल्या. शेतकीचा धंदा उत्तरोत्तर लोक हलका मानूं लागले. पेशवाई व सातारचें राज्य नष्ट झाल्यावर मराठ्यांमध्यें इनामदार व जहागीरदार पुष्कळ होते; त्यांस राज्यकारभार नाहींसा झाला तेव्हां कालमानावर दृष्टि देऊन आपल्या जहागिरींच्या सुधारणेकडे त्यांनीं लक्ष लाविलें असतें तर आजपर्यंत कांहीं तरी त्यांचीं श्रीमान् कुटुंबें देशांत राहिलीं असतीं. पण कालमानाप्रमाणें पहिलें वैभव विसरून उद्योग करावा तो न करितां आळसानें वागून जहागिरी गहाण ठेवून कर्ज काढूं लागले. घरांतील भांडीं गहाण पडलीं तरी गोषाच्या बेतांत तिळमात्र अंतर पडावयाचें नाहीं, असें होतां होतां सर्व जहागिरी नष्ट झाल्या.

बाळाजी विश्वनाथ श्रीवर्धनाहून एकटा आला, परंतु मोठ्या उद्योगानें त्यानें आपल्या धन्याचें हित करून त्याची मर्जी संपा-

दिली. आपणास राज्य प्राप्त करून घेऊन ब्राह्मणांचें नांव गाजविलें. थोरल्या बाजीरावानें नुसतीं मक्याचीं कणसें घोड्यावरच खाऊन मोठाले पराक्रम करून मुसलमानांची खोड मोडून दिल्लीच्या दरबारीं आपलें वर्चस्व स्थापिलें. पुढें त्याचेच नांवकरी झाले, त्यांच्यानें पूर्वजांनीं मिळविलेल्या वैभवाचें रक्षण सुद्धां करवलें नाहीं. शत्रूंचा संहार करणारांची प्रतिष्ठा नाहींशी होऊन लाडूंचा संहार करणारांची प्रतिष्ठा वाढली. पुष्कळ खाणें हाच गुण होऊन दरबारीं त्याची शिफारस होऊं लागली. उद्योगाकडे दुर्लक्ष झाल्यामुळें आळसानें सर्वस्वनाश केला.

पटवर्धनाच्या कुटुंबांतील पूर्वीची अशी गोष्ट सांगतात कीं, जो युद्धांत पराक्रम करी त्यासच रुप्याचें ताट जेवावयास मिळत असे. वडिलांनीं मिळविलेल्या संपत्तीचा लेशमात्र राहिला आहे, तो संभाळण्याचें सामर्थ्य देखील त्यांच्या कुळांतील कित्येकांस नाहीं, अशी अपकीर्ति झाली आहे. त्यांच्या कुळांतील शेवटले पराक्रमी पुरुष चिंतामणराव अप्पा यांस उद्योगाची योग्यता कळत असे. त्यांची दंतकथा अशी सांगतात कीं, ते एके समयीं दरबारांत असतां 'अलिफ्टन' साहेब तेथें होते. रात्रीस जागरण झालेलें असल्यामुळें अप्पासाहेबांस दरबारांत डुलकी आली, तेव्हां साहेबांनीं त्यांस ह्मटलें, 'आपणास झोंप येत आहे.' त्यावर अप्पासाहेबांनीं उत्तर केलें कीं, 'आह्मांस झोंप लागल्यामुळेंच अशी दशा झाली.'

अंगांत आळस शिरूं न देण्याविषयीं प्रत्येकानें जपलें पाहिजे. पृथ्वीवर अमक्या देशांत आळस नाहीं असा देश सांपडणार नाहीं. सुधारलेले व रानटी अशा सर्व देशांत याचा थोडाबहुत अंमल आहेच. आळसामुळें दुसऱ्याच्या श्रमानें उत्पन्न झालेलें फळ बलात्कारानें लोक घेऊं लागले, यामुळें राजसत्ता प्रथमतः उत्पन्न झाली असावी, असें एका पंडिताचें मत आहे.

आळस जसा व्यक्तीचा शत्रु आहे तसा देशाचाही आहे. त्यापासून कोणत्याही प्रकारचें हित व्हावयाचें नाहीं. तो अंतःकरणांत

नेहमीं कंटाळा, त्रास, खिन्नता, यांस उत्पन्न करणारा आहे. एका इंग्लिश ग्रंथकारानें आळसाचें पुष्कळ वर्णन केलें आहे; त्यांतून कांहीं लिहितों.

"आळस हें शरीर आणि मन यांचें विष आहे. आळस वाईटपणाची माय आहे. आळस सर्व दुःखांची माता आहे. आळस हें महापातक आहे. आळशी मनुष्य हें पिशाचाचें घर व अस्वस्थतेची जागा आहे. मनाचा आळस शरीराच्या आळसापेक्षांही वाईट आहे. आळस हा मनाचा जंग व रोग आहे. हा साक्षात् नरकच होय. सांचलेल्या पाण्यांत जसे किडे पडतात, तसे आळशी मनुष्याच्या मनांत दुर्विचार वाढूं लागतात; त्यामुळें त्याची घाण होते. मी हें खास सांगतों कीं, जो मनुष्य आळशी आहे, तो कधींही श्रीमंत व्हावयाचा नाहीं; त्यास चांगले मित्र मिळावयाचे नाहींत; त्यास पाहिजे तो पदार्थ मिळाला तरी तो सुखी होणार नाहीं; त्याचें शरीर व मन कधींही स्वस्थ असणार नाहीं. तो नेहमीं थकलेला, भागलेला, उदास, त्रासिक, रोगी, दुःखी, कष्टी, कुरकुर करणारा, असा असेल. आपलें शरीर व मन हीं स्वस्थ राहून आपणास सुख व्हावें अशी ज्यास इच्छा असेल, त्यानें आळस सोडून दिला पाहिजे."

आळशी मनुष्य कांहींच करीत नाहीं असें नाहीं; इतकेंच कीं, तो जें करितो त्यापासून त्याचें हित होत नाहीं. त्याचे हातपाय निश्चळ असले तरी मन स्तब्ध राहणार नाहीं. मनांत सद्विचार आणले नाहींत तर त्यांत दुर्विचारांचा प्रादुर्भाव झाल्याशिवाय रहाणार नाहीं. मनुष्याचें मन स्वभावतःच असें आहे कीं, तें कधींही निश्चळ रहाणार नाहीं. यासाठींच गीतेंत सांगितलें आहे—

**न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् ॥**
**कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ॥ १ ॥**

मन निर्व्यापार करणें कोणाच्याही स्वाधीन नाहीं. सत्व, रज, तम, या गुणांच्या योगानें त्याचा कांहींतरी व्यापार चालू असणा-

रच. याकरितां तें सन्मार्गाकडे लावावें हाच कर्ममार्गाचा उद्देश होय. कर्ममार्गास असमंजसपणें हंसणारे कित्येक आधुनिक विद्वान् आहेत; परंतु शास्त्रकारांचा खरा उद्देश त्यांस कळत नाहीं असें ह्मटलें पाहिजे. कर्ममार्ग प्रतिपादन करणारे कर्म हें जड आहे, त्यापासून मुक्ति किंवा ईश्वरप्राप्ति होणार नाहीं, असें पक्कें समजत होते. ज्ञानापासून मुक्ति, हें ठिकठिकाणीं त्यांनीं प्रतिपादन केलें आहे. ज्ञान सत्वशुद्धीशिवाय होणार नाहीं, व सत्वशुद्धि कर्माशिवाय होणार नाहीं, ह्मणून त्यांनीं कर्ममार्गास इतकें महत्व दिलें आहे. कर्म हें शिक्षणासारखें आहे. अक्षर चांगलें व्हावें हा उद्देश असतो, पण कित्ता गिरविल्याशिवाय तो सिद्धीस जात नाहीं. युद्धकौशल्य संपादण्याची मनुष्यास योग्यता आहे, पण पुष्कळ दिवस कवाईत शिकल्याशिवाय तें येणार नाहीं. सुवर्णादि धातु तेजस्वी आहेत, परंतु ते अग्नितप्त केल्याशिवाय सुशोभित होणार नाहींत. त्याप्रमाणेंच मनुष्य ईश्वरप्राप्ति करून घेण्यास योग्य आहे, परंतु त्याकरितां त्यानें मोठा उद्योग केला पाहिजे. यःकश्चित् ऐहिक सुख सुद्धां श्रमाशिवाय प्राप्त होत नाहीं, मग पारत्रिक सुख सहज प्राप्त होईल काय? इंद्रियें दुराचरणापासून निवृत्त व्हावीं हाच कर्ममार्गाचा मुख्य उद्देश होय. कर्ममार्ग साधनभूत असून ज्ञानमार्ग साध्यभूत आहे असें न समजतां ज्ञानमार्गास विसरून कर्माचेंच प्राबल्य वाढविणें हा मूर्खपणा होय. तथापि कर्ममार्ग अगदींच सोडून दिला तर ज्ञानमार्ग कळणार नाहीं. ऋषींच्या कर्ममार्गास अन्यधर्मी लोक हंसतात, परंतु त्यांचा धर्म तरी कर्ममार्गापासून अगदीं सुटला आहे काय? जर सुटला तर तो नास्तिक्याच्या बरोबरीचाच होईल. नियमित दिवशीं नियमित कालीं प्रार्थनादि करणें हाही एका प्रकारचा कर्ममार्गच आहे. ज्ञानमार्गांत पारंगत असे जनकादि महासाधुही कर्ममार्गाचें खरें स्वरूप ओळखून तो आचरित होते. परंतु त्याचें खरें स्वरूप न ओळखिल्यामुळें देशांत खोटा वेदांत माजून अनेक ढोंगी व निरुद्योगी

मनुष्य उत्पन्न झाल्यामुळें ज्ञानकर्मसमुच्चयानें ऋषींनीं मिळविलेलें आर्यभूमीचें महत्व नष्ट झालें. असो, तात्पर्य सांगणें एवढेंच कीं, आळस टाकून उद्योग करून परोकारादि सत्कर्मे आचरल्याशिवाय इहलोक किंवा परलोक यांतून एकाचेंही साधन होणार नाहीं.

आळसानें कोणाचें हित झाल्याचें उदाहरण जगांत सांपडत नाहीं, पण उद्योगानें रंकाचे राव, मूर्खांचे पंडित, संसाऱ्यांचे साधु, असे झाल्याचीं उदाहरणें पुष्कळ आहेत. बाळाजी विश्वनाथ कारकुनाचा पेशवा झाला, रामशास्त्री मूर्खाचा पंडित झाला, तुकाराम संसारी असून साधु बनला. उद्योगानें मनुष्य थकून झिजेल, परंतु आळसानें जशाचा तसा कुजून जाईल. एका इंग्लिश ग्रंथकारानें ह्मटलें आहे कीं, मनुष्याचें मन जांत्यासारखें आहे. त्यांत दाणे घातले तर पीठ निघेल, पण कांहींच न घालतां फिरविलें तर स्वतःच झिजेल.

आळशी मनुष्य मी काम करीत नाहीं, असें कधींही ह्मणणार नाहीं, कांहींतरी सबब तो पुढें काढीलच. आळशास कोणा गृहस्थाकडे जाऊन ये ह्मटलें तर, पहिलें त्याचें उत्तर मला घर ठाऊक नाहीं. बरें घराची खुणा सांगितली तर तो ह्मणणार जाऊन उपयोग काय? या वेळेस तो गृहस्थ घरींच नसतो. एका इंग्लिश गृहस्थानें एका आळशी मुलास असें लिहून पाठविलें कीं, मी तुह्मांस आळसांत वेळ घालविण्याबद्दल दोष दिला तो अगदीं खरा आहे. तुह्मी ज्या विलक्षण सबबी लिहितां, त्याचें मुख्य कारण तुमचा निरुद्योगीपणा होय; दुसरें कांहीं नाहीं. तुमचा कोटिक्रम असा आहे:—प्रत्येक मनुष्य आपल्या शक्तीप्रमाणें चांगलें करतो. जो करीत नाहीं त्याच्यानें होत नाहीं असें ह्मटलें पाहिजे. तुह्मी लिहित नाहीं, ह्मणून तुह्मांस लिहितां येत नाहीं. तुह्मांस उद्योग करण्याची इच्छा नाहीं, यावरून तुह्मांस बुद्धि नाहीं. वा! काय वर्णनीय रीत आहे! जगांत सर्वांनीं ही स्वीकारली तर काय उत्तम परिणाम होतील!

श्रमाशिवाय एकादी वस्तु मिळावी, असें मनुष्यास वाटणें हें त्याच्या मूर्खपणाचें लक्षण होय. कोणतीही वस्तु तिची किंमत दिल्याशिवाय मिळावयाची नाहीं. उद्योग केल्याशिवाय खरी विश्रांतिही मिळावयाची नाहीं. उद्योग ही विश्रांतीची किंमत समजली पाहिजे. उद्योग केल्यावर जी विश्रांति घ्यावी, तिजपासून मनास खरा आल्हाद होतो. पुढील उद्योग करण्याविषयीं तिजपासून उत्साह येतो. ज्यास काम नाहीं किंवा असून करीत नाहीं, त्यास विश्रांतीचा कंटाळा आल्याशिवाय रहाणार नाहीं. मनुष्य गरीब किंवा श्रीमंत कसाही असला तरी त्यास उद्योग अवश्य पाहिजे. उद्योग करणें हें मनुष्याचें कर्तव्यच आहे. जो मोठ्या श्रीमान् कुलांत उत्पन्न झाला आहे त्यानें असें समजलें पाहिजे कीं, माझ्या पूर्वजांनीं पुष्कळ श्रम करून ही संपत्ति मिळविली आहे; कारण प्रथमतः श्रम केल्याशिवाय संपत्ति कोणास आपोआप मिळत नाहीं. दुसऱ्यांच्या उद्योगानें आयती संपत्ति मिळून माझें कल्याण झालें आहे तर त्याप्रमाणें मलाही उद्योग करून कांहीं तरी दुसऱ्यांचें कल्याण केलें पाहिजे. मला आयती संपत्ति मिळाली आहे, हें उद्योग करण्यास मला विशेष कारण आहे. कारण खाण्यापिण्याची सोय नाहीं ही दरिद्र्यास उद्योग न करण्याविषयीं सबब आहे; पण मला तसें ह्मणतां येत नाहीं. खरा प्रामाणिक आहे त्यानें एकाद्या दुकानांतून उधार जिन्नस आणला आणि त्याबद्दलचे पैसे मागण्यास दुकानदार विसरला, तरी तो पैसे दिल्याशिवाय रहाणार नाहीं; त्याप्रमाणें जो खरा प्रतिष्ठित आहे, तो स्वतः निरुद्योगी राहून केवळ दुसऱ्याच्या श्रमानें संपादिलेल्या संपत्तीचा उपभोग घेण्यांत मोठेपणा मानणार नाहीं.

एका विद्वान् इंग्लिश ग्रंथकारानें आळशी मनुष्याचें सुंदर वर्णन केलें आहे त्याचें तात्पर्य लिहितों.

निरुद्योगी मनुष्य मोठा प्रतिष्ठित व सुस्वभावी असला तरी तो सुखी असेल असें मला वाटत नाहीं. उद्योग हें आपलें जीवन

आहे. मीं एकाद्याचा उद्योग पाहिला तर तो मनुष्य कसा आहे हें सांगेन. उद्योगाची आवड हें हलकेपणा आणि दुर्व्यसनें यांस दूर ठेवण्याचें साधन आहे. मी आणखी असें ह्मणतों कीं, संसारांतील सुखाच्या इच्छेनें उत्पन्न होणाऱ्या अनेक काळज्या व दुःखें यांचें निरसन करण्याचा उपाय उद्योग होय. पुष्कळ मनुष्यांस आजपर्यंत असें वाटलें आहे कीं, आपण स्वस्थ बसलों ह्मणजे श्रम व त्रास होणार नाहीं; परंतु सर्वांस अशा समजुतीचा एकच परिणाम कळून आला कीं, काळजी व श्रम यांपासून मनुष्य सुटणार नाहीं; हीं त्याच्या दैवीं लिहिलींच आहेत. जे श्रमापुढें जाण्यास भितात, त्यांकडे श्रमच चालून येतो. आळशाला वाटतें कीं, इतरांपेक्षां मी कमी श्रम करीन; पण सृष्टीचा नियम असा आहे कीं, श्रम आणि दुःख या उभयतांची बेरीज सारखीच होते. जेथें श्रम कमी तेथें दुःख फार व जेथें श्रम अधिक तेथें दुःख कमी. आळशास जो थोडा श्रम करावा लागतो, तोच त्यास पुष्कळ व कठीण वाटतो. जो केवळ आपल्याच सुखाची इच्छा करतो, त्यास लवकरच कळून येईल कीं, आळसाच्या स्वाधीन होणें फार वाईट आहे. आळस हा मोठा वाईट धनी आहे. जो श्रमाच्या भयानें मोठा उद्योग करण्यास कंटाळतो त्यास आपोआप शिक्षा होते. कारण लहानसहान कामेंच त्यास बिकट वाटूं लागतात. उद्योगांत काळ घालविल्यानें जो त्रास होतो, तसाच निरुद्योगी राहिल्यानें मनांत अनेक काळज्या उत्पन्न होऊन सोसावा लागतो. भेद इतकाच कीं, उद्योगाच्या त्रासापासून सुख होतें व आळसाच्या त्रासापासून दुःख होतें.

केवळ आपल्या शरीराचें सुख ह्मटलें तरी त्यासही उद्योग अवश्य आहे. श्रम केल्याशिवाय श्रमाचें सुख मिळणार नाहीं. उद्योग केल्यावर झोंप लागलीच येते आणि जागेपणीं उद्योगांत घालविलेला काळ सुखानें जातो. उद्योग करून आपलें कर्तव्य केल्यानंतर जो विसावा मिळतो, त्यापासून समाधान होतें.

पुष्कळ वेळां अतिश्रमानें उरीं फुटून मनुष्य मरतो ही गोष्ट खरी आहे, पण आळसानें व दुर्व्यसनानें प्रकृति बिघडून मेल्याचीं उदाहरणें त्यापेक्षां पुष्कळ सांपडतील. उद्योगानें मनुष्य मरतात याचें कारण बहुशः असें दिसतें कीं, ते आपल्या प्रकृतीस जपत नाहींत. एक विद्वान् असें ह्मणतो कीं, आरोग्यरक्षणाच्या नियमांप्रमाणें व्यवस्थितपणें वागलें असतां केवळ पुष्कळ श्रमानें मनुष्याच्या शरीरास इजा होईल कीं नाहीं, याविषयीं संशय वाटतो.

आळशी मनुष्य पुष्कळ दिवस वांचला तरी त्याचें आयुष्य व्यर्थ होय. थोडे दिवस वांचूनही ज्यानें पुष्कळ सत्कृत्यें केलीं तोच खरा चिरायु होय. याकरितां कवीनें ह्मटलें आहेः—

***यज्जीव्यते क्षणमपि प्रथितं मनुष्यै-**
**र्विज्ञानशौर्यविभवार्यगुणैः समेतम् ॥**
**तन्नाम जीवितमिति प्रवदंति तज्ज्ञाः**
**काकोपि जीवति चिरं च बलिं च भुंक्ते ॥ १ ॥**

स्त्री असो किंवा पुरुष असो, त्यास संसारांत खरा सुखोपभोग होण्यास उद्योगाची संवय असणें अवश्य आहे. आळसानें स्वतःला दुःख होऊन जवळच्या लोकांस आपला कंटाळा येतो. अतिश्रम करणें शरीरास वाईट आहे, पण तें देखील आळसापेक्षां बरें.

आलीकडे आमच्या देशांत श्रीमंतांच्या बायका बहुशः संसारकामास अगदीं निरुपयोगी व अशक्त असतात. खाणेंपिणें चांगलें असून त्यांच्या शरीरास व्यायाम ह्मणून कसा तो माहीतच नाहीं, असें ह्मटलें तरी चालेल. पाण्याचा तांब्या देखील हातानें उचलण्याचा प्रसंग नाहीं. कित्येकींस तर अंगांतील चोळी देखील काढण्यास कुळंबीण लागते. तेवढे श्रम करणें सुद्धां हलकेपणा वाटतो. श्रीमंतांच्या घराण्यांतील पुरुष देखील बहुशः असेच. बायकांसारखे

---

* विद्या, पराक्रम, ऐश्वर्य इत्यादि श्रेष्ठ गुणांनीं युक्त असें जें आयुष्य तें अल्प असलें तरी तेंच आयुष्य होय, असें शहाणे लोक ह्मणतात, नाहीं तर कावळा देखील पुष्कळ दिवस वांचतो आणि बळी खातो.

त्यांस कोंडून रहावयाचें नसतें ह्मणून एकाद्या वेळेस बाहेर जाण्यास तरी सांपडतें; पण बायकांस तेंही नाहीं. अशा स्थितीमुळें श्रीमंतांच्या घरांत संततीची बहुशः मारामार. कित्येक पिढ्यांपर्यंत दत्तक घेण्याचा प्रसंग आला नाहीं अशीं फारच थोडीं घराणीं सांपडतील. संतति होण्याचीं खरीं कारणें न जाणतां मुलें होण्याकरितां श्रीमंत उलट उपाय करितात तो हा कीं, एकानें दोन, तीन, कधीं कधीं चार देखील बायका करावयाच्या. या उपायांनीं संतति होणें तर एकीकडेसच रहातें, पण घराण्यांत सवतीमत्सर माजून अनेक तंटेबखेडे व दुराचरण हीं मात्र वाढतात. चाकरांकडून काम करवूं नये असें नाहीं; पण तसें करून श्रीमंतांनीं आपल्या शरीरास इजा करून घ्यावी हें चांगलें नाहीं. चाकरांकडून हलकें काम करवून त्या वेळांत आपण अधिक योग्यतेचें काम करावें ही गोष्ट श्रीमंतांनीं ध्यानांत ठेविली तर त्यांचें कल्याण होईल. व्यायामामुळें गरीबांस साध्या जेवणापासून जें सुख होतें तें श्रीमंतांस पक्वान्नापासूनही होत नाहीं. काम केल्यानंतर गरीबांस सुखावह झोंप लागून जी विश्रांति मिळते ती आळसांत बसणाऱ्या श्रीमंतांस मिळत नाहीं. पेशवे व पटवर्धन यांचे पूर्वज हल्लींच्या श्रीमंतांप्रमाणें आळशी असते तर त्यांच्यानें एवढाले पराक्रम झाले नसते.

स्कात्लंद देशांत सर वाल्तर स्कात् ह्मणून एक विलक्षण उद्योगी पुरुष होऊन गेला. हा मोठा विद्वान् व नामांकित ग्रंथकार असून मोठा निगर्वी, सुशील व प्रामाणिक असा होता. त्यानें आपल्या मुलास उपदेश केला आहे. त्याचें तात्पर्य असेंः—

"मुला, उद्योगाचें महत्व तुला सांगावें तितकें थोडेंच. मनुष्य कोणत्याही स्थितींत असला तरी ईश्वरानें त्याच्या पाठीमागें उद्योग लाविलाच आहे. शेतकऱ्यानें निढळाच्या घामानें मिळविलेल्या भाकरीपासून तो श्रीमंतांच्या चैनीच्या मौल्यवान् पदार्थापर्यंत कोणतीही वस्तु असली तरी श्रम केल्याशिवाय ती प्राप्त

होण्यांत कांहीं अर्थ नाहीं. ज्ञानाविषयीं ह्मटलें तर, पूर्वीं नांगरणी केल्याशिवाय शेतांत धान्य पेरितां येत नाहीं; तसें श्रम केल्याशिवाय मनुष्याच्या मनांत ज्ञानांकुराचा प्रादुर्भाव होणार नाहीं. ज्ञानाचें पीक आणि धान्याचें पीक यांत खरोखर मोठा भेद आहे; तो हा कीं, कांहीं गोष्टी घडून आल्यामुळें शेतकऱ्यानें पेरलेल्या शेताची कापणी दुसरा कोणीही करील, परंतु कसाही बिकट प्रसंग किंवा मोठें दुर्दैव आलें तरी एकाच्या अभ्यासाचें फळ दुसऱ्यास मिळवितां येणार नाहीं. मनुष्य आपल्या उपयोगाकरितां जो मोठा ज्ञानाचा संचय करील तो त्यापासून कोणासही हिरावून घेतां येणार नाहीं. याकरितां प्रियपुत्रा, श्रम करून वेळ चांगल्या रीतीनें घालीव. लहानपणीं आपल्या अंगांत चलाखी असून आपलें मन विकास पावण्यास योग्य असतें. त्यांत ज्ञानाचा संग्रह सुलभ रीतीनें करितां येतो. जर आपल्या वसंतऋतूमध्यें आपण हयगय केली तर आपला उन्हाळा व्यर्थ जाऊन त्रासदायक होईल, आपल्या पिकांचें भुसकट होईल, आणि बार्धक्यरूप हिंवाळा ओसाड होऊन फजिती होईल."

उद्योग हा मोठा गुरु होय, असें मागें सांगितलेंच आहे. उद्योग करून निष्फळ झाला तरी तो आळसापेक्षां बरा. त्याच्या योगानें आपल्या मनाची व शरीराची शक्ति कायम राहून दुसरा उद्योग केला असतां तो सफल होतो. वेळाची एकदा खरी योग्यता कळली तर मनुष्य क्षण देखील व्यर्थ घालविणार नाहीं. उद्योगानंतर जी त्यास विश्रांति मिळेल, तिजपासून त्यास मोठें सुख होईल.

उद्योगाशिवाय अंगीं सद्वर्तन बिंबणार नाहीं. आजपर्यंत जगांत जे सत्पुरुष होऊन गेले ते सर्व मोठे उद्योगी होते. मनुष्य कोणत्याही स्थितींत असो, त्यास उद्योग करणें भाग आहे. राज्य, सुधारणा, कलाकौशल्य, विद्या, हीं सर्व मनुष्यांच्या उद्योगाचीं फळें आहेत; यांपासून आपलें कल्याण झालें आहे, तर आपण

उद्योग करून ऋणमुक्त होणें हें मनुष्याचें कर्तव्य आहे. ऋण फेडणें न आवडलें तरी तें फेडलेंच पाहिजे, असेंच श्रम करणें आपणास आवडलें नाहीं तरी तो केला पाहिजे. दुसऱ्याच्या श्रमानें झालेली कोणतीही वस्तु मी घेणार नाहीं, असें ह्मटलें तर मनुष्याचें जीवन होईल काय? असें आहे तर उद्योग न करितां आळसांत वेळ घालविणें हें मनुष्यानें पातक समजलें पाहिजे.

संसारांत उद्योगासारखें सुखाचें साधन कोणतेंच नाहीं. उद्योग बुद्धीपेक्षांही श्रेष्ठ आहे. साधारण बुद्धिमान् असून उद्योगानें महत्वास चढलेले असे पुरुष जगांत पुष्कळ सांपडतील. तसेंच मोठे बुद्धिमान् असून आळसानें अंधेरांत राहिलेले, असेही अनेक आहेत. कित्येकांस असें वाटतें कीं, मोठे बुद्धिमान् असतात ते शारीरश्रम फार करीत नाहींत, पण ही चूक आहे. शारीरश्रमाशिवाय जगांत उदयास आलेला पुरुष सांपडणें कठीण. जे फार श्रम करितात तेच जगांत पुढारी होतात. राजकीय पुरुष स्वस्थ बसतील तर राज्यांत त्यांचें वजन रहाणार नाहीं. बाळाजी विश्वनाथ, नानाफडणवीस इत्यादि राजकार्यधुरंधर पुरुष आळशी असते तर शाहू महाराज व पेशवे यांचे दरबारीं त्यांचें एवढें वजन वाढलें नसतें. मुसलमानी राज्यांत अकबर याची जी कीर्ति जगांत वाढली आहे, ती केवळ त्याच्या शहाणपणानें झाली नसती. तो जसा शाहाणा होता तसा मोठा उद्योगीही होता; ह्मणूनच त्याचें नांव अजरामर झालें आहे.

जगांत आजपर्यंत जे कीर्तिमान् व विद्वान् ग्रंथकार झाले, त्यांचेंही असेंच आहे. शांतपणानें सतत सारखे श्रम केल्यामुळें त्यांचीं नांवें जगांत गाजत आहेत. कोणत्याही शास्त्रावर प्रसिद्ध ग्रंथ लिहिणाऱ्याच्या श्रमाचा मोठा चमत्कार वाटतो. गदाधरीसारखा न्यायशास्त्रावरील ग्रंथ लिहिण्यास गदाधरास किती श्रम पडले असतील! खरोखरच कौमुदीप्रमाणें ज्याचा उदय जगांत सुखावह झाला आहे, ज्याचें अध्ययन आजपर्यंत कोट्यवधि लोकांनीं केलें

असेल, असा व्याकरणशास्त्राचा सिद्धांतकौमुदी हा ग्रंथ लिहिण्यास महापंडित भट्टोजी दीक्षित यांस किती श्रम करावे लागले असतील! महाभाष्यादि विशाल ग्रंथांचें लक्षपूर्वक अवलोकन करून व दुसऱ्या अनेक पंडितांचे अपसिद्धांत खोडून व्याकरणशास्त्राचें अध्ययन सुलभ होण्याकरितां नवा मार्ग काढून कौमुदीसारखा ग्रंथ लिहिणें ह्मणजे अत्यंत दुर्घट काम होय. उदाहरणाकरितां त्यांनीं दिलेलीं अन्य ग्रंथांतील अवतरणें वाचून त्यांची ग्रंथोपस्थिति मनांत आणिली तर अक्कल गुंग होते. त्यांचेच टीकाकार नागोजी भट्ट हे शृंगेरीच्या रामराजाजवळ आश्रित होते, त्या पुरुषाच्याही सामर्थ्याचें व श्रमाचें आश्चर्य वाटतें. ज्या ग्रंथांचें अध्ययन करण्यास पुष्कळ वर्षें पुरणार नाहींत, असे केवळ अर्थविचाराचे अनेक ग्रंथ लिहिण्यांत त्यानें आपलें आयुष्य् घालवून आपली व आपल्या यजमानाची कीर्ति चिरस्थायी केली. अधिकरणरत्नमाला, अद्वैतसिद्धि, इत्यादि मीमांसा व वेदांतशास्त्रावरील ग्रंथकारांचेही श्रम असेच चमत्कार वाटण्यासारखे आहेत. अलंकारशास्त्रावरील काव्यप्रकाशादि ग्रंथकारांचे श्रमही वर्णनीय आहेत. तात्कालीन सर्व काव्यांचें अवलोकन करून अलंकारांचे वर्ग बांधून त्यांचीं लक्षणें बसविणें हें काम लहान काय? ज्योतिषशास्त्रावर ग्रंथ लिहिणारे आर्यभट्ट, वराहमिहिर, भास्कराचार्य, यांच्याही विचारशक्तीचा व श्रमांचा चमत्कार वाटतो. आर्यभट्टाच्या ग्रंथावरून परद्वीपस्थ लोकांनीं ज्योतिष लिहिलें असें इतिहासशोधक विद्वान् ह्मणतात. वराहमिहिराच्या ग्रंथांत अनेक प्रकारची माहिती आहे. भास्कराचार्यांच्या वेळीं वेध घेण्याचीं वगैरे साधनें हल्लींप्रमाणें नसून त्यानें बसविलेले सिद्धांत अद्याप निर्दोष ठरले आहेत. हे सिद्धांत ठरविण्याकरितां ज्योतिषशास्त्राचा अभ्यास करण्यास किती श्रम करावे लागले असतील! असा पुरुष जगांत दुर्मिळ ह्मणण्यास हरकत नाहीं. असाच वैद्यशास्त्रावर ग्रंथ लिहिणारा वाग्भट हा पुरुष होय. याची बुद्धिमत्ता व माहिती अवर्णनीय होय.

कालिदासासारखे कवि घेतले तरी त्यांचे श्रम लहान आहेत काय? कालिदासाच्या अंगीं प्रतिभा ह्मणजे कविताशक्ति स्वाभाविक असेल, परंतु ती अतिश्रमाशिवाय उदयास आली नाहीं यांत संशय नाहीं. त्या कालच्या लोकस्थितीकडे लक्ष दिलें तर रघुवंश, मेघदूत, इत्यादि काव्यांत कालिदासाचें भूगोलज्ञान दिसून येतें, त्याचा मोठा अचंबा वाटतो. तशींच पुराणें, शास्त्रें, लोकस्थिति व सृष्टिरचना, यांविषयींची माहिती त्याच्या ग्रंथांत दिसून येते, तिचें वर्णन करावें तितकें थोडेंच. अशीं प्राचीन काळीं होऊन गेलेल्या उद्योगी पुरुषांचीं अनेक उदाहरणें देतां येतील. असे पुरुष होऊन गेले ह्मणूनच भरतखंड सुधारलेल्या देशांमध्यें श्रेष्ठ होतें. सुधारणा ह्मणजे उद्योगी पुरुषांच्या उद्योगांचें एकीकरण असें ह्मणण्यास हरकत नाहीं. सध्या आर्यभूमि तिच्या हल्लींच्या पुत्रांच्या आळसामुळें दास्य पावली आहे; तरी पूर्वींच्या पुत्रांच्या कीर्तीमुळें तिला थोडाबहुत मान परद्वीपीं मिळत आहे; तो कायम ठेवणें किंवा वाढविणें या गोष्टी तिच्या हल्लींच्या बालकांच्या महाप्रयत्नाशिवाय होणार नाहींत. मराठी भाषेंतील प्रसिद्ध कवि मोरोपंत याच्याहि उद्योगाचें मोठें आश्चर्य वाटतें. त्यानें केलेलीं काव्यें एकवार वाचूं ह्मटलें तर होणें कठिण आहे. इतका ग्रंथ रचून लिहिण्यास किती उद्योग करावा लागला असेल!

पेशव्यांच्या पदरचे रामशास्त्री यांचेंहि उद्योगाविषयीं उदाहरण लक्षांत ठेवण्यासारखें आहे. राम्या शागीर्दाचे रामशास्त्रीबावा होण्यास केवढा उद्योग व किती श्रम करावे लागले असतील! तसेंच नीलकंठशास्त्री थत्ते, राघवेंद्राचार्य गजेंद्रगडकर, मोरशास्त्री साठे, त्र्यंबकशास्त्री शाळिग्राम, हे विद्वान् पुरुषहि मोठे उद्योगी होते. मोरशास्त्री मोठे बुद्धिमान् होते खरे, तथापि त्यांस उद्योगाचा तिळमात्र कंटाळा नसे. पहिल्यानें हे मोरभट्ट नांवाचे वैदिक होते. पुढें पुण्यास येऊन नीलकंठशास्त्री यांपाशीं न्यायशास्त्राचें

अध्ययन करून त्यांच्या विद्यार्थ्यांत अग्रगण्य झाले. पूर्वीं अनेक शास्त्रें ह्मणण्याची चाल असे, तेव्हां प्रथम व्याकरणशास्त्र ह्मणून मग न्यायशास्त्र ह्मणत; कारण न्यायशास्त्र ह्मणणाऱ्यांपेक्षां व्याकरणशास्त्र ह्मणणाऱ्यांस पुष्कळ ग्रंथ घोकून तोंडपाठ पुष्कळ करावे लागतात, मोठेपणीं हें काम होत नाहीं. मोरशास्त्रीबावांस कोणीं ह्मटलें कीं, न्यायशास्त्र ह्मटल्यावर व्याकरण कोणी ह्मणत नाहीं. त्यावर शास्त्रीबावा ह्मणाले, कोणी ह्मणत नाहीं ह्मणूनच मी ह्मणतों; असें ह्मणून त्यांनीं व्याकरणाचा अभ्यास केला. पुढें पाठशाळेचे मुख्य गुरु झाल्यावर ह्यांनीं इंग्रजी शिकण्यासहि आरंभ केला होता; परंतु शिंदेसरकारांनीं न्यायाधीशाची जागा देऊन आपल्या राज्यांत त्यांस नेल्यामुळें तो तसाच राहिला. रघुनाथशास्त्री पर्वते यांनीं कारागृहांत असतां गीतेवर भाषाविवृत्तिनामक ग्रंथ लिहिला आहे.

जगांत पूर्वीं जसा भरतखंडाचा लौकिक होता, तसा आतां नाहीं. तशींच पूर्वींच्या विद्वानांसारखीं हल्लींचीं उदाहरणें देतां येणार नाहींत. तथापि कालमानाप्रमाणें सांप्रतहि कांहीं उदाहरणें देतां येतील. बंगाल्यांत राममोहनराय यांसारखे पुष्कळ उद्योगी पुरुष झाले, व हल्लींहि बाबु राजेंद्रलाल मित्र, तारानाथ तर्कवाचस्पति यांसारखे आहेत. त्यांची कीर्ति युरोप व अमेरिका खंडांत गेली आहे. आपल्या महाराष्ट्र देशांतहि आलीकडे बरेच उद्योगी व विद्वान् पुरुष झाले. या विद्वन्मालिकेंतील पहिलें रत्न **बाळशास्त्री** जांभेकर हें होय. यांनीं थोडक्याच आयुष्यांत पुष्कळ श्रमानें बहुत विद्या संपादून सदाचरणानें मोठी कीर्ति मिळविली. हे पहिले शास्त्री असून पुढें इंग्रजी वगैरे दुसऱ्या भाषेंत निष्णात होऊन उत्तम ग्रंथकार झाले. मराठी भाषेच्या व्याकरणाचा पाया प्रथम यांनींच घातला. पुढें दादोबा पांडुरंग व कृष्णशास्त्री गोडबोले यांनीं पुष्कळ श्रम करून मराठी व्याकरणावर ग्रंथ लिहिले. बाळशास्त्री यांच्या अल्पायुष्यामुळें महाराष्ट्रदे-

शाची मोठी हानी झाली. बाळशास्त्री स्वभावानें मोठे दयाळु, परोपकारी व उदार, असे असत. त्यांची साहेबलोकांत मोठी प्रतिष्ठा होती. बाळशास्त्री यांच्या पाठीमागून झालेले दुसरे मोठे उद्योगी व विद्वान् **भाऊ दाजी** हे होते. वाडी प्रांतांत यांचें घर होतें, तेथून मुंबईस येऊन यांनीं इंग्रजी भाषेचा अभ्यास करून मुंबईतील सरकारी वैद्यशाळेंत इंग्रजी वैद्यशास्त्राचा अत्युत्तम अभ्यास करून त्यांत प्रवीण झाले. आपल्या धंद्यावर पैसा मिळवून ऐश्वर्य भोगण्यांत त्यांनीं काळ घालविला नाहीं. देशहिताकरितां त्यांनीं आपल्या ज्ञानाचा व श्रमाचा फार उपयोग केला. प्राचीन विद्या व कला यांचा शोध लावण्याचें यांस व्यसन लागल्यासारखेंच झालें होतें. प्राचीन ग्रंथ मिळविण्याकरितां यांनीं पदरचे हजारों रुपये खर्च केले, अनेक स्थळीं जाऊन पुष्कळ माहिती मिळविली, व त्याविषयीं पुष्कळ निबंध मुंबईतील विद्वानांच्या सभेंत वाचून छापून प्रसिद्ध केले. भाऊ दाजी यांस विद्येचा मोठा शोक असे, त्यामुळें ते विद्वानांचा मोठा मान करीत. ते अलीकडचे विद्वान् होते, तरी जुन्या शास्त्री लोकांस आपलेकडे बोलावून शालजोड्या वगैरे देऊन त्यांचा मोठा मान करीत. यांचें आचरण फारच उत्तम होतें. परोपकार व औदार्य हे दोन गुण तर त्यांच्या अंगीं नेहमीं वास करीत असत. ते शेंकडों गरीब लोकांस फुकट औषधें देत. जसा त्यांनीं पैसा फार मिळविला तसाच खर्चिला. खर्चाचा प्रसंग आला ह्मणजे मागें पुढें कधींहि त्यांनीं पाहिलें नाहीं. यांनीं महारोगावर औषध शोधून काढण्यास पुष्कळ यत्न केला, तो कांहीं अंशीं सिद्धीस गेला होता, परंतु



डाक्टर भाऊ दाजी.

पुढें त्यांवर लक्ष्मीची अवकृपा झाल्यामुळें तसाच राहिला. भाऊ दाजी यांच्या नांवाचा लोकांस विसर पडणार नाहीं.

**भास्कर दामोदर पाळंदे** हे गृहस्थहि मोठे प्रसिद्ध होते. हे अगदीं गरीब घराण्यांत जन्मले असून यांची प्रकृति फार अशक्त होती; तरी त्यांनीं नियमितपणानें शरीर चांगलें राखून व श्रम करून पुष्कळ विद्या केली. यांचा इंग्रजी भाषेचा अभ्यास उत्तम झाल्यावर त्यांस प्रथम शाळाखात्यांत जागा मिळाली. कांहीं दिवसांनीं त्यांस इनामाच्या खात्यांत जागा मिळून शेवटीं त्यांस अहमदनगर येथें न्यायाधीशाची मोठी जागा मिळाली.



भास्कर दामोदर पाळंदे.

पूर्वींपासून न्यायखात्यांत काम केलें नव्हतें तरी त्यांस कायद्यांची व कामकाजाची इतकी माहिती होती कीं, त्यांच्या कामास कोणींहि नांवें ठेविलीं नाहींत. पुढें पुणें, मुंबई, येथें गेल्यावरहि ते आपल्या कामांत फार हुशार असत. इतकें असून ते मोठे विद्याव्यसनी असत. त्यांस ग्रंथावलोकनाचा फार नाद असे. कांहीं दिवस त्यांनीं मराठी कवितेचा पुष्कळ व्यासंग करून मराठी कवींवर एक निबंध लिहिला, तो प्रसिद्ध आहे. त्यांचा स्वभाव फारच शांत व

धार्मिक असे. ते आपल्या बोलण्यानें किंवा कृतीनें कोणास दुखवीत नसत, व धर्माकडे पुष्कळ पैसा खर्चीत. शेवटीं त्यांचें चित्त सर्वकाळ भक्ति व वेदांत या विषयांकडे लागलेलें असे. रत्नमाला नांवाचें त्यांचें पुस्तक प्रसिद्धच आहे. त्यांनीं भगवद्गीतेवर प्राकृत टीका केली आहे, ती छापून प्रसिद्ध झाली आहे.

जुन्या लोकांच्या सहवासांत असून इंग्रजी राज्याच्या आरंभीं विद्येच्या योगानें उदयास आलेले बाळशास्त्री जांभेकर, भाऊ दाजी वगैरे गृहस्थ यांमध्यें औदार्यादि जे कांहीं सद्गुण असत ते आलीकडील केवळ परद्वीपस्थ गुरूंच्या शिक्षणानें जे विद्वान् झाले त्यांच्या अंगीं विरल आढळतात ही दुःखाची गोष्ट आहे. इंग्रजांचा मुख्य गुण स्वहितपरता, हा स्वरूपतः दोष आहे असें नाहीं, परंतु ती औदार्यादि गुणांस बाधा करणार नाहीं अशा मर्यादेंत तिला ठेविलें पाहिजे. औदार्य, परोपकार इत्यादि गुण इंग्लंदांत राहणाऱ्या इंग्लिश लोकांमध्यें आहेत, परंतु जे इंग्लिश लोक हिंदुस्थानांत येतात त्यांपैकीं कित्येकांस सत्ता, ऐश्वर्य हीं थोड्या उद्योगानें एकदम विशेष प्राप्त झाल्यामुळें, त्यांच्या ठायीं औदार्यादि गुणांचा ऱ्हास होऊन 'आंग्लो इंदियन' ही त्यांची एक अनुदार जातिच बनली आहे, असें ह्मणतात. यांचें खरें स्वरूप 'इलबर्तबिल' या नांवाच्या प्रसिद्ध कायद्याच्या मसुद्याच्या वेळेस दिसून आलें. यांचें इतकें प्राबल्य झालें आहे कीं लार्ड रिपनसारख्या महात्म्यांच्या उद्योगाचें, व वर्ड्स्वर्थ साहेबांसारख्या महापंडितांच्या लेखांचें ही जाति कांहीं चालूं देणार नाहीं, असें कित्येकांचें ह्मणणें आहे. अशा प्रकारचे इंग्लिश लोक जर गुरु होऊं लागले तर विद्यार्थ्यांच्या ठायीं कोणते गुण उत्पन्न होतील तें सांगावयास नकोच.

**कृष्णशास्त्री चिपळूणकर** यांचेंहि उद्योगाविषयीं उदाहरण घेण्यासारखें आहे. हे नामांकित बुद्धिमान् होते हें प्रसिद्धच आहे. अप्रतिम बुद्धिमान् मोरशास्त्रीबावा यांनीं ज्यांस बृहस्पति

नांव दिलें त्यांच्या बुद्धीचें वर्णन करावें तितकें थोडेंच. मोरशास्त्रीबावांसारखीच कांहीं अंशीं यांची स्थिति झाली. पूर्वीं यांनीं वेदाध्ययन केलें. पुढें शास्त्राध्ययन करून त्यांतहि कीर्ति मिळविली. पुढें इंग्रजीचाहि फारच उत्तम अभ्यास केला. विद्येबद्दल कोणाचीहि कीर्ति झाली ह्मणजे त्यास कांहीं तरी दूषण द्यावें असा बहुशः लोकांचा स्वभावच असतो. शास्त्रीबावांस इंग्रजी भाषा लिहिण्याचा प्रसंग विशेष नसल्यामुळें त्यांत त्यांचें प्रावीण्य लोकांस दिसून आलें नाहीं. तेव्हां कित्येक असें ह्मणत कीं, शास्त्रीबावा बुद्धिमान् विद्वान् खरे, इंग्रजींतून मराठी भाषांतर उत्तम करितात; परंतु त्यांस इंग्रजी चांगलें लिहितां येत नाहीं. परंतु दैववशात् त्यांस एतद्देशीय वर्तमानपत्रांतील सारांश सरकारास लिहून कळविण्याचें काम मिळाल्यामुळें हें लोकांचें ह्मणणें अगदीं खोटें ठरलें. त्यांचें लिहिणें इतकें चांगलें असे कीं, इतर इलाख्यांत साहेब लोक त्या कामावर असतां त्यांच्यापेक्षांहि यांचे लेख सरकारांत उत्तम ठरले.



कृष्णशास्त्री चिपळूणकर.

शास्त्रीबावांच्या मराठी लिहिण्याची स्तुति करावी तितकी थोडीच. मराठी वर्तमानपत्रांत त्यांचे लेख येत त्यांवर प्रतिपक्ष्यांच्यानें समर्पक उत्तर देववत नसे. मग 'शेषं कोपेन पूरयेत्' या न्यायानें ते कांहींतरी दूषणें देत. त्यांनीं प्रथमतः 'आरेबियन्नैट्ट' या पुस्तकाचें इंग्रजींतून मराठींत भाषांतर केलें. तें इतकें उत्तम झालें कीं, भाषांतर आहे असें वाटत देखील नाहीं. पुढें त्यांनीं

इंग्लंदांतील प्रसिद्ध विद्वान् 'जान् स्तुअर्त मिल्ल, याच्या अर्थशास्त्रावरील ग्रंथाचें भाषांतर केलें. त्या वेळच्या विद्यावृद्धीकडे लक्ष दिलें असतां असें दिसून येईल कीं, अर्थशास्त्रासारख्या अतिगहन व आपल्या देशांत अगदीं नव्या अशा विषयावरील कठिण ग्रंथाचें भाषांतर करणें सामान्य काम नव्हे. त्या वेळेस तें शास्त्रीबावांसारख्या गृहस्थांशिवाय दुसऱ्याच्या हातून पार पडणें कठीण होतें.

जुने व नवे विद्वान् यांमध्यें एक गोष्ट साधारण आहे, ती ही कीं, दोघांसहि मराठी भाषेचा व मराठी कवितेचा तिटकारा आहे. शास्त्रीबावांमध्यें दोन्ही विद्या एकत्र सारख्या वास करीत असल्यामुळें त्यांस तिचा कंटाळा अधिक असावा, परंतु तसें नसतां खरी स्थिति याच्या उलट असे. मराठी कविता वाचण्यांत ते पुष्कळ वेळ घालवीत, व स्वतः मराठी कविता करीत. पद्यरत्नावली व मराठी कवितेच्या व्याकरणाविषयीं निबंध हीं वाचलीं असतां मराठी कवितेविषयीं त्यांचा उद्योग दिसून येईल. मराठी व्याकरणावर शाळापत्रकांतील निबंध लक्षपूर्वक वाचून पाहील त्यास शास्त्रीबावांची कुशाग्र व खोल बुद्धि, विषयाचें आकलन, तो प्रतिपादन करण्याची शक्ति, या गोष्टींचें आश्चर्य वाटल्याशिवाय राहणार नाहीं. त्यांची गुणदोषविवेचनशक्ति अद्वितीय असे. या शक्तीच्या संबंधानें इंग्लंदांतील प्रसिद्ध विद्वान् डाक्टर जान्सन् याची उपमा त्यांस देण्यास हरकत नाहीं. जान्सनच्या वेळेस मोठमोठे विद्वान् होते, परंतु कोणीहि त्याजवळ बोलूं लागला तरी त्याची जान्सन् यावर कडी चढत नसे, असेंच शास्त्रीबावांचें असे. कोणीहि त्यांच्याशीं कोटिक्रम करूं लागला तरी शेवटीं शास्त्रीबावांची छाप वर बसावयाचीच. बहुत वर्षें ते नवीन विद्वान् मंडळीचे पुढारी होते. मुंबईचे मोठमोठे विद्वान् पुण्यास आले तरी शास्त्रीबावांचें वजन कमी न होतां पूर्वींप्रमाणें कायम होतें.

शास्त्रीबावा जसे उत्तम गुणदोषविवेचक होते तसेच उत्तम शिक्षकहि होते. चार पांच तासपर्यंत शिकवीत बसले तरी त्यांस कंटाळा येत नसे. वर्गांत बसले ह्मणजे मुलांस लक्ष द्या असें त्यांस कधींहि ह्मणावें लागलें नाहीं. ते शिकवूं लागले ह्मणजे त्यांच्या बोलण्याकडे आपोआप विद्यार्थ्यांचें चित्त लागे, व कितीहि वेळ गेला तरी कंटाळा येत नसे. विद्यार्थ्यांनें कोणतीहि शंका काढिली तरी त्यांस राग येत नसे; फारच मूर्खपणाची असली तर हंसूं मात्र येई. कोणत्याहि शंकेचें समाधान त्यांकडून झाल्याशिवाय रहात नसे. कोणताहि विषय असला तरी तो मनांत भरवून देण्याची त्यांची शैली उत्तम असे.

शास्त्रीबावांस वार्धक्य आलें, सरकारी कामाचा बोजा होताच, तरी त्यांचा ग्रंथावलोकनाचा क्रम कमी झाला नाहीं. तो शेवटपर्यंत सारखा होता. त्यांस शास्त्रीय विषय वाचण्याची फारच अभिरुचि असे. अनेकविद्यामूलतत्त्वग्रंथ पाहिला असतां त्यांस शास्त्रीय विषय किती माहीत होते हें ध्यानांत आल्याशिवाय रहाणार नाहीं. शास्त्रीबावांच्या उद्योगाची तारीफ करावी तितकी थोडीच. शास्त्रीबावांस आर्जवाचा मोठा तिटकारा असे; त्यामुळें सरकारी हुद्याच्या संबंधानें त्यांची बढती व्हावी तशी झाली नाहीं. प्रसंगानें कोणास राग येण्यासारखें शास्त्रीबावा बोलले तरी मनांत कुत्सितपणा धरून त्यांनीं कोणाचाहि द्वेष केला नाहीं. मातापितरांची भक्ति हा त्यांचा वर्णनीय गुण अनुकरण करण्यासारखा होता.

शास्त्रीबावांकडे कोणत्याहि विषयावर कोणीं कांहीं ग्रंथ लिहून नेला तर ते त्याच्या गुणाची खरी परीक्षा करीत. आपल्यापेक्षां पगारानें, विद्येनें, लौकिकानें कमी अशा एकाद्यानें कांहीं लिहिल्यास त्यास चांगलें ह्मणणें आलीकडील कित्येक विद्वानांच्या जिवावर येतें. मत देण्याचा प्रसंग आलाच तर मला पाहाण्यास वेळ नाहीं, कांहीं दोष आहेत, एकंदरींत पुस्तक बरेंच आहे, परंतु कांहीं सुधारणा केल्या पाहिजेत, असली उडवाउडव करून टा-

कावयाची. दुसऱ्यास चांगलें ह्मटल्यानें आपणांस कमीपणा येतो ही वेडगळ समजूत शास्त्रीबावांच्या मनांत कधींच शिरली नाहीं. शास्त्रीबावा ग्रंथ लावीत असतां कोणी स्थलविशेषीं दुसऱ्या प्रकारचा समर्पक अर्थ सुचविल्यास ते लागलींच आनंदानें त्याचें ग्रहण करीत. आलीकडे असे कित्येक विद्वान् झाले आहेत कीं त्यांच्यापुढें कोणी प्रत्युपस्थान केलें कीं त्यांचें मस्तक तप्त झाल्याशिवाय रहात नाहीं. सवड सांपडल्यास ते प्रत्युपस्थान करणाऱ्याची खोड मोडण्यास कमी करीत नाहींत.

'पुत्रादिच्छेत्पराभवम्' किंवा 'बापसे बेटा सवाई' या ह्मणीस शास्त्रीबावांचे चिरंजीव **विष्णुशास्त्री चिपळूणकर** हे पात्र झाले. कित्येक गुणांत त्यांनीं शास्त्रीबावांस मागें टाकिलें. विद्या, विनय, नीति, स्वदेशप्रीति, उद्योग इत्यादि गुणांनीं थोड्या कालांत त्यांनीं आपलें नांव महाराष्ट्रदेशांत आबालवृद्धांस प्रिय केलें. सरकारी चाकरीवर अवलंबून राहूं नये, सेवा ही श्ववृत्ति आहे, स्वतंत्र उद्योग करावा अशा गोड गप्पा व्याख्यानांत सांगणारे पुष्कळ आहेत, परंतु पदरीं ऐश्वर्य नसतां बऱ्याच मोठ्या पगाराची सुखाची सरकारी नोकरी सोडून, चारचौघांस बरोबर घेऊन स्वतंत्र उद्योग करण्याचें उदाहरण दाखविणारे विष्णुशास्त्रांसारखे आपल्या देशांत किती पुरुष आहेत?



**विष्णुशास्त्री चिपळूणकर.**

विष्णुशास्त्री यांच्या मागें त्यांचे सोबती **बाळ गंगाधर टिळक** यांनीं त्यांचाच कित्ता घेतला आहे. गणितादि अनेक विषयांत पारंगत असून हे लोकहितासाठीं सतत प्रयत्न करणारे आहेत. यांचा उद्योग वर्णनीय आहे. ईश्वर त्यांस चिरायु करो.

**परशुरामपंततात्या** गोडबोले हे सद्गृहस्थहि मोठे उद्योगी होते. मयूरकवीच्या भक्तमालिकेंतील हे कल्याणच होत. मोरोपंतांच्या दहापांच नवीन आर्या वाचल्याशिवाय तात्यांचा दिवस जात नसे. त्यांस रिकामपणीं व्यर्थ काळ घालवितां कोणीं पाहिलें नाहीं. तात्यांचा स्वभाव फारच चांगला होता. त्यांनीं नेहमीं उद्योग करून संस्कृत नाटकांचीं भाषांतरें व इतर पुष्कळ ग्रंथ लिहिले आहेत.

आपल्या[1] विद्यमान काळच्या विद्वान् मंडळीमध्यें उद्योगीपणाचीं उदाहरणें बरींच आहेत. पहिल्यानें आपले लोकप्रिय **केरोपंत नाना** यांचें उदाहरण सांगण्यास मोठा आनंद वाटतो. कुलाब्याच्या वेधशाळेंत यांस लहानशा पगाराची चाकरी होती. तेव्हांपासून स्वतः उद्योग करून यांनीं एवढी विद्या संपादिली कीं, ते मुंबई व पुणें येथील विद्यालयांत गणितशास्त्राचे गुरु झाले, आणि त्यांनीं तें काम इतक्या उत्तम रीतीनें केलें कीं, त्यांची बरोबरी करणारा कोण



**रावबहादूर केरो लक्ष्मण छत्रे.**

१ हा लेख लिहिला त्या वेळेस नाना विद्यमान होते.

केव्हां होईल तो होवो. ज्योतिष, पदार्थविज्ञान या शास्त्रांमध्यें त्यांसारखा प्रवीण आज आह्मांमध्यें कोणी नाहीं. ज्योतिषशास्त्रांत यांची निष्णातता यूरोपखंडांत देखील प्रसिद्ध आहे. कित्येक वेळां सरकारानें महत्वाच्या कामांत यांचा अभिप्राय घेऊन यांचे आभार मानिले आहेत. ही सर्व कीर्ति त्यांनीं श्रमानें संपादिली. वृद्धपण होऊन नोकरी सोडल्यावरहि त्यांचें शास्त्रावलोकन सुरू असे. अर्वाचीन शास्त्रांवर मराठींत ग्रंथ लिहिण्यास यांनीं आरंभ केला. यांची शिकविण्याची शैली फारच वर्णनीय होती. निगर्वीपणा व लीनता हे गुण यांच्या ठायीं पूर्णपणें वास करीत. ते त्यांचे गुण अनुकरण करण्यासारखे होते. नानांचा स्वभाव असा होता कीं, त्यांस शत्रु ह्मणून कधीं व्हावयाचाच नाहीं. इंग्रजींत 'लहान मुलासारखा साधेपणा' असें ह्मणण्याची चाल आहे; हा लहान मुलासारखा साधेपणा नानांच्या अंगीं पूर्ण असे. मोठ्यापासून लहानापर्यंत सर्वांशीं त्यांचें वागणें सारखें असे.

प्राचीन काळीं विद्यमान कालाप्रमाणें विद्यावृद्धि नव्हती असें कित्येकांचें ह्मणणें आहे. लिहितां वाचतां येणें एवढाच विद्या शब्दाचा संकुचित अर्थ घेतला तर पहिल्यापेक्षां आतां लिहिणारे व वाचणारे यांची संख्या अधिक निघेल यांत संशय नाहीं, परंतु विद्या शब्दाचा व्यापक अर्थ घेतला तर ग्रहलाघवकारासारखे विद्वान् आमच्या देशांत हल्लीं होत नाहींत. वर्षास गणितशास्त्राची पूर्ण परीक्षा देऊन 'कलास्वामी' पदवी मिळविणारे पुष्कळ होतात, परंतु नानांचा विसर पाडण्याला एक दोन देखील गृहस्थ नाहींत हें शोचनीय आहे. सांप्रत चालू असलेल्या अपूर्ण शिक्षणपद्धतींत, परद्वीपीं कीर्ति नेणारे असे ग्रंथ आमच्यांत निपजण्याचीं चिन्हें दिसत नाहींत.

मुंबईंतील प्रसिद्ध वकील **रावसाहेब** मंडलिक हे शाळेंत विद्यार्थी होते, तेव्हांपासून त्यांच्या उद्योगाची प्रसिद्धि आहे. त्यांच्या वेळा बांधलेल्या असत. त्यांस क्षणभर देखील रिकामा वेळ घालविण्यास फुरसत नसे. हे पहिले सरकारी नोकर होते तेव्हां व पुढें वकील झाल्यावर आपल्या हुद्याचें व धंद्याचें काम संभाळून एलफिन्स्तन साहेबांच्या हिंदुस्थानाच्या इतिहासाचें भाषांतर, हिंदुधर्मशास्त्र वगैरे अनेक पुस्तकें यांनीं लिहिलीं. कोंकणांतील गरीब खोतांच्या हक्कांचें संरक्षण करण्याकरितां यांनीं पुष्कळ द्रव्य खर्चिलें व श्रमहि पुष्कळ केले.



विश्वनाथ नारायण मंडलिक.

दत्तपुत्र घेणें झाल्यास राजाची अनुमति घ्यावी असें शास्त्रांत आहे त्यावरून आधुनिक कित्येक राजपुरुषांनीं असें ठरविलें कीं राजाची अनुमति मागितली तर ती देणें किंवा न देणें राजाच्या मर्जीवर आहे, दिलीच पाहिजे अशी आवश्यकता नाहीं. याकरतां ज्या राजघराण्यांत दत्तपुत्राचा प्रसंग येईल, तेथें परवानगी देऊं नये ह्मणजे कालांतरानें आपोआप सर्व संस्थानें सार्वभौम सत्तेच्या ताब्यांत येतील. हें मत प्रसिद्ध होऊं लागलें तेव्हां 'दत्तविधान' या विषयावर इंग्रजींत एक उत्तम निबंध लिहून दत्तवि-

धान झालें असें राजास कळावें एवढाच शास्त्राचा उद्देश आहे, याकरितां राजानें परवानगी न देणें हें शास्त्रविरुद्ध होईल, अशी सर्वांची रावसाहेबांनीं खात्री करून दिली. यामुळें राजपुरुषांचें मत बदलून पुष्कळ संस्थानें कायम राहिलीं. हे मोठे विद्याव्यसनी व व्यासंगी होते. मनुस्मृतीवरील लुप्तप्राय झालेली मेधातिथिकृत टीका व त्याच स्मृतीवरील दुसऱ्या टीका छापून प्रसिद्ध करण्यास यांनीं पुष्कळ श्रम केले, व द्रव्यही पुष्कळ खर्चिलें. सद्वर्तनाच्या संबंधानें पाहिलें तर यांसारखे पुरुष सध्या आपणांमध्यें हाताच्या बोटांइतके तरी मिळतील कीं नाहींत याचा संशय आहे. धर्मनिष्ठा, नीति, प्रामाणिकपणा, सत्य, सरळपणा, धैर्य, निस्पृहता या गुणांच्या योगानें त्यांचें वजन सर्व लोकांमध्यें मोठें होतें. त्यांचा कित्ता वळविण्यासारखा आहे.

राजपुरुषांची मर्जी संभाळण्याकरितां होस हो ह्मणणारे रावबहादूर आह्मांमध्यें पुष्कळ आहेत, परंतु राजप्रतिनिधीपुढें धडकावून 'अप्रियस्यापि पथ्यस्य वक्ता'[1] असा रावसाहेबांसारखा दुसरा मिळणें कठीण. 'अप्रियस्यापि पथ्यस्य श्रोता'[2] दुर्लभ असल्यामुळें कित्येक वेळां रावसाहेबांसारख्यांचें बोलणें व्यर्थ झालें तरी लार्ड रिपनसारखा गुणज्ञ पुरुष अधिकारावर असल्यावर त्याचें चीज झाल्याशिवाय रहात नाहीं. लार्ड रिपन साहेबांनीं रावसाहेबांची विद्वत्ता व निस्पृहता जाणून आपल्या जवळील कायदे करणाऱ्यांच्या सभेंत त्यांस सभासद केलें. मुंबई इलाख्यांत एतद्देशीयांस हें पद प्राप्त झाल्याचें हें पहिलेंच उदाहरण होय. हा अधिकार प्राप्त झाला तेव्हां रावसाहेबांचें वय बरेंच झालें होतें तरी त्यांनीं

१ अप्रिय असलें तरी हितावह आहे तें बोलणारा. २ अप्रिय असलें तरी हितावह असेल तें ऐकणारा.

आपल्या बुद्धिवैभवानें व श्रमानें तें काम उत्तम रीतीनें करून प्रतिस्पर्ध्यांचीं मुखें स्तब्ध केलीं.

**रावबहादूर माधवरावजी रानडे** यांसारखा उद्योगी व



महादेव गोविंद रानडे.

देशाभिमानी पुरुष आमच्यांत आज दुसरा सांपडणें कठीण. देशहिताकरितां त्यांनीं फारच श्रम केले आहेत. ज्यांस त्यांचे उद्योग माहित आहेत, त्यांस त्यांच्या श्रमांचें आश्चर्य वाटल्याशिवाय रहाणार नाहीं. शांति हा गुण त्यांमध्यें पूर्णपणें वास करीत असे, असें ह्मटलें तरी चालेल. प्रतिपक्ष्यांचे आक्षेप शांतपणानें सोसून युक्तीनें लोकसमुदायास वळण लावण्याचें काम साधणारा त्यांसा-

रखा आज दुसरा कोणी मिळणार नाहीं. तसेंच महत्पदास पाव-लेल्या कित्येक सरस्वतीभक्तांप्रमाणें आपल्याच धुंदींत लोकांपासून दूर न राहतां चौघांत मिसळून त्यांस आपलेबरोबर घेऊन लोक-कल्याणाचीं कामें करण्यास झटणारा असा आज दुसरा कोण आहे ? इतर विद्वानांप्रमाणें आपल्यापेक्षां कमी विद्वानास तुच्छ न मानतां त्यामध्यें असलेल्या गुणांची प्रशंसा करून ज्यास्त अधिक उद्योग करण्यास उत्तेजन देणें हा त्यांचा गुण वर्णनीय होता.

उद्योगाविषयीं **रावबहादूर गोपाळरावजी देशमुख** यां-



**गोपाळराव हरि देशमुख.**

चेंही उदाहरण स्तुत्य आहे. गर्भश्रीमंतांत असे विद्याव्यसनी पुरुष फार थोडे. त्यांचें ग्रन्थावलोकन व लेखन वृद्धपणापर्यंत सारखें सुरू होतें.

मुंबईतील प्रसिद्ध विद्वान् गट्टूलालजी यांचें स्मरण झालें



पंडित श्रीगट्टूलालजी.

ह्मणजे, 'नर करणी करे तो नरका नारायण होय' असें एका हिंदुस्थानी कवीचें ह्मणणें आहे, त्याची आठवण होते. गट्टूलालजी हे पांच वर्षांच्या वयापासून दोन्ही डोळ्यांनीं अगदीं अंध असून केवळ बुद्धीच्या व श्रवणेंद्रियांच्या साहाय्यानें त्यांनीं एवढी विद्या संपादिली होती कीं तशी पुष्कळ डोळस बुद्धिमानांकडून देखील होणार नाहीं. असे पुरुष केवळ एका देशास नव्हे, तर सर्व पृथ्वीस भूषणभूत होत. आज त्यांची विद्वत्ता सर्व भरतखंडांत मान्य आहे. पुष्कळ डोळसांस पाठ करून ध्यानांत रहात नाहींत असे अनेक श्रुति, स्मृति, पुराणग्रन्थ त्यांस मुखोद्गत होते. कविता करण्याची त्यांची शक्ति तर प्रसिद्धच होती. पाहिजे त्या

विषयावर पाहिजे त्या वृत्तांत श्लोक करावयास सांगितला तर ते सांगितल्याबरोबर पूर्वी पाठ करून ठेविल्याप्रमाणें ह्मणत असत !

**डाक्टर रामकृष्णपंत भांडारकर,** हे विद्वन्मणि असून मोठे उद्योगी आहेत. **शंकर पांडुरंग पंडित, महादेव मोरेश्वर कुंटे, काशीनाथ त्र्यंबक तेलंग,** हेही मोठे विद्वान् व उद्योगी होते. भांडारकर यांनीं संस्कृत भाषेचा



**रामकृष्ण गोपाळ भांडारकर.**

अभ्यास एकसारखा पुष्कळ वर्षें करून व तिजविषयीं अनेक चांगले लेख लिहून यूरोपखंडापर्यंत कीर्ति मिळविली आहे.

पंडित यांचा उद्योगीपणा तर आश्चर्य वाटण्यासारखा होता.



शंकर पांडुरंग पंडित.

यांचा व्यासंग एकसारखा चालू होता. उद्योगानें यांनीं मोठी विद्या केली, अनेक भाषा शिकून व मोठाले अधिकार मिळवून कीर्ति संपादिली, तथापि यांचा उद्योग ज्यास पुढें परीक्षा द्याव-याची आहे, अशा विद्यार्थ्यांप्रमाणें चालू होता. व्यासंगाविषयीं यांचा कित्ता घेण्यासारखा आहे.

कुंटे यांचाही उद्योग मोठा दांडगा होता. यांनीं संस्कृत



महादेव मोरेश्वर कुंटे.

भाषा शिकण्यास मोठेपणीं आरंभ करून पराक्रमानें मुंबईतील विद्यालयांत संस्कृत शिकविण्याच्या गुरूची जागा मिळविली, आणि षड्दर्शनचिंतनिकेसारिखे गहन विषयावर मासिक पुस्तक छापून यूरोप व अमेरिका या ठिकाणीं देखील आपली विद्वत्ता गाजविली. इंग्रजींत उत्तम ग्रंथ लिहून यूरोपांत विद्वत्सभेंत बक्षीस मिळविलें. आजपर्यंत यूरोपांत नेमलेल्या गहन विषयावर तिकडील भाषेंत निबंध लिहून तिकडच्या विद्वानांस हटवून बक्षीस मिळविलें अशी गोष्ट झाली नव्हती. यांचा उद्योग रात्रंदिवस चालू होता. विद्याव्यसनाचें त्यांचें उदाहरण वर्णनीय आहे.

ग्रीस देशांतील प्राचीनकाळच्या होमरकवीच्या काव्यावरून रामायण लिहिलें आहे, भगवद्गीता जुन्या करारावरून लिहिली आहे, वगैरे दुरभिमानी युरोपियन विद्वानांनीं काढलेले कुतर्क खोडण्यास तेलंग यांनीं पुष्कळ यत्न केला. रामायण होमरपासून



काशीनाथ त्र्यंबक तेलंग.

घेतलें आहे काय ? यावर त्यांनीं उत्तम निबंध लिहिला. तसेंच भगवद्गीतेचें इंग्रजींत भाषांतर करून छापलें आहे. त्यांत दिलेल्या टीपा पाहिल्या तर त्यांच्या ग्रंथावलोकनाच्या उद्योगाचें आश्चर्य वाटतें. हे मोठे बुद्धिमान्, विद्वान्, उद्योगी असून नम्र होते. वितंडवाद न करतां शांतपणानें कोटिक्रम करून स्वपक्षमंडनार्थ वादग्रस्त विषयांत सत्यांश किती आहे हें पाहण्याविषयीं बहुशः त्यांची उत्सुकता असे. अशा वेळेस ते प्रतिपक्षाची सयुक्तिक कोटी

तेव्हांच कबूल करीत हा त्यांचा मोठा गुण होता. इंग्रजींत यांचे अशा प्रकारचे लेख पुष्कळच आहेत. मराठी लेखांतही हा त्यांचा गुण कित्येक वेळ दिसून आला आहे. येथील ऐक्यवर्धक सभेच्या प्रथम हेमंतोत्सवाच्या वेळेस "शास्त्र व रूढि यांच्या बलाबलाविषयीं विचार" या विषयावर त्यांनीं एक सुंदर मोठें व्याख्यान दिलें; त्यावर "प्रतिव्याख्यान" ह्मणून एक लेख कोणी अज्ञात गृहस्थानें लिहिला, त्यावर त्यांनीं "प्रतिव्याख्यानास उत्तर" ह्मणून जो लेख छापून प्रसिद्ध केला, त्यांत त्यांचा वरील गुण दिसून आला. या लेखांत त्यांनीं प्रतिव्याख्यानकाराच्या लेखांतील पुष्कळ गोष्टी कबूल करून आपल्या पक्षाचें मंडन केलें. जुन्या व नव्या पक्षाचे लोक या रीतीनें वादविवाद करतील तर समाजसुधारणेस फार उपयोग होईल. उगाच एकमेकांच्या उखाळ्यापाखाळ्या काढण्यापासून काय उपयोग ?

सुवर्णास सुगंध असता तर फारच मोठी मजा झाली असती असें एका कवीनें ह्मटलें आहे. तेलंग साहेबांचें स्मरण झालें ह्मणजे याचें स्मरण होतें. तेलंग साहेब ह्मणजे बावनकशी सोनें होय, परंतु अशा सोन्यापासून देशास व्हावा तितका फायदा झाला नाहीं. रावसाहेब मंडलिक यांसारखी निस्पृहता व मनोधैर्य यांचे अंगीं असतें तर सुगंधी सुवर्णाप्रमाणेंच त्यांची शोभा झाली असती. 'नरपतिहितकर्ता द्वेष्यतां याति लोके जनपदहितकर्ता त्यज्यते पार्थिवेन,' हा श्लोक प्रसिद्धच आहे. याप्रमाणें तेलंग साहेबांची स्थिति झाली. आरंभीं लोकहिताच्या सर्व गोष्टींमध्यें ते पुढारी असत. परंतु देशाच्या दुर्दैवानें त्यांस देशसेवेपेक्षां राजसेवाच अधिक हितावह वाटूं लागली, त्यामुळें राष्ट्रीय सभेपासून सुद्धां त्यांस दूर रहावें लागलें.

**दादाभाई नौरोजी** असें करते तर त्यांस एकाद्या संस्थानांत दिवाणगिरीची मोठी जागा सहज मिळती. उद्योग, सदाचरण, विद्वत्ता, देशहितप्रयत्न, सौजन्य, इत्यादि गुणांच्या

संबंधानें पाहिलें तर केवळ हिंदुस्थानांतच नव्हे पण सर्व पृथ्वींत देखील दादाभाई नौरोजी यांसारखे पुरुष फारच थोडे सांपडतील.



दादाभाई नौरोजी.

देशहितास यांनीं आपला देह अर्पिला आहे, यामुळें एवढी योग्यता अंगीं असून ते गरीबींतच राहिले आहेत. तारुण्यापासून वार्धक्यांत देखील त्यांचा दीर्घोद्योग सारखा सुरू आहे. त्यांचें आचरण निष्कलंक आहे. त्यांचें सौजन्य तर वर्णनीय आहे. त्यांचें वक्तृत्व फारच उत्तम आहे. असे मनुष्य हेच पृथ्वीचे अलंकार होत.

पुण्यांतील **गणेश वासुदेव जोशी** हेही मोठे उद्योगी होते. देशहिताकरितां झटणाऱ्यांनीं यांचें उदाहरण घेण्यासारखें आहे.

---

१ हे गृहस्थ हा लेख लिहिल्यावर पुष्कळ दिवसांनीं वारले.



गणेश वासुदेव जोशी.

ज्ञातारपणीं यांनीं सांप्रतची लोकस्थिति व राज्यरीति यांविषयीं पुष्कळ माहिती मिळवून पुष्कळ ठिकाणीं उपयुक्त व्याख्यानें दिलीं. न्याय मिळविण्याकरितां सरकारी न्यायसभेंत जाऊन संकटांत न पडतां आपणांतील सभ्य लोकांस पंच नेमून न्याय करून घ्यावा, याबद्दल यांनीं पुष्कळ खटपट केली. परंतु आमच्या लोकांचे डोळे अद्याप पुरतेपणीं उघडले नसल्यामुळें ती व्यर्थ गेली, तथापि त्यांचा उद्योग स्तुत्य होता यांत संशय नाहीं.

मोठी विद्या संपादन करण्यास मात्र मोठा उद्योग केला पाहिजे असें नाहीं. सन्मार्गानें मोठा द्रव्यलाभ करून घेण्यासही मोठा उद्योग पाहिजे. थोड्या भांडवलावर महोद्योगानें कोट्यवधि द्रव्य ज्यांनीं मिळविलें आहे असे **सर जमशेटजी जीजीभाई** यांसारखे पारशी लोकांत पुष्कळ गृहस्थ होऊन गेले. **शेट मुरारजी गोकुळदास** यांसारख्या अनेक गुजराथी गृहस्थांनींही उद्योगानें लक्षावधि द्रव्य संपादिलें. पूर्वार्जित कांहीं साधन नसतां केवळ

उद्योगानें वाढलेले असे मराठी लोकांत बरेच गृहस्थ आहेत. मुंबईंत **गणपत कृष्णाजी** व निर्णयसागर छापखान्याचे मालक **जावजी दादाजी** हे प्रारंभीं अगदीं गरीब असून उद्योगानें



जावजी दादाजी.

त्यांनीं पुष्कळ द्रव्य मिळविलें आणि हिंदुस्थानांत छापण्याची कला पूर्णतेस आणून आपलें नांव चिरस्थायी केलें. गणपत कृष्णाजी यांच्या वेळेस छापण्याची कला नुकतीच इकडे आली होती, तरी त्यांनीं फार श्रम करून तिला पूर्णतेस आणून मोठमोठे महाभारत, रामायण यांसारखे दुर्मिळ ग्रन्थ सुलभ केले; त्यामुळें लोकांस फार उपयोग झाला. जावजी शेट यांचे वडिल फारच गरीब स्थितींत होते. त्यामुळें जावजींस अगदीं लहानपणींच निर्वाहाची सोय बघावी लागली. त्यांनीं प्रथम एका छापखान्यांत तीन चार

रुपये दरमहाची नोकरी धरली. प्रथम त्यांचें काम अगदीं सोपें ह्मणजे कागद वगैरे पोंचविण्याचें असे. पण त्यांनीं असा निश्चय केला कीं आपलें काम करून कारखान्यांतील सर्व कामें शिकावयाचीं. कोण काय काम कसें कुशलतेनें करतो याकडे सर्वकाळ त्यांचें लक्ष असे, यामुळें त्यांस सर्व कामें येऊं लागलीं, तेव्हां त्यांस पगारही वाढत चालला. कांहीं वर्षें चाकरी केल्यावर त्यांनीं अक्षरांचे खिळे पाडण्याचा स्वतःचा कारखाना घातला. त्यांत चांगलें यश आलें तेव्हां छापखाना काढला. त्यांच्या सतत दीर्घोद्योगानें छापखाना दिवसेंदिवस वाढून तो सर्वांत मोठा व उत्तम झाला. त्यांच्या छापखान्यासारखें उत्तम काम हिंदुस्थानांत दुसरे ठिकाणीं क्वचितच निघेल. जावजीशेट पहिल्यानें गरीब होते, मग शेंकडों रुपये मिळवूं लागले, नंतर हजारों रुपये मिळवूं लागले, पुढें लक्षाधीश झाले, तरी सौजन्य, सदाचरण, नम्रता, उद्योगीपणा इत्यादि त्यांच्या अनेकसद्गुणांत तिळमात्र अंतर पडलें नाहीं.

शेवटीं इतकेंच सांगावयाचें कीं, विद्या, द्रव्यलाभ, स्वहित, परोपकार वगैरे कोणतीच गोष्ट उद्योगाशिवाय व्हावयाची नाहीं. अंगीं बुद्धि चांगली असली तरी शिकण्याचे श्रम केल्याशिवाय कांहीं यावयाचें नाहीं. उद्योगी मनुष्यास रिकामपण असलें तरी वेळ घालविण्यास अडचण पडत नाहीं. उद्योगी मनुष्यास वाईट संवयी व दुर्व्यसनें हीं लागत नाहींत. नियमित उद्योग हा शरीर व मन यांस विरुद्ध नाहीं, इतकेंच नाहीं, तर तो दोघांच्या संरक्षणास आवश्यक आहे. अतिश्रमानें, एकसारखे पुष्कळ दिवस एकाच प्रकारचे श्रम केल्यानें, त्रासदायक श्रम केल्यानें, किंवा श्रम निष्फळ झाल्यानें मनुष्याच्या शरीरास व मनास इजा होते हें खरें, तथापि उद्योगापासून त्याचें अहित होणार नाहीं. वहिवाटींत ठेवलेल्या लोखंडापेक्षां एकीकडे ठेविलेलें लोखंड गंजून अधिक झिजेल. तसेंच निरुद्योगी शरीर व मन हीं उद्योगी शरीर व मन यांपेक्षां अधिक शिथिल होतील. अतिश्रम करणें हें उद्योगीपणास अनुकूल नाहीं. त्यापासून मन व शरीर लवकर क्षीण होऊन म-

नुष्य लवकर जीर्ण होऊन मृत्यु पावतो. जगला तरी निरुपयोगी होतो. नवीन विद्वानामध्यें रावजी वासुदेव तुळू हे बुद्धिमान्, सुशील, नीतिमान गृहस्थ होते. त्यांनीं सरकारी नोकरी संभाळून ( B. A., M. A., LL. B.या ) तीन परीक्षा दिल्या, परंतु अतिश्रम केल्यामुळें तिसरी परीक्षा होतांच थोड्याच दिवसांत त्यांचें देहावसान होऊन सर्व व्यर्थ झालें. अशी वैद्य, गोखले, आपटे, आठल्ये वगैरे गृहस्थांचीं उदाहरणें आपल्या नवीन विद्वानांत पुष्कळ आहेत. ते विद्यालयांत असतां परीक्षा उतरण्याकरितां रात्रंदिवस फार श्रम करितात. विद्वत्तेची पदवी देण्याच्या वेळेस अधिकारी त्यांस सांगत असतात कीं, तुमची विद्या संपली असें नाहीं. वस्तुतः आतां तुह्मी विद्येच्या मार्गास लागलां. परंतु परीक्षा उतरून चाकरी लागली ह्मणजे तिचे श्रम होण्याचीच मारामार; मग दुसरा उद्योग कोठून होणारं ? यूरोपखंडांतील मोक्षमुल्लर इत्यादि विद्वानांमध्यें ह्मातारपणापर्यंत सतत सारखा उद्योग दृष्टीस पडतो, तसा कित्येक अपवादभूत रावबहादूर रानड्यांसारखे गृहस्थ शिवाय करून आमच्या आधुनिक मंडळीमध्यें दिसत नाहीं. याचें एक कारण विद्यालयांतील त्यांचे अतिश्रम हें होय. याकरितां आळस टाकून ज्या रीतीनें आपलें शरीर व मन हीं सतत उद्योग करण्यास समर्थ राहतील असा उद्योग करावा; तोच हितावह होईल.

## भाग ५.

### धैर्य.

निन्दन्तु नीतिनिपुणा यदि वा स्तुवन्तु
लक्ष्मीः समाविशतु गच्छतु वा यथेष्टम् ॥
अद्यैव वा मरणमस्तु युगान्तरे वा
न्याय्यात्पथः प्रविचलंति पदं न धीराः ॥ १ ॥ भर्तृहरी.

जगांत सद्वर्तन कायम राखण्यास मनुष्याच्या अंगीं धैर्य हा

१ वानोत निंदोत सुनीतिमंत ॥ चलो असो वा कमला गृहांत ॥
हो मृत्यु आजीच घडो युगांतीं ॥ सन्मार्ग टाकूनि भले न जाती ॥१॥
वामन.

गुण असणें आवश्यक आहे. जगांत ह्या गुणांच्या योगानेंच अनेक पुरुष व स्त्रिया यांची कीर्ति अक्षय्य झाली आहे. येथें धैर्य ह्मणजे अंगबळाच्या शौर्यानें रणांगणीं शत्रूंच्या अंगावर जाणें हें नव्हे. हें धैर्य पशूंमध्यें देखील असतें, परंतु त्यांस कोणी श्रेष्ठ ह्मणत नाहीं. कसाही प्रसंग आला, किंबहुना प्राणावर येऊन बेतली, तरी सन्मार्ग न सोडणें हेंच खरें धैर्य होय.

याच्याच योगानें मनुष्यास इहलोक व परलोक हे दोन्ही साधतात. याकरितांच मनूनें:—

**धृतिः क्षमा दमोऽस्तेयं शौचमिंद्रियनिग्रहः ॥**
**धीर्विद्या सत्यमक्रोधो दशकं धर्मलक्षणम् ॥**

या धर्माच्या व्यापक लक्षणामध्यें प्रथमतः धैर्याची गणना केली आहे.

जगांत कीर्ति होवो, किंवा न होवो, तिजकडे लक्ष न देतां सन्मार्ग व सत्य हीं न सोडण्याकरितां दुःखें भोगणें हें धैर्य, प्रतिष्ठा व संपत्ति मिळविण्याकरितां रणांगणीं हजारों वीरांचा नाश ज्याच्या योगानें मनुष्य करतो त्या धैर्यापेक्षां मोठें आहे. धैर्याच्या योगानें मनुष्याचा शेवट गोड होईल. भारत व रामायण यांत पांडव व द्रौपदी, सीता व राम, यांचे इतके कष्ट वर्णन करण्यांत व्यास व वाल्मीकि या लोकोत्तर पुरुषांचा उद्देश हाच असावा कीं, अनेक संकटें आलीं, दुष्टांनीं छल केला तथापि त्यांनीं सन्मार्ग सोडला नाहीं; त्यामुळें त्यांचा शेवट गोड झाला, व ज्यांनीं दुर्मार्गांत शिरून त्यांस दुःखें देऊन छल केला, ते मोठे रणशूर होते तरी त्यांचा विध्वंस झाला. ही गोष्ट लक्षांत आणून मनुष्यांनीं दुःख प्राप्त झालें असतांही सन्मार्ग सोडूं नये.

विपत्कालीं धैर्य धरणें हेंच खऱ्या मोठेपणाचें लक्षण आहे. याकरितां कवीनें ह्मटलें आहे.

[१]विपदि धैर्यमथाभ्युदये क्षमा
सदसि वाक्पटुता युधि विक्रमः ॥
यशसि चाभिरुचिर्व्यसनं श्रुतौ
प्रकृतिसिद्धमिदं हि महात्मनाम् ॥ १ ॥

एवढालीं मोठमोठीं प्राणसंकटें आलीं तरी शिवाजीनें एकवार देशबांधवांस दुष्टांच्या छळापासून मुक्त करण्याचा जो सत्संकल्प केला तो सोडला नाहीं. त्याची ऐहिक सुखाकडेच दृष्टि असती तर औरंगजेब बादशहाचीं आर्जवें करून त्यानें आपणास मोठी जहागीर संपादून घेतली असती. औरंगजेबासही शिवाजीसारख्या योद्ध्यास आश्रयास ठेवण्यास मोठा आनंद झाला असता. परंतु शिवाजीची प्रतिज्ञाच कीं स्वदेशसेवेंत मरून जाईन, पण शत्रूस शरण जाऊन ऐश्वर्य भोगणार नाहीं.

खरें बोलणें, न्यायानें वागणें, प्रामाणिकपणा धरणें, विषयसुखाच्या मोहांत न पडणें, आपलें कर्तव्य करणें, या गोष्टींत ज्याचें धैर्य सुटत नाहीं तोच खरा धैर्यवान् होय. ज्याच्या अंगीं वरील गुण नाहींत त्यास सन्मार्गानें वागून संसाराटवींतून पार पडतां येणार नाहीं. आजपर्यंत जगांत जे सत्पुरुष झाले त्यांच्या अंगांत हें धैर्य होतें ह्मणूनच 'देह त्यागितां कीर्ति मागें उरावी,' अशी त्यांची स्थिति झाली. या वचनाचे कर्ते समर्थ रामदास स्वामी यांस संसारजालांत पाडण्याविषयीं त्यांच्या आप्तांनीं पुष्कळ मोह घातला, तथापि 'सावधान' हा शब्द ऐकतांच ऐहिक सुखाविषयीं लोलुप न होतां भवार्णव तरून जाण्याचा जो त्यांनीं एकवार दृढ निश्चय केला तो कधींहीं सोडला नाहीं. आपण तरून त्यांनीं लोकांस सन्मार्ग दाखविला ! तुकाराम भक्तिमार्ग धरून अभंग गाऊं

१ विपत्कालीं धैर्य, संपत्तीच्या वेळेस क्षमा, सभेमध्यें वक्तृत्व, युद्धामध्यें पराक्रम, कीर्तीची आवड, विद्येचें व्यसन, हीं मोठ्यांच्या ठायीं स्वाभाविक असतात.

लागला तेव्हां त्यास घरांतल्या माणसांनीं व लोकांनीं पुष्कळ त्रास दिला, तरी त्यानें आपला सन्मार्ग सोडला नाहीं. एके प्रसंगीं एक स्त्री दुर्वासना धरून त्याकडे आली असतां त्यानें काय उत्तर दिलें तें त्याच्या गाथांत प्रसिद्ध आहे. एक वेळां त्यानें मार देखील खाल्ला.

रामशास्त्रीबावा, अहल्याबाई होळकरीण, इत्यादि महाराष्ट्र देशाच्या इतिहासांतील मनुष्यरत्नें यांच्या अंगीं हें खरें धैर्य पूर्णपणें वसत असे. यजमानाच्या भिडेनें रामशास्त्री यांनीं आपल्या मनाच्या विरुद्ध अभिप्राय कधींही दिला नाहीं. थोरले माधवराव पेशवे स्नानसंध्येंत अधिक वेळ घालवूं लागले तेव्हां राजाचें मुख्य कर्तव्य जें प्रजापालन याकडे दुर्लक्ष होईल असें मनांत आणून, यजमानांची भीड न धरितां शास्त्रीबावांनीं स्पष्ट सांगितलें कीं मी राजीनामा देऊन काशीवास करण्यास जाणार. आपण ब्राह्मण असून क्षत्रियाचें कर्म स्वीकारलें आहे तर त्याप्रमाणें लोककल्याणाकडे आपलें आयुष्य खर्चिलें पाहिजे. तसें करणें नसेल तर आपणही मजबरोबर येऊन स्नानसंध्या करून काळ घालवावा. शास्त्रीबावांचें भाषण योग्य वाटून माधवरावांनीं आपली चूक कबूल केली आणि शास्त्रीबावांच्या इच्छेप्रमाणें प्रजापालनाकडे पूर्ण लक्ष ठेवण्याचें कबूल केलें, तेव्हां शास्त्रीबावाही संतुष्ट झाले. असा प्रभु व असा प्रधान असल्यावर राज्यनीति चांगली राहील यांत काय आश्चर्य ?

कलींतील कृत्या आनंदीबाई हिनें मारेकरी घालून नारायणराव पेशव्याचा वध करविल्यावर राघोबादादांचें या घोर कृत्यांत कितपत अंग असावें असा लोकांस संशय होता; परंतु रामशास्त्री यांनीं श्रम करून पुरता शोध लावला, तेव्हां त्यांस कळलें कीं राघोबादादांचें यांत अंग आहे. लागलींच वाड्यांत जाऊन राघोबादादांच्या तोंडावर शास्त्रीबावांनीं सांगितलें कीं तुह्मीं सुमेरशिंगाकडून हें कृत्य करविलें. मीं नारायणरावास धरण्याचा मात्र हुकूम दिला होता असें राघोबादादांनीं ह्मटलें, तेव्हां शास्त्रीबावांनीं

मूळचा कागद युक्तीनें आणविला तेव्हां त्यांत धरावें या शब्दाचें मारावें असें केलेलें आढळलें. पुढें राघोबादादांनीं रामशास्त्रीबावांस प्रायश्चित्त विचारलें, तेव्हां त्यांनीं साफ सांगितलें कीं या घोर पातकास देहांत प्रायश्चित्ताशिवाय दुसरें प्रायश्चित्त नाहीं. तुह्मी किंवा तुमचें राज्य यांचें कल्याण व्हावयाचें नाहीं. तुमच्या राज्यांत मी चाकरी करणार नाहीं इतकेंच नव्हे, मी पुण्याचें तोंड पाहणार नाहीं; असें उत्तर करून ते पुण्यांतून चालते झाले. एवढ्या अधिकारावर होते तरी त्यांनीं आपल्या नांवास कलंक लागण्यासारखें आचरण कधींही केलें नाहीं. असे मनुष्य केवळ भरतखंडाचेच नव्हत तर संपूर्ण पृथ्वीचे अलंकार होत.

साधारण गरीबांचीं मुलें देखील लाडकीं असतात, ते देखील कित्येक वेळां अपराधाबद्दल मुलांस शिक्षा करीत नाहींत; पण अहल्याबाई पोटच्या मुलाचाही अपराध अन्यायानें पोटांत घालीत नसे. कोणाचाही अन्याय पाहिला तरी तिच्या अंगाचा तिळपापड होई. जात्या स्त्री, तशांत राजविलासांत वागलेली, असें असून वैधव्य प्राप्त झाल्यावर ऐश्वर्यांत असतांही तिनें ऋषिपत्नीसारखें पातिव्रत्य राखून सद्वर्तनास काडीमात्र धक्का लागूं दिला नाहीं. अहाहा ! धन्य त्या माउलीची ! !

अहल्याबाईच्या विलक्षण धैर्याची गोष्ट इतिहासांत प्रसिद्ध आहे, ती अशी; एके समयीं राघोबादादा पेशव्यांनीं तिच्या मुलखावर स्वारी करण्याचा बेत केला. हा बेत अहल्याबाईला कळतांच तिनें सैन्याची तयारी करून राघोबादादांस निरोप पाठविला कीं आपण आमच्या मुलखावर स्वारी करीत असल्यास आमची लढाई करण्याची तयारी आहे. युद्धांत एका पक्षास जय व दुसऱ्यास पराजय ही गोष्ट सर्वदा आहेच. होळकराच्या गादीचा कारभार मी स्त्री चालवीत आहें; याकरतां आपल्यासारख्या शूरानें आमच्या सैन्याचा पराभव केल्यास विशेष आश्चर्य आहे असें नाहीं. पण जर कदाचित् उलट प्रसंग घडला तर मात्र आपला दुर्लौकिक

होऊन आजपर्यंत संपादिलेली कीर्ति नष्ट होईल, हें मी आपणांस आधींच सुचवितें, याचा पूर्ण विचार करून काय करणें तें करावें. हा धैर्याचा व खरेपणाचा खणखणित निरोप ऐकून राघोबादादांनीं स्वारीचा बेत रहित केला.

ग्रीस देशांत प्राचीनकाळीं होऊन गेलेला प्रसिद्ध सत्पुरुष साक्रेतीस यानें त्या वेळेस चालू असलेलीं भ्रांतिमूलक धर्ममतें सोडून खरीं मतें स्थापण्याचा यत्न केला, तेव्हां लोकांनीं त्याचा फार छळ केला, तरी धैर्य धरून त्यानें सत्यमार्ग सोडला नाहीं. शेवटीं हा आपल्या मतांच्या योगानें देशांतील मुलांचीं मनें बिघडवून टाकतो, असा त्यावर गुन्हा ठेवून न्यायाधीशांनीं न्यायाचें सोंग करून त्यास देहांत शिक्षा दिली. तो मरणाच्या वेळेस आत्म्याच्या अमरत्वाविषयीं संभाषण करून शेवटीं न्यायाधीशांस ह्मणाला, 'आतां आपला एकमेकांचा वियोग होण्याची वेळ आली. मी मरणार आणि तुह्मी जगणार, परंतु आपणांपैकीं अधिक चांगला कोण, हें ईश्वराशिवाय कोणास कळत नाहीं.' केवढें विलक्षण धैर्य हें ! त्याचे शत्रु मरून मातीस मिळाले, परंतु साक्रेतीस या धैर्याच्या योगें अमर झाला आहे. तो जगांतून कधीं नाहींसा होणार नाहीं.

यूरोपखंडांत धर्मवेड फार असल्यामुळें पूर्वींपासून बहुत विद्वानांचा मूर्ख लोकांनीं छळ केला आहे. ब्रुनो नांवाचा एक विद्वान् इताली देशांत रोम शहरीं होता, तो त्या वेळेस प्रचारांत असलेल्या मतांचे दोष दाखवूं लागला, यामुळें त्यास 'इन्किझिशन' नांवाच्या दुष्ट लोकांच्या न्यायसभेनें जिवंत जाळण्याची शिक्षा केली. शिव शिव ! काय ही धर्माच्या नांवानें न्यायाची थट्टा ! जेव्हां त्या दुष्ट व मूर्ख न्यायाधीशांनीं त्यास शिक्षा सांगितली, तेव्हां तो अभिमानानें ह्मणाला, 'मला शिक्षा ऐकण्याचें जितकें भय वाटत आहे त्यापेक्षां तुह्मांस ती सांगण्याचें फार भय वाटतें.'

याच्या मागून ग्यालिलिओ हा प्रख्यात ज्योतिषशास्त्रवेत्ता

त्याच देशांत झाला. त्यानें पृथ्वी फिरते असें मत प्रतिपादन केलें, तें बैबलाच्या मताविरुद्ध असल्यामुळें तो नास्तिक आहे असा दोषारोप करून धर्मवेड्या पाद्र्यांनीं त्याचा शेवटपर्यंत फार छळ केला, तो त्यानें मोठ्या धैर्यानें सोसला पण आपलें मत टाकलें नाहीं.

राजर बेकन नांवाचा एक विद्वान् होता, तो पदार्थविज्ञानशास्त्राचा अभ्यास करून नवीन शोध करूं लागला, ह्मणून त्यास हा चेटक्या आहे असें ठरवून त्याचे ग्रंथ नाहींतसे करून त्यास तुरुंगांत टाकिलें; तेथेंच तो मृत्यु पावला.

व्हेसालिअस् ह्मणून एक जिज्ञासु विद्वान् होता, तो मनुष्याच्या शरीराच्या आंतील हाडांची रचना कळावी ह्मणून प्रेतें फाडून पाहूं लागला. तोंपर्यंत यूरोपखंडांत प्रेतें फाडण्याची वहिवाट नव्हती, ती सुरू करून त्यानें नव्या शारीरशास्त्राचा पाया घातला, पण त्याबद्दल त्यास देशत्याग करण्याची मोठी शिक्षा झाल्यामुळें हाल होऊन तो मरण पावला.

पदार्थविज्ञानशास्त्रामध्यें यूरोपखंडांत आजपर्यंत जितक्या लोकांनीं आपल्या विशालबुद्धीच्या योगानें मोठमोठे शोध लाविले त्या बहुतेकांस त्या वेळचे लोक मूर्ख ह्मटल्याशिवाय राहिले नाहींत. ठीकच आहे, लोक नेहमीं अंधपरंपरेनें जाणार; सत्यसिद्धांत शोधून काढण्याची बुद्धि तर लाखांत एकाद्यास असणार; पण तो समजून घेण्याची योग्यताही फारच थोड्यांस असते. प्रतिष्ठा मिळविण्याचे मार्ग दोन, लोकांपेक्षां अधिक विद्या तरी करावी; अथवा आपल्यापेक्षां लोक मूर्ख असें तरी ह्मणावें. पहिला मार्ग बुद्धीशिवाय व श्रमाशिवाय साधत नाहीं, तेव्हां मूर्ख लोक दुसऱ्याकडेच वळतात. लार्द बेकन यानें 'नोव्हेम्‌आर्ग्यानम्' हा ग्रंथ प्रसिद्ध केला तेव्हां ह्यापासून धर्म, राज्य, या संबंधानें देशांत भयंकर परिणाम घडतील असा गवगवा झाला. न्यूतन साहेबानें विशिष्टगुरुत्वाचा नियम शोधून काढला तेव्हां त्यास कित्येक लोक नास्तिक ह्मणूं लागले. हार्वे या वैद्यशास्त्रवेत्त्यानें रुधिराभि-

सरणाचा नियम काढिला, तेव्हां त्याची तर मूर्ख लोकांनीं टर उडविली.

याप्रमाणें यूरोपांत ज्योतिष, पदार्थविज्ञान, वैद्यक वगैरे शास्त्रांत नवीन शोध लावणाऱ्या विद्वानांचा तत्कालीन मूर्खांनीं छळ केला तरी त्यांनीं तो सत्याकरितां आपलें सुख एकीकडे ठेवून सोसल्यामुळें जगांत ज्ञानाचा प्रसार अधिक होऊन मनुष्याचें सुख वाढलें. यामुळें ते आपले हितकर्ते असें समजून लोक त्यांच्या नांवास मान देत आहेत. प्राचीनकाळच्या लोकोपकारकर्त्यांचा छळ झाला, यावरून विद्यमान काळच्या लोकांनीं एक गोष्ट शिकण्यासारखी आहे; ती ही कीं, जर आपण सत्य स्मरून, श्रम करून, प्रामाणिकपणानें उद्योग करीत आहों, तर लोकांच्या ह्मणण्याकडे लक्ष देऊं नये. अज्ञानामुळें त्यांनीं आपणास नांवें ठेविलीं तरी त्यांस रागें भरून शिव्या न देतां त्यांच्याशीं शांतपणानेंच वागलें पाहिजे. मूर्खांशीं शांतीनें वागून जसा शहाण्याचा शहाणपणा दिसून येतो, तसा रागानें वागून येत नाहीं. शांतीनें वागलें असतां अज्ञानी लोक आपलीं मतें ऐकून घेऊन त्यांविषयीं विचार करतील. या रीतीनें जितका लवकर खऱ्याचा विजय होईल तितका लवकर दुसऱ्या रीतीनें होणार नाहीं. नवीन मत खरें असलें तरी लोक त्याचें ग्रहण करीत नाहींत हा त्यांचा दोष नव्हे, हें त्यांचें अज्ञान होय. यकरितां त्यांच्या हट्टास दोष समजून शिक्षा न करितां समजुतीनें अज्ञान घालविण्याचा यत्न केला पाहिजे. अज्ञानाचा पराजय ज्ञानानेंच होईल, तरवारीनें होणार नाहीं.

आमच्या सुधारणेच्छु मंडळीनें आरंभीं अविचार व उतावीळपणा केल्यामुळें त्यांच्या ठायीं लोकांचा अविश्वास उत्पन्न होऊन देशाचें फार नुकसान झालें. हजारों वर्षें ज्याच्या गादीस लोक मान देत आले अशा धर्माध्यक्षाचा यत्किंचित् कारणावरून फिर्याद करून परधर्मी न्यायाधीशाकडून छळ करविणें यास शहाणपणाचें कृत्य कोण ह्मणेल ? यूरोपांतील देशांत राजा व प्रजा

यांचा धर्म एक असल्यामुळें बहुशः नवीन मतप्रवर्तकांस जुन्या मताच्या लोकांकडून त्रास होतो, परंतु वरील गोष्टींत उलट प्रकार झाला.

ज्ञान हें सोन्यासारखें आहे. तें जितकें तापवावें तितकें कमी न होतां अधिक प्रकाशमान होईल. ज्ञानवृक्ष इतर फलवृक्षांसारखा आहे. वांग्याचें झाड महिना दोन महिन्यांत लागास येऊन चार सहा महिन्यांत मरून जातें. नारळ, फणस, आंबा, यांस बहुत वर्षांनीं फळें येतात, परंतु आलीं ह्मणजे तीं बहुत रसाळ असून पुष्कळ वर्षेंपर्यंत मनुष्यांस तृप्त करतात. खरें मत लवकर प्रसिद्ध होत नाहीं, पण झालें ह्मणजे जगांतून त्याचें बीज नाहींसें होत नाहीं. प्लेतो या तत्वज्ञानें ह्मटलें आहे; 'जग हें ईश्वरानें मनुष्यास पाठविलेलें पत्र आहे. त्याचा खरा अर्थ कळावा अशा रीतीनें वाचून मनन केलें असतां त्याचा एकच परिणाम घडेल; तो हा कीं, सुशिक्षित मनुष्याच्या मनास त्याची शक्ति अधिक कळेल, त्याचें ज्ञान उत्तम रीतीनें दिसूं लागेल, आणि त्याविषयीं आपण अधिक कृतज्ञ व्हावें, हें समजेल.'

धर्माकरितां दुष्टांपासून छळ सोसल्याचीं उदाहरणें सर्व देशांत आहेत. भरतखंडांत जेव्हां मुसलमान लोक एका हातांत तलवार व दुसऱ्या हातांत कुराण घेऊन आले, तेव्हां लोकांच्या अंगीं स्वधर्माभिमान होता ह्मणून आज आर्यधर्माचें नांव राहिलें, नाहीं तर आज इराणासारखीच भरतखंडाची अवस्था झाली असती. इराणचे लोक प्राचीनकाळीं इतके सुधारलेले असून देशांत त्यांचें नांव देखील राहिलें नाहीं. भरतखंडांतील राजांनीं कृपा करून आश्रय दिला ह्मणून पारशी लोकांचें बीज राहिलें. त्यांसारखेच आपले पूर्वज असते तर आज वेद झेन्दअवेस्त्याच्या पंक्तीस बसला असता. मुसलमानांनीं घोर अनर्थ केले तरी मनूचे वंशज सदसद्विचार सोडून वागले नाहींत. रजपूत लोकांशीं मुसलमानांच्या लढाया सुरू होत्या त्या वेळेस स्वधर्म व स्वतंत्रता यांकरितां

रजपूत लोकांनीं मोठाले पराक्रम केले. शत्रूंस वश होण्याचा प्रसंग टाळण्याकरितां त्यांनीं जीव दिले, परंतु अपमान करून घेतला नाहीं.

धर्माकरतां व स्वतंत्रतेकरतां देहत्याग केल्याचीं उदाहरणें आलीकडे सुधारलेल्या यूरोपखंडांतील देशांत पुष्कळ आहेत. ईंग्लंद देशांत आठवा हेन्री याच्या राज्यांत थामस मोर या नांवाचा एक गृहस्थ होता. एका प्रसंगीं एका कामांत त्याचें मत राजाच्या मताच्या उलट पडलें, त्यामुळें राजा त्याचा द्वेष करूं लागला. शेवटीं हा आपलें मत सोडीना, तेव्हां राजानें त्यावर कांहीं तरी दोषारोप करून त्यास देहांत शासन केलें. तो वधस्थानीं जात असतां आपल्या एका आप्तास हाक मारून ह्मणाला, 'मीं विजय मिळविला, याकरितां ईश्वराचे आभार मानतों.' देहांतशासन झालें तरी स्वमत न सोडण्याचें धैर्य आपणास दिल्याबद्दल त्यानें ईश्वराचे उपकार मानिले. त्याचा एक श्रीमान् मित्र त्यास ह्मणाला, 'मोरसाहेब, मी शपथपूर्वक सांगतों कीं, राजाशीं भांडणें मोठें भयंकर आहे. राजाच्या क्रोधापासून मृत्यु येतो.' यावर मोर ह्मणाला, 'महाराज, इतकेंच काय सगळें! तर मग तुमच्या व माझ्यामध्यें भेद इतकाच कीं, मी आज मरेन. तुह्मी उद्यां मराल.' मोरसाहेबास एका घाणेरड्या तुरुंगांत घालून ठेविलें होतें. मोरसाहेबाची बायको बरीच हुशार होती, तिला वाटे, राजा ह्मणतो त्यास रुकार दिला ह्मणजे या त्रासांतून एकदम सुटून हा आपल्या घरीं जाऊन मुलांबाळांत स्वस्थ नांदूं लागेल, असें असून तसें कां करीत नाहीं, हें मोठें आश्चर्य आहे. एके दिवशीं ती त्यास ह्मणाली, 'आजपर्यंत तुह्मी शहाणे ह्मणून नांवाजलेले असून इतर धर्माध्यक्षाप्रमाणें करून आपली सुटका करून न घेतां ह्या घाणेरड्या तुरुंगांत उंदीर, घुशी, यांमध्यें रहाण्यांत संतोष कां मानितां? ह्या तुमच्या वेडेपणाचें मला मोठें नवल वाटतें.' ठीकच आहे. लोहारास सोन्याची पारख कोठून असणार? मोरसाहेबाच्या मनाची योग्यता त्या भोळ्या बाईला कोठून कळेल? तिचें बोलणें

ऐकून मोरसाहेब ह्मणाला, 'माझ्या हवेलीपासून स्वर्ग जितका जवळ आहे तितकाच या जाग्यापासून आहे,' तेव्हां तर तिनें त्याची टर उडविली.

यूरोपांतील प्रातेस्तंतमताचा प्रवर्तक जो लूथर तोही विलक्षण



मार्टिन लूथर.

धीट होता. त्याला मृत्यूचें भय अगदींच नसे. नास्तिक्याचा दोषारोप करून चौकशीकरितां बादशहानें त्यास वर्म्स या शहरीं बोलाविलें

तेव्हां तेथें न जाण्याविषयीं लोक त्यास सांगूं लागले. त्यावर त्यानें उत्तर केलें 'असें नाहीं, घरावर जितकीं कौलें आहेत त्यांच्या तिप्पट भूतें तेथें असलीं तरी मी जाईन.' ड्यूक जार्ज ह्मणून एक गृहस्थ त्याचा वैरी होता, तो तेथें आहे असें लोकांनीं सांगितलें. तेव्हां तो ह्मणाला, 'नऊ दिवस एकसारखा ड्यूक जार्जीचा पाऊस पडला तरी मी तेथें जाईन.' पुढें आपलीं मतें न बदलल्यास शत्रूंनीं त्यास शिरच्छेदाचा धाक घातला, तेव्हां तो ह्मणाला, 'मला पांचशें डोकीं असलीं आणि तीं सगळीं गेलीं तरी मी आपलीं धर्ममतें सोडणार नाहीं.' शत्रूंकडून जितका त्यास त्रास होई तितकें त्यास अधिक धैर्य येई. शूर पुरुष अपकीर्तीला जसे भितात तसे मरणाला भीत नाहींत. त्या वेळच्या एका गृहस्थानें लूथर याविषयीं असें ह्मटलें आहे कीं, 'मरणास न भिणारा लूथर यासारखा दुसरा मनुष्य साऱ्या जर्मनींत सांपडणार नाहीं.'

इंग्लंडांत प्रजासत्ताक राज्य झालें तेव्हां हेन्री व्हेन् ह्मणून एक मनुष्य होता, त्यास वधस्थानीं चालविलें तेव्हां तो ह्मणाला, 'सदसद्विचारशक्तीस अयोग्य वाटतें तें करून अंतःकरण बाटविण्यापेक्षां दहा हजार मृत्यु बरे. सर्व जगापेक्षां अंतःकरणाची पवित्रता आणि निर्मलता यांची योग्यता मी जास्त मानतों.' मरणापूर्वीं तुरुंगांत असतां त्यानें असें लिहून ठेविलें आहे, 'ज्याला मरणाचें भय नाहीं, तो कशासहि भीत नाहीं. जशी जगण्याची वेळ आहे, तशी मरण्याचीहि आहे. दुर्जीवनापेक्षां सुमरण चांगलें व ग्राह्य आहे. मरणापेक्षां जगणें चांगलें असतें तोंपर्यंत शहाणा मनुष्य वांचतो. पुष्कळ जगणें हें सर्वदा चांगलें आहे असें नाहीं.'

इंग्लंदांत पहिल्या चार्लस् राजाच्या वेळेस जान् हामडन् या नांवाचा एक गृहस्थ होऊन गेला. हा मोठा नीतिमान् व धीट होता. राजानें विनाकारण पुष्कळ लढाया केल्यामुळें खजिन्यांत पैशाची तूट पडली, तेव्हां तो अनेक प्रकारचे कर बसवूं लागला. लढाईच्या प्रसंगीं समुद्रावरील फौजेच्या खर्चाकरितां किनाऱ्याव-

रील शहरांत एक प्रकारचा कर बसविण्याची एक वहिवाट होती, परंतु राजानें जुलुमानें चोहोंकडे हा कर बसविला, त्यामुळें मोठा गोंगाट झाला. हामडन् याजवर थोडा कर बसला होता, पण त्यानें साफ सांगितलें कीं, हा कर अन्यायानें बसविला आहे, हा मी देणार नाहीं. हामडन् यानें विचार केला कीं, जवळचा सर्व पैसा गेला तरी हरकत नाहीं, पण हा जुलमाचा कर देणार नाहीं. पुढें तो तंटा इतका माजला कीं, न्यायाधीशापुढें त्याची चौकशी झाली. न्यायाधीशांनीं पक्षपात करून राजासारखा न्याय केला, परंतु वादविवादांत हामडन् याचीं कर न देण्याचीं कारणें सबळ आहेत, व राजाचीं हा कर बसविण्याचीं कारणें अगदीं पुळपुळीत आहेत, असें सर्वांस दिसून आलें. यामुळें हामडन् याच्या धैर्याची वाहवा होऊन त्याचा पक्ष सबळ झाला. या व इतर कारणांमुळें देशांत राजाविरुद्ध बंड होऊन जुलमाबद्दल लोकांनीं राजाचा शिरच्छेद करून लोकसत्ताक राज्य स्थापिलें. कांहीं दिवसांनीं पुनः राजसत्ताक राज्य झालें; पण तेव्हांपासून इंग्लंडच्या राजांच्या हातची जुलूम करण्याची सर्व सत्ता नाहींशी झाली ती झालीच. राजा हा ईश्वराचा पृथ्वीवरील गुमास्ता आहे, तो करील तें प्रमाण, त्यास कोणीं आड येऊं नये, वगैरे भ्रांतिमूलक जुन्या समजुती तेव्हांपासून समूल नाहींतशा होऊन राजा हा सर्व लोकांनीं आपल्या कारभाराकरितां नेमलेला मुनीम होय; तो चांगलें काम करणार नाहीं तर त्यास पदच्युत करण्याचा लोकांस पूर्ण अधिकार आहे, हें मत यूरोपांतील लोकांच्या मनांत वज्रलेपाप्रमाणें ठसलें आहे; तें आतां नाहींसें होणार नाहीं.

सर्व लोक फलप्राप्तीकरितां उद्योग व श्रम करतात, परंतु कित्येकांस बहुत दिवस यश येत नाहीं; असें झालें तरी ते धैर्य सोडीत नाहींत, त्यामुळें अखेरीस त्यांची कार्यसिद्धि होते. जगांत धैर्याशिवाय मोठालीं सत्कृत्यें होणार नाहींत. हजारों लोकांचे बळी पडतात तेव्हां किल्ला सर होतो. सर्वदा विजय झाल्यामुळेंच

धैर्य कळतें असें नाहीं. पराजय झाला तरी केलेल्या पराक्रमावरून धैर्य कळल्याशिवाय रहात नाहीं. रोमन लोकांनीं हानिबल याचा पराभव केला ह्मणून हानिबलाच्या कीर्तीस कमीपणा आला आहे असें नाहीं. महाशूर झांशीची राणी लक्ष्मीबाई हिचा पराजय झाला



**झांशीसंस्थानच्या महाराणी लक्ष्मीबाईसाहेब.**

तरी सर ह्यू रोजसारख्या वीरसिंहांनीं केलेली तिच्या अनुपम पराक्रमाची कीर्तिगर्जना जगांतून नाहींशी होईल काय ? पराजय होण्याचीं अनेक कारणें असतात. सोनपतपानपतच्या लढाईंत पराभव झाला ह्मणून त्या वेळेस मराठ्यांमध्यें शौर्य कमी होतें असें कोणी ह्मणणार नाहीं. बापू गोखल्यांचा पराजय झाला ह्मणून त्यांच्या धैर्यास

व राजनिष्ठेस कमीपणा आला आहे काय? तात्या टोपे यांच्या शौर्याचें व युद्धकौशल्याचें वर्णन इंग्लिश लोकांनीं सुद्धां केलें आहे. स्वदेशाच्या स्वतंत्रतेकरितां व स्वधर्मरक्षणाकरितां जे धैर्यानें हालअपेष्टा सोसून कधीं कधीं जीवदान देखील देतात, त्यांची योग्यता विजयी पुरुषांपेक्षां कमी आहे असें नाहीं. 'सदर तिकडे नदर' या ह्मणीप्रमाणें आर्जवी तोंडपुजे लोक विजयी पुरुषांप्रमाणें त्यांचीं गाणीं न गावोत, तरी त्यांच्या धैर्याची मनांत वाखाणणी केल्याशिवाय लोक रहाणार नाहींत. वातर्लू येथील लढाईत पराभव झाल्यामुळें नेपोलियन बोनापार्ट याच्या शौर्यास कमीपणा येतो असें नाहीं.



**नेपोलियन बोनापार्ट.**

स्वधर्म व स्वदेश यांच्या संरक्षणाकरितां पराक्रम करण्यासच अंगीं मोठें धैर्य पाहिजे असें नाहीं. संसारांत पदोपदीं धैर्याची गरज आहे. प्रामाणिकपणानें वागण्यास, इंद्रियें स्वाधीन ठेवण्यास,

सत्य बोलण्यास, लोकांस भिऊन फुका डौल न घालतां आपल्या सामर्थ्याप्रमाणें व योग्यतेप्रमाणें वागण्यास धैर्य पाहिजे. मनुष्यावर लबाडी करण्यासारखीं नेह्मी मोठीं प्राणसंकटें येतात असें नाहीं. क्षुल्लक कामाकरितां देखील लोक खोटेपणा करतात. परस्त्री, परधन, यांचा अपहार करणें हें पाप आहे, त्यापासून केवळ परलोकाची हानि आहे इतकेंच नाहीं, त्यामुळें ऐहिक सुखास देखील मनुष्य आंचवतो; या गोष्टी कोणास समजत नाहींत असें नाहीं. त्या समजण्यास बारा वर्षें अध्ययन केलें पाहिजे असें नाहीं. परंतु मनुष्याच्या अंगीं मनास आंवरून धरण्याचें धैर्य नसल्यामुळें केवळ अविद्वानच नाहीं पण मोठमोठे विद्वान् अशांच्या हातून सुद्धां अशा वाईट गोष्टी घडतात. ज्यास यूरोपांतील लोक 'अर्वाचीन तत्त्वज्ञानाचा जनक' असें ह्मणतात, असा महापंडित लोकमान्य लार्ड बेकन यानें मोठ्या पदावर असतांहि लांच खावा हें किती शोचनीय आहे? विद्येप्रमाणें त्याच्या अंगीं मनोधैर्य असतें तर केवढी मौज झाली असती! क्षुधेनें पीडित झालेल्या वाटसरानें दुसऱ्याच्या शेतांत शिरून हुरड्याचीं कणसें चोरलीं तर त्यास सबब आहे, परंतु ज्यांस शेंकडों हजारों रुपये पगार असून पगाराचा चतुर्थांश देखील खर्च होत नाहीं, अशा विद्वान् ह्मणविणाऱ्या कामदारांनीं अधिकाराच्या बळावर अन्याय करून गरीब लोकांपासून लांच खाल्लयाच्या गोष्टी ऐकूं येतात, हें केवढें आश्चर्य आहे? रूपशीलसंपन्न अशा स्वस्त्रीचा अव्हेर करून शहाणे ह्मणविणारे असे परस्त्रीकडे पहाणारे थोडे आहेत काय? त्यांस या गोष्टी वाईट, असें समजत नाहीं असें नाहीं, परंतु त्यांपासून निवृत्त होण्यास जें आवश्यक मनोधैर्य तें त्यांच्या अंगीं नाहीं, हेंच कारण होय.

लोकांच्या अज्ञानमूलक चालींस न भितां आपल्या सामर्थ्याप्रमाणें वागण्याचें धैर्य नसल्यामुळें मनुष्यास त्रास थोडा होतो काय? स्वरा-

ज्यांत संपत्तीचा पूर आल्यामुळें लग्नकार्यांत अव्यवस्थित खर्चाच्या अनेक चाली पडल्या आहेत, त्यांपैकीं कित्येक तर अशा आहेत कीं खर्च करून त्यांपासून कांहींएक उपयोग न होतां उलटा त्रास मात्र होतो, परंतु त्यांकरितां लोकांस भिऊन घरसुद्धां गहाण ठेवणारे लोक थोडे आहेत काय? शास्त्रदृष्टीनें पाहिलें असतां मुलाची मुंज करणें ह्मणजे त्याकडून विद्याभ्यासास आरंभ करविणें होय. मुंजीच्या संकल्पांतील एक अक्षर देखील झालें नाहीं तरी हरकत नाहीं, पण कळवंतिणीचा नाच झालाच पाहिजे, अशीं उदाहरणें पुण्यासारख्या शहरांत थोडीं नाहींत. मुलाचें किंवा मुलीचें लग्न करणें ही संसारांतील साधारण गोष्ट होय, पण ती आपल्या देशांत जशी कठिण झाली आहे, तशी कोठेंहि नसेल. मुंबईतील कित्येक जातींत तर या कठिणपणाचा इतका कळस झाला आहे कीं, सद्गुणी, सुस्वरूप अशा मुलीस सुद्धां केवळ आईबापांच्या गरीबीमुळें वर मिळण्यास कठिण पडतें. प्रत्येक स्त्रीचा विवाह अवश्य झाला पाहिजे असा हिंदुस्थानांतील बहुशः सर्व जातींत अनादिसिद्ध आचार आजपर्यंत चालत आहे तो अशा प्रकारच्या धनलोभानें मोडून जाण्याचा प्रसंग आला आहे. लग्नांत अनेक त्रासदायक चाली पडल्यामुळें घरीं लग्नाचा प्रसंग आला ह्मणजे मालकास उरावर मोठी धोंड पडली आहे असें वाटतें.

व्याहीविहिणी यांच्या मानापानाकरितां लोक पुष्कळ त्रास सोसतात, पण ज्यांचें लग्न करावयाचें त्यांच्या पुढील सुखाकडे बहुशः कोणी पहात नाहीं. रोज नेसावयास अंगभर वस्त्र न मिळालें तरी हरकत नाहीं. परंतु लेंकीला किंवा सुनेला प्रथम ऋतुदर्शन झालें ह्मणजे भाड्याचा मेणा करून तिची मिरवणूक करतात. अशा कित्येक खरोखर घाणेरड्या लज्जास्पद चाली आहेत, त्यांचें खरें स्वरूप ओळखणारेहि मनांत धैर्य नसल्यामुळें त्या टाकण्यास भितात. लोकांची अंधपरंपरा अशी आहे कीं, आरंभीं ज्या गोष्टी सुखाकरतां योजिलेल्या असतीत, त्यांचें रूपांतर हो-

ऊन त्याच दुःखप्रद होतात. यास पागोट्याचें उदाहरण चांगलें आहे. पागोटें ह्मणजे शिरस्त्राण होय, परंतु कित्येकांनीं त्यास शिरोभाराची योग्यता आणली आहे.

जगांत मनुष्यांस जीं दुःखें होतात, त्यांपैकीं बहुतेकांस कारण त्यांस मानसिक धैर्य नाहीं हें होय. अमुक गोष्ट चांगली व करतां येण्यासारखी असून मनुष्यास धैर्य नसल्यामुळें ती त्याच्या हातून होत नाहीं. अंगीं स्वतः धैर्य नसून संगति चांगली नसली म्हणजे मनुष्यास खड्ड्यांत पडण्यास वेळ लागत नाहीं. अंगीं सद्वर्तन बिंबणें आणि तें कायम रहाणें हें धैर्याशिवाय होणार नाहीं. यांत संशय नाहीं. रामवियोगदुःखानें प्राण गेला तरी हरकत नाहीं पण सत्य सोडणार नाहीं असें धैर्य दशरथराजास नसतें तर बायकोला दिलेलें वचन मोडणें त्यास कठिण होतें असें नाहीं. पित्राज्ञा पालन करणें हें पुत्राचें कर्तव्य आहे, तें करण्यास कितीही संकटें आलीं तरी सोसण्याचें धैर्य रामास नसतें तर वृद्ध पित्याची आज्ञा धाब्यावर बसविण्यास त्यास कोणाचें भय नव्हतें. सद्वर्तनाविषयीं मनुष्याच्या मनांत इच्छा उत्पन्न झाली पाहिजे; तथापि ती उत्पन्न झाल्यावर कायम राखून तडीस नेण्यास धैर्य पाहिजे. तें नसलें तर मनुष्यास दुर्मार्गापासून दूर रहातां येणार नाहीं. सन्मार्ग न सोडण्याचें धैर्य नसल्यामुळें एकवार दुर्मार्गाकडे पाऊल पडलें तर कडेलोट झाल्याशिवाय रहाणार नाहीं.

प्रसंगीं दुसरा उपयोगीं पडेल असें मानणें व्यर्थ आहे. बिकट प्रसंग आल्यास त्यांतून पार पडण्याचें धैर्य ज्याचें त्यासच पाहिजे. दुसऱ्याच्या मदतीची गरज न ठेवितां आपलें काम आपण करण्याची संवय मनुष्यानें धरिली पाहिजे. पुष्कळ मनुष्यांच्या मनांत सत्कृत्यें करावयाचीं असतात, परंतु धैर्य नसल्यामुळें तीं तडीस जात नाहींत. नुसती तोंडानें बडबड करणारे पुष्कळ असतात, परंतु न बोलतां काम करूं लागणारे थोडे आहेत. कित्ये-

कांच्या मनांत सत्कृत्यें करावयाचीं असून उद्यां करूं, पुढें करूं, असें ह्मटल्यामुळें त्यांच्यानें मुळींच होत नाहींत.

जगांत सर्व ठिकाणीं वाईट मनुष्यें आहेतच. केवळ चांगल्या मनुष्यांशींच संबंध ठेवूं ह्मटलें तर चालणार नाहीं. याकरतां त्यांपासून आपणांस वाईट संगति लागूं न देण्यास मनुष्यांच्या अंगीं धैर्य पाहिजे. स्वतः चांगले असून दुसऱ्यांच्या नादानें फसणारे लोक फार आहेत. पुरुषांपेक्षां स्त्रियांस संगतीपासून बिघडण्याचें भय फार असतें. स्वतः चांगल्यावाइटाचा विचार करून वागणारे फार थोडे आहेत. लोकांचें पाहून ऐकून वागणारेच पुष्कळ. लोकरीती वाईट असली तर ती सोडून वागण्यास अंगीं धैर्य पाहिजे. हें धैर्य नसल्यामुळें आपल्या योग्यतेप्रमाणें न राहतां खाणेंपिणें, वस्त्रपात्र, लग्नकार्य इत्यादिकांत शुष्क लोकरीती संभाळण्याकरतां कर्ज काढून हाल सोसावे लागतात. मोठ्या शहाण्यासही हें धैर्य नसल्यामुळें मूर्खांनीं पाडलेल्या चालींपुढें वांकावें लागतें. लोकप्रचार हा पाण्याच्या ओघासारखा आहे, त्याबरोबर निर्जीव पदार्थ देखील वहात जाईल, परंतु त्याच्या उलट जाण्यास अंगीं जोर पाहिजे. अंगीं धैर्य नसल्यामुळें मोठमोठ्या विद्वानांच्या बोलण्यांत व करण्यांत मेळ रहात नाहीं. त्यांचें मत वेगळें असून लोकप्रियता संभाळण्याकरितां ते चालू असलेल्या वाईट प्रचारांस अनुसरतात. आपलें मत लोकांस न सांगतां त्याप्रमाणें वागणें हें कित्येकांस मोठें शहाणपण वाटतें. विद्वान् व शहाणे लोक असे भित्रेपणानें वागूं लागले ह्मणजे इतर लोकांस धैर्य कोठून येणार? ते तर थोरांकडे पाहून वागणार. धैर्य नसल्यामुळें लोकाचारास अनुसरणारे पुष्कळ असतात. त्यामुळें लोकप्रिय असणारा मनुष्य चांगलाच असेल असा नेम नाहीं. खरा सदाचारी आहे तो खरें बोलण्यास लोकांस भिणार नाहीं. तो ईश्वराचें व आपल्या मनाचें मात्र भय बाळगितो. अज्ञान लोकांस न भितां आपलीं खरीं

व चांगलीं मतें प्रसिद्ध करतो तोच खरा विद्वान् होय. अंधपरंपरेनें चालणाऱ्यास विद्या असली किंवा नसली तरी सारखीच.

विद्येचा खरा उपयोग म्हटला म्हणजे सत्यासत्यविवेचन हा होय. काल, देश, संगति इत्यादिकांच्या योगानें मनुष्यांत अनंत मतभेद होऊन गुणदोषांचा संकर झाला आहे, यामुळें सत्य हें सामान्य मनुष्यास सहज कळण्यासारखें असून त्याचें ज्ञान फार बिकट झालें आहे. यामुळें अनेक गोष्टींची तुलना करून तारतम्य पाहून सत्यासत्य, योग्यायोग्य, ग्राह्याग्राह्य, न्याय्यान्याय्य यांचा स्वमतीनें निश्चय करणें हें विद्वानांचें काम आहे. एकाच्या दृष्टीनें गुण तोच दुसऱ्याच्या दृष्टीनें दोष, एका देशांत पुण्य तेंच दुसऱ्या देशांत पाप अशी स्थिति जगांत आहे, म्हणूनच देशकालानुसार सत्य, योग्य, ग्राह्य, न्याय्य मार्ग सुरू रहावा, याकरतां देशांत विद्वानांची आवश्यकता आहे. याकरतांच लोक त्यांस आश्रय व सन्मान देतात. यासाठीं अंधपरंपरेकडे न वळतां विद्वानांनीं स्वबुद्धीनें सन्मार्ग निश्चित करून धैर्यानें त्याचा अवलंब केला पाहिजे. तसेंच मनुष्य केवढाही ज्ञानी झाला तरी त्याचें ज्ञान अपूर्णच आहे, यासाठीं आपल्या मतास लोक अनुसरत नाहींत म्हणून त्यांस उद्धटपणानें मूर्ख म्हणतां कामा नये. आमच्या देशांत आजपर्यंत धर्ममार्ग, भक्तिमार्ग बहुत निघाले. वर्तमानपत्रें, सडका, आगगाड्या, वगैरे हल्लींप्रमाणें लोकांमध्यें दळवळण वाढण्याचे मार्ग सुरू नसतांही कोणीं कांहीं मार्ग काढला कीं शेंकडों लोक तदनुयायी होऊन थोड्या वर्षांत त्याचा प्रसार होई. अलीकडे विद्वान् व पुढारी म्हणविणाऱ्या लोकांनीं, धर्म, भक्ति, नीति, संपत्ति, व्यापार वगैरे वाढण्याकरतां पुष्कळ सभा वगैरे स्थापित केल्या, परंतु एकाही प्रयत्नास म्हणण्यासारखें फल आलें नाहीं. या गोष्टीचें लोकांस व प्रवर्तकांस सारखेंच आश्चर्य वाटतें. लोक सुशिक्षित नाहींत म्हणून आम्हांस यश येत नाहीं असें म्हणून प्रवर्तक समाधान मानून

घेतात, परंतु असें होण्याचीं कारणें वेगळींच आहेत. एक तर बहुशः स्वमत ह्मणून आमच्या आलीकडील विद्वानांत कांहींच नाहीं; असें ह्मटलें तरी चालेल. साहेबलोकांत कोणत्याही हेतूनें एकादें मत निघालें ह्मणजे त्याचा प्रतिध्वनि चोहोंकडे गर्जूं लागतो. तुकाराम, रामदास, शिवाजी ह्यांच्या वेळेस लोक सुशिक्षित होते ह्मणून त्यांच्या प्रयत्नास फळ आलें असें नाहीं; ते बोलत त्याप्रमाणें वागत हेंच त्यांच्या विजयाचें मुख्य कारण होय. हल्लींच्या नूतनमार्गप्रवर्तनेच्छूंमध्यें चमत्कारिक प्रकार दृष्टीस पडतो. त्यांचें सभेंत बोलावयाचें मत एक, घरांत वागण्यांत दुसरेंच. साहेबलोकांत बोलावयाचें मत एक, आपल्या लोकांशीं वागण्याचा प्रकार वेगळाच. आज बम्मनजीच्या हाटेलांत निवडक मित्रांबरोबर यथेच्छ मद्यमांसाहार करून उद्यां जरीकांठी पीतांबर नेसून जुन्या लोकांच्या पंक्तींत फिरण्यास तयारच. अशा आचरणामुळें लोकांच्या मनावर एक वाईट परिणाम झाला. तो हा कीं, नवीन मार्ग सांगणारे सर्वच लबाड असें लोकांस वाटून, कित्येक अंतःकरणापासून सत्यास अनुसरणारे असतात त्यांचीही ढोंगी लोकांत गणना होते. ज्यांनीं आपणास मान द्यावा असें वाटतें त्यांस आपण विद्येनें व आचरणानें मानास पात्र आहों असें दाखविलें पाहिजे, हें तत्त्व डोळ्यांपुढें नसल्यामुळें जुन्या विद्वानांची जशी हेळसांड झाली तशीच नव्यांचीही होऊं लागली, ही गोष्ट लोककल्याणाच्या सूत्रधारांनीं ध्यानांत ठेवण्यासारखी आहे.

इंग्लंदांत लोकसत्ताक राज्याच्या वेळीं एक पिम् नांवाचा वक्ता होता. तो एके वेळेस ह्मणाला 'सत्याकरितां मी आपला नाश करून घेईन. पण आपल्याकरितां सत्याचा नाश होऊं देणार नाहीं.' मनुष्यानें सत्याकरितां सोय सोडली पाहिजे, परंतु सोईकरितां सत्य सोडणें योग्य नाहीं. प्रामाणिकपणानें अनुकूल प्रतिकूल गोष्टींचा पूर्ण विचार करून अमुक मत चांगलें आहे असें मनांत निश्चित ठर-

विल्यावर तें प्रवृत्त करणें हें विद्वानांचें काम आहे. लोकस्थिती-मध्यें असे पुष्कळ प्रसंग आहेत कीं, त्या वेळेस जनसमूहाच्या उलट बोललेंच पाहिजे. त्या योग्य वेळेस असें करणार नाहीं तो देशाभिमानी नाहीं इतकेंच नाहीं तर त्यास देशशत्रु ह्मटलें तरी चालेल. देशांत दुराचार, दुर्मार्ग, दुष्ट चाली, वगैरे पडतात त्या धैर्याशिवाय उडविल्या जाणार नाहींत. प्रामाणिक मनुष्यास लुच्चेगिरी आवडत नाहीं, खऱ्या मनुष्यास लबाडी आवडत नाहीं, व सदाचारी मनुष्यास दुर्वर्तन आवडत नाहीं; पण या दुर्गुणांचा पराजय करण्यास त्यांच्या अंगीं धैर्य पाहिजे. प्रामाणिक, खरे न्यायी, सदाचारी, असे पुरुष हीच देशाची मोठी शक्ति होय. परोपकारबुद्धि व धैर्य यांच्या योगानें लोकस्थिति चांगली चालण्यास ते आधारभूत होतात. असे पुरुष जगांत झाले त्यामुळेंच सद्वर्तनाची प्रवृत्ति झाली आहे. असे पुरुष नसतील तर दुर्गुणांचें राज्य पिकेल. आजपर्यंत जगाचे जे मोठे हितकर्ते होऊन गेले त्यांचा आरंभीं लोकांनीं द्वेष केला, परंतु आतां त्यांचें नांव निघालें ह्मणजे सर्व लोक मस्तक डोलवितात.

धैर्य व उत्साह हे गुण अंगीं असले तर मनुष्य आपल्या शहाणपणानें जगांत केवढाले अद्भुत चमत्कार करील याचा नेम नाहीं. शिवाजी व थोरले बाजीराव यांस एवढाले पराक्रम करण्यासारखें त्यांपाशीं आरंभीं काय साधन होतें? त्यांस विघ्नें थोडीं आलीं काय? धैर्य आणि दया हे गुण वेगळे नसून एकमेकांस प्रतिकूळ नाहींत इतकेंच नव्हे पण धैर्य असल्याशिवाय दयेचाही उपयोग होणार नाहीं. भित्रा मनुष्य दुसऱ्यास संकटांतून सोडविण्यास कसा पुढें होईल? जे मोठे शूर असतात ते तसेच दयाशीलही असतात. वरील दोन पुरुषांनीं स्वधर्म व स्वदेश यांच्या रक्षणाकरितां शौर्यानें मोठाले पराक्रम केले तरी त्यांचीं अंतःकरणें किती कोमल होतीं! वीर पण क्रूर अशा इतर पुरुषांप्रमाणें वि-

नाकारण क्रूरपणा केल्याचें उदाहरण त्यांच्या चरित्रांत सांपडणार नाहीं. खरा शूर असतो तो मोठा उदार असतो. निजामउल्मुल्क वगैरे शत्रु कित्येक वेळां चांगले तावडींत सांपडले असून त्यांस नम्र करून बाजीरावानें सोडून दिलें. कित्येक शत्रु रणांत पडल्यावर त्यांच्या मुलांस गादीवर बसविलें.

अंगीं धैर्य नसल्यामुळें मनुष्य दुष्ट, खोटा, क्रूर, कुत्सित, निरुद्योगी, व्यसनी असा होतो. धैर्य असल्याशिवाय स्त्री किंवा पुरुष यांचें सद्वर्तन रहाणार नाहीं. ज्यास धैर्य नाहीं तो मनुष्य मृतप्राय होय. सद्वर्तन हें मनुष्याचें जीवित आहे. तें धैर्यापासून उत्पन्न होतें म्हणूनच कवीनें 'धैर्य यस्य पिता' या श्लोकांत धैर्यास बापाची उपमा दिली आहे.

---

## भाग ६.

## आत्मसंयमन.

इंद्रियाणां प्रसंगेन दोषमृच्छति मानवः ॥
सन्नियम्य तु तान्येव सिद्धिं समधिगच्छति ॥ १ ॥ मनुः.

आत्मसंयमन म्हणजे मनाचा निग्रह. हा धैर्याचा अपरपर्याय आहे, असें म्हणण्यास चिंता नाहीं. आत्मसंयमन हें सद्वर्तनाचें जीवित होय. जनावर व मनुष्य यांमध्यें यापासूनच भेद उत्पन्न होतो. जनावरांस कार्याकार्य, भक्ष्याभक्ष्य,पेयापेय,गम्यागम्य, योग्यायोग्य हा भेद नाहीं. मनुष्यास मनोनिग्रहाच्या योगानें तो बाळगिला पाहिजे. मनोनिग्रह हें सर्व सद्गुणांचें बीज आहे. रथाचे घोडे बळकट व शीघ्रवाही असून त्यांचा लगाम हातांत असला तर रथी विवक्षित स्थळीं त्वरेनें जाईल पण लगाम हातांतून सुटला तर त्या स्थळीं लवकर जाणार नाहीं, इतकेंच नाहीं, पण केव्हां एकाद्या खड्ड्यांत पडून नाश पावेल याचा नेम नाहीं; तसेंच देहरूप रथाचें आहे. त्याचे इंद्रियरूप अश्व स्वाधीन नसले तर ते दुराचाररूप खड्ड्यांत घालून मनुष्याचा केव्हां नाश करतील याचा नेम

नाहीं. याकरितांच श्रुतिस्मृतिपुराणांमध्यें ठिकठिकाणीं शरीरास रथाची उपमा दिली आहे. महाभारतांत व्यासांनीं ह्मटलें आहेः—

**[१]रथःशरीरंपुरुषस्यदृष्टमात्मानियंतेंद्रियाण्याहुरश्वान् ॥**
**तैरप्रमत्तैः कुशलीसदश्वैर्दांतैःसुखंयातिरथीवधीरः ॥ १ ॥**

पशुत्वापेक्षां श्रेष्ठ जें मनुष्यत्व तें आपणामध्यें असावें अशी ज्याची इच्छा असेल, त्यानें मनाच्या कलाप्रमाणें न वागतां योग्यायोग्याचा विचार करून अयोग्य असेल तें आवडत असलें तरी निग्रहानें टाकलें पाहिजे; व योग्य असेल तें आवडत नसलें तरी स्वीकारिलें पाहिजे. श्रेय ह्मणजे हितकारक आणि प्रेय ह्मणजे आवडणारें, हीं दोन प्रत्येक मनुष्याच्या पाठीमागें सर्व ठिकाणीं आहेतच. त्यांपैकीं श्रेय स्वीकारणाऱ्यांचें हित होतें, प्रेय स्वीकारणाऱ्यांचा नाश होतो, असें शास्त्रांत सांगितलें आहे. रणांगणीं मोठमोठ्या बलाढ्य शत्रूंचा पराजय करून त्यांस जेर करणाऱ्यांपेक्षां आपल्या मनास जिंकून स्वाधीन ठेवणाऱ्यांची योग्यता मोठी मानिली आहे. मनोनिग्रह करून लोक सदाचरणानें वागतील तर मनुष्यत्वास लाज आणणारे चौर्यव्यभिचारादि दोष जगांतून बहुतांशीं नाहींतसे होतील. आत्मसंयमन नसणें हेंच बहुतेक गुन्ह्यांचें कारण आहे.

अन्नच तारक आणि अन्नच मारक अशी ह्मण आहे, कारण अन्न खाल्ल्याशिवाय मनुष्य जगणार नाहीं; पण तेंच बेताबाहेर खाल्लें तर अजीर्णापासून दुखणें येऊन मरणही येतें, त्याप्रमाणेंच मनाचेंही आहे. मन स्वाधीन ठेवून चांगल्या मार्गास लाविलें तर मित्राप्रमाणें तें हित करील, पण स्वाधीन न ठेवितां दुर्मार्गाकडे तें लागूं दिलें तर शत्रूप्रमाणें नाशही करील. यामुळें 'मन हेंच बंध आणि मोक्ष यांचें कारण आहे' असें विद्यारण्यस्वामींनीं ह्मटलें आहे.

---

१ पुरुषाचें शरीर हा रथ होय, मन हा सारथी होय, आणि इंद्रियें हे घोडे होत. घोडे स्वाधीन असले ह्मणजे कुशल रथी जसा सुखानें मार्गक्रमण करतो, त्याप्रमाणें इंद्रियें स्वाधीन असलीं ह्मणजे मनुष्य संसारांतून पार पडतो.

आत्मसंयमनाची संवय लागण्यास आरंभापासून चांगलें शिक्षण मिळालें पाहिजे. शिक्षणाच्या योगानें अगदीं साधारण मनुष्य मोठ्या योग्यतेस चढल्याचीं उदाहरणें पुष्कळ आहेत. सुशिक्षणापासून मनोनिग्रहाची संवय लागल्याशिवाय संसारांत मनुष्यास सुख व्हावयाचें नाहीं. योग्य अभिमान, नम्रता, स्वधर्माचरण या गोष्टी मन स्वाधीन असल्याशिवाय होणार नाहींत. आजपर्यंत जगांत जे मोठे पराक्रमी पुरुष होऊन गेले, ते मोठे निग्रही होते. ज्याच्यानें आपलें मन ताब्यांत ठेववत नाहीं, तो लोकांवर कसा अंमल करील? ज्याचें मन स्वाधीन नाहीं; त्याच्या हातून दुराचरण झाल्याशिवाय रहाणार नाहीं.

सद्वर्तन शिकण्याची पहिली शाळा घर होय, हें मागें सांगितलेंच आहे. गृहशिक्षा चांगली नसल्यामुळें किती बुद्धिमान् मुलें वाईट निघालीं आहेत? अगदीं बाळपणापासून आईबापांनीं मुलांस मनोनिग्रहाची संवय शिकविली पाहिजे. मुलांच्या कल्याणाचा उद्देश मनांत बाळगून त्यांस चांगलें खाऊं घालावें, उंची वस्त्रें द्यावीं, पण भलतेच लाड करून त्यांस पाहिजे तसें करूं दिलें तर त्यांचें मन अनावर होऊन त्यांचा नाश होतो. लहानपणीं मन मोकळें सोडलें तर मोठेपणीं तें आवरण्यास कठिण पडेल. एकुलतीं एक मुलें असतात तीं बहुशः वाईट निघतात; याचें कारण हेंच कीं, बाळपणीं आईबापें लाडानें पाहिजे तें त्यांस करूं देतात. शाळेंत गेल्यावर गुरूनेंही मुलांच्या मनांस चांगलें वळण लाविलें पाहिजे. यथेच्छ वर्तनाची एकवार चटक लागली ह्मणजे मनुष्य आपला नाश करून घेऊन इष्टमित्रांस दुःख देईल. मुलांस मानसशिक्षा देण्यास त्यांचें ताडण केलें पाहिजे असें नाहीं. आपण त्यांचे देखत चांगुलपणानें वागून त्यांच्या ठायीं स्वभावतःच सदाचरणाची आवड उत्पन्न केली पाहिजे.

मन स्वाधीन ठेवणें न ठेवणें हें कांहीं अंशीं शरीराच्या स्वस्थपणावर अवलंबून आहे खरें, तथापि मन स्वाधीन नसल्यामुळें-

च बहुशः शरीराचा स्वस्थपणा बिघडतो. मनास जशी संवय लावावी तशी लागते. दोघां मनुष्यांची स्थिति सारखी असून एक उल्हासवृत्ति धरून रहाणारा व दुसरा नेहमीं उदास असणारा अशीं उदाहरणें पुष्कळ सांपडतील. संसारसागरास भरती ओहोटी आहेतच. त्यांत सर्वच लाटा आपणांस अनुकूल येतील असें नाहीं; कांहीं प्रतिकूलही येतील. याकरितां सर्व प्रसंगीं संतुष्ट राहून उद्योग करण्याची संवय असली तरच त्यांतून मनुष्य पार पडेल. कित्येक मनुष्य असे असतात कीं, त्यांस थोडेंसें दुःख झालें कीं ते त्याखालीं दडपून जातात. असें न करतां दुःखाकडे विशेष लक्ष न देऊन प्राप्त झालेल्या सुखांत संतोष मानण्यापासून मोठा लाभ होईल.

जगांत आजपर्यंत जे प्रख्यात साधु होऊन गेले ते मोठे जितेंद्रिय होते. जितेंद्रियतेशिवाय साधुत्व प्राप्त होणार नाहीं. साधु उद्योगी व शांत राहून परोपकार करतो. दुःखानें त्याचें अंतःकरण विव्हळ होत नाहीं. त्याला मरणाचें भय वाटत नाहीं. तो दुर्गुणांस आपल्याजवळ येऊं देत नाहीं. तो ईश्वराकडे लक्ष लावून सर्वकाळ वागत असतो. मनुष्य मोठा बुद्धिमान् व विद्वान् असला तरी अंगीं शांति धरल्याशिवाय त्यास तत्त्वज्ञान होणार नाहीं. याकरतांच उपनिषदादि ग्रंथ ह्मणूं लागण्यापूर्वीं 'शांतिः शांतिः शांतिः' असें त्रिवार शांतीचें स्मरण करण्याचा परिपाठ पडला असेल.

आत्मसंयमन परलोकसाधनासच आवश्यक आहे असें नाहीं. ऐहिक सुखास देखील त्याची आवश्यकता आहे. सुशीलता, व्यवस्थितपणा, क्षमा, शांति, हे गुण मनोनिग्रहाशिवाय येणार नाहींत; व ते असल्याशिवाय संसारांत नीट वागतां येणार नाहीं.

ज्यांच्या हातीं राज्यांतील मोठमोठालीं कामें आहेत त्यांच्या अंगीं मनोनिग्रह मोठा पाहिजे. बुद्धि असून मन स्वाधीन नसलें, तर राज्यकारभारांत विशेष यश मिळावयाचें नाहीं. ज्याचें मन

आपल्या स्वाधीन नाहीं, त्याचा दुसऱ्यांवर अंमल कधीं बसणार नाहीं. थोरले बाजीराव पेशवे एवढे निग्रही होते ह्मणूनच शाहू-राजाजवळ त्यांचें एवढें वजन होतें. आपल्या कामाकरितां कितीही दुःखें भोगावीं लागलीं तरी तो कचरणार नाहीं, अशी राजाची खात्री होती ह्मणून तो त्यास प्रिय झाला होता. देशहिताकरितां बाजीरावानें संसारसुखास लाथ मारिली होती, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. बाजीरावाचें वर्चस्व सहन न होऊन प्रतिनिधि वगैरे सरदार त्याचा द्वेष करीत; पण तो त्याकडे विशेष लक्ष देत नसे. त्यांच्यावर रागावून तो आंतल्याआंत भांडण करता तर त्याच्यानें एवढालीं बाहेरचीं कामें झालीं नसतीं.

ज्ञान आणि अनुभव हीं दोन शांतीच्या प्राप्तीचीं साधनें होत. सुशिक्षित मनुष्य असतो तो बोलण्याचालण्यांत अडाण्याप्रमाणें उतावीळ होत नाहीं. सुशिक्षित मनुष्य दुसऱ्याच्या अपराधांची क्षमा करील तशी अशिक्षित करणार नाहीं. मनुष्याच्या हातून अपराध घडण्यास अनेक कारणें असतात, असें समजून शहाणा मनुष्य विचार केल्याशिवाय एकदम त्यास दोषी ठरविणार नाहीं. एका विद्वानानें ह्मटलें आहे, "असा कोणताही अपराध नाहीं कीं, तो कदाचित् माझ्या हातून घडला नसता." आत्मसंयमन हा गुण अंगीं असल्याशिवाय पुरतें शौर्य कधीं येणार नाहीं. हा गुण शिवाजीच्या अंगीं पूर्ण असल्यामुळेंच त्यानें अनेक बिकट प्रसंगीं चातुर्यानें वागून दुष्टांचा पराभव केला. तोच गुण त्याचा मुलगा संभाजी याच्या अंगीं नसल्यामुळें त्याचा नाश झाला. नेपोलिअन बोनापार्त एकामागून एक देश जिंकूं लागला. तेव्हां त्याचे शत्रू अनेक सुंदर स्त्रिया त्याचें मन विषयांध करण्यास गुप्तपणें पाठवीत. अशी कोणी स्त्री दृष्टीस पडली ह्मणजे तो ह्मणे, हा फुलांनीं आच्छादिलेला पर्वताचा कडा आहे हें मी पक्कें समजून आहें, यावरून कडेलोट होण्यास उशीर लागणार नाहीं. याप्रमाणें तो कधीं फसला नाहीं. अंगीं तापटपणा नसावा असें नाहीं, पण तो जितका जास्त

असेल तितकें मन आवरून धरण्याचें सामर्थ्य अधिक पाहिजे. आपल्या हातून एकादी वाईट गोष्ट घडली तर ती कबूल करून तसें न करण्याविषयीं यत्न करील तरच मनुष्य दिवसेंदिवस अधिक सुधारत जाईल, तापट असतात ते कोणी आपला अपराध दाखविला असतां अधिक संतापून अधिक वाईट होतात; परंतु शहाणे असतात ते खरा अपराध घडल्यास तो कबूल करून पुनः तो न होऊं देण्याविषयीं यत्न करतात. अंगीं तापटपणा असून तो चांगल्या कामाकडे लावावयाचा निग्रह ज्यांच्यामध्यें असतो तेच पराक्रमी होतात.

ज्यास संसाराटवींतून सुखानें पार पडणें असेल त्यानें लहानसहान गोष्टींमध्यें देखील मन स्वाधीन ठेविलें पाहिजे. दुसऱ्यानें केलेला अपमान सोसून घेण्याचे व दुसऱ्यानें केलेल्या अपराधाची क्षमा करण्याचे प्रसंग संसारांत वारंवार येतात. अशा वेळेस मनाचा कल एकीकडे ठेवून योग्य व न्याय्य असेल तसेंच केलें पाहिजे. असें न करतां वारंवार तिरसटपणा व कुत्सितपणा केल्यास स्वभावच वाईट बनून जाईल.

दुष्कर्म न करण्याविषयीं मनुष्याच्या अंगीं मनोनिग्रह पाहिजे. तसाच दुर्भाषण न करण्याविषयीं निग्रह पाहिजे. वाग्बाण लोहबाणांपेक्षांही कठिण आहेत. नफातोटा नसतां केवळ बोलण्यावरूनच किती लोकांचा नाश झाला आहे ! शस्त्राची जखम भरून येते. पण मर्मभेद करणारें भाषण आमरण मनांतून जात नाहीं. जीभ स्वाधीन राहील तर जगांतील भांडणें व द्वेष पुष्कळ कमी होतील. ह्मणूनच भर्तृहरीनें मधुरवाणीला सुखाची माता असें ह्मटलें आहेः—

**कामान् दुग्धे विप्रकर्षत्यलक्ष्मीं**
**कीर्तिं सूते दुष्कृतिं या हिनस्ति ॥**
**तां चाप्येतां मातरं मंगलानां**
**धेनुं वीराः सूनृतां वाचमाहुः ॥**

मधुर वाणी हें लोकप्रिय होण्याचें मोठें साधन आहे. हें स-

वांस साधण्यासारखें नाहीं, तथापि मितभाषण हें सर्वांस करतां येईल. बोलण्यावरून मनुष्याचें आचरण व शहाणपण तेव्हांच कळतें. शहाणा मनुष्य कठोर किंवा दुसऱ्याचे हृदयास टोंचणारें भाषण कधीं करीत नाहीं; परंतु मूर्ख असतो तो उगाच लोकांच्या थट्टा करून द्वेष उत्पन्न करतो. जीभ स्वाधीन नसल्यामुळें पुष्कळांचा नाश झाला आहे. केवळ जीभ स्वाधीन नसल्यामुळें कित्येक अविचारी राजकीय पुरुषांनीं दोन राजांमध्यें वैमनस्यें उत्पन्न करून लढाया सुद्धां करविल्या आहेत. दुष्टांनीं सभेंत पांडवांची विटंबना केली तेव्हां कर्णास हसूं आलें, त्यामुळें संताप येऊन अर्जुनानें त्याचा वध करण्याची प्रतिज्ञा केली. मंडळीमध्यें एकादा असा असतो कीं, कोणाची तरी थट्टा करून लोकांस हंसविण्याची त्यास संवय असते. क्षणभर गंमत झाल्यामुळें लोक त्यास गमत्या ह्मणतात; त्यामुळें त्यासही पुनः पुनः असें करावेंसें वाटतें. असें होतां होतां त्यास अशी संवय लागते कीं, एकादे वेळेस एकादी गोष्ट बोलावयाची मनांत येऊन ती अप्रासंगिक असली तरी त्याच्यानें बोलल्याशिवाय राहवत नाहीं. बोलणाऱ्याच्या जिभेप्रमाणेंच लिहिणाराची लेखणीही स्वाधीन असली पाहिजे. बोलण्याप्रमाणें कित्येकांचे लेखही लोकांचें मन सहज दुखविणारे असतात. इंग्लंदांत आदिसन् व स्विफ्त् हे दोघेही समकालीन ग्रंथकार मोठे नामांकित होते. पण दोघांमध्यें दोन विलक्षण गुण होते. आदिसन् यासारखा मधुर लेख लिहिणारा दुसरा ग्रंथकार सांपडणें कठिण. त्याच्या लेखापासून कोणाचेंही मन दुखावणार नाहीं, असा त्यामध्यें गुण आहे. इंग्लंदांतील त्या वेळच्या कित्येक रीतिभातींच्या विरुद्ध त्यानें निबंध लिहिले आहेत; त्यांतील उपदेश गुरूच्या आज्ञेसारखा कठोर न वाटतां आईनें सांगितलेल्या समजुतीच्या गोष्टींसारखा गोड वाटतो. स्विफ्त् याच्या लेखणीचें सामर्थ्य असें असे कीं, तो ज्या गोष्टींचे दोष दाखवूं लागे त्याची पुरती टर उडविल्याशिवाय

राहत नसे. त्यानें एकाद्याविरुद्ध लिहिल्यास त्वेषानें तो लागलीच डोक्यांत राख घाली. लेखाच्या योगानें कोणत्याही गोष्टीचे दोष व्यक्त करणारा खिफ्त्साहेबासारखा ग्रंथकार होणें कठिण.

ज्यास बोलण्याचें तारतम्य नाहीं, त्याच्यानें मोठ्या अधिकाराचें काम चांगल्या रीतीनें कधीं होणार नाहीं. सखारामबापू, हरिपंततात्या, नाना फडणवीस, हे पेशव्यांच्या राज्यांत सर्वांत शाहणे ठरलेले तीन पुरुष असे होते कीं, वायफळ शब्द त्यांच्या तोंडांतून कधींही निघत नसे; त्यामुळें राज्यांत यजमानापेक्षां त्यांचें वजन जास्त राही.

त्या वेळेस रागानें अमुक शब्द बोललों नसतों तर बरें झालें असतें, असें वाटल्याचा पुष्कळांस अनुभव आहे. परंतु रागानें न बोलल्यामुळें कोणाचें नुकसान होत नाहीं. प्राचीन काळीं ग्रीस देशांत पिथागोरस नांवाचा मोठा तत्त्वज्ञानी होऊन गेला; त्याचें असें वाक्य आहे कीं, 'मुकेपणापेक्षां भाषणापासून कांहीं उपयोग होईल तर बोल.' चांगलें न बोलतां येईल तर वाईट बोलण्यांपेक्षां उगीच रहाणें चांगलें, असें भर्तृहरीनें सांगितलें आहेः—

**स्वायत्तमेकांतगुणं विधात्रा**
**विनिर्मितं छादनमज्ञतायाः ॥**
**विशेषतः सर्वविदां समाजे**
**विभूषणं मौनमपंडितानाम् ॥ १ ॥**

चांगलें बोलणें सर्वांच्या स्वाधीन नाहीं, पण उगाच बसणें स्वाधीन आहे; दुसऱ्यानें पीडा दिली तरी मर्मभेद करणारें भाषण करूं नये असा मनूनें निषेध केला आहेः—

---

१ विनिर्मिलें झांकण अज्ञतेचें । स्वाधीन हें पद्मभवें फुकाचें ॥
मूर्खांसि जें मौनचि फार साजे । सभेसि त्यांच्या बहु जाणते जे ॥१॥

वामन.

**नारुंतुदः स्यादार्तोऽपि न परद्रोहकर्मधीः ॥**
**यस्यास्योद्विजते वाचा नालोक्यां तामुदीरयेत् ॥ १ ॥**

यावरून हें स्पष्ट कळून येईल कीं, मर्मच्छेदक भाषण इहलोकीं वाईट इतकेंच नाहीं, तर तें परलोकसाधनासही प्रतिकूळ आहे.

कित्येक प्रसंग असे आहेत कीं, त्या वेळेस रागाचें भाषण केलेंच पाहिजे. कोणी लबाडी, दुराचार, क्रूरपणा केला तर त्यास रागानेंच बोललें पाहिजे. तेथें गोड बोलणें उपयोगीच नाहीं, जो खरा मनुष्य आहे, त्यास दुसऱ्याच्या लुच्चेगिरीचा राग आल्याशिवाय रहाणार नाहीं. तथापि एकादे वेळेस असें होतें कीं, खऱ्या मनुष्यास दुसऱ्याच्या लबाडीचा क्रोध येऊन तो क्रोधाच्या स्वाधीन होतो, त्यामुळें लोकांस लबाडाच्या वाईटपणापेक्षां त्याचाच वाईटपणा अधिक दिसूं लागतो. याकरतां आपला पक्ष खरा असला तरी मनुष्याच्या अंगीं शांति असल्याशिवाय तो खरा करून दाखवितां येणार नाहीं.

स्वभाव शांत होण्यास मनुष्याच्या अंगीं शहाणपण असून संसाराचा बराच अनुभव पाहिजे. अनेक प्रसंग आल्याशिवाय शांतपणा येत नाहीं. मनुष्यास जगाचा अनुभव जसजसा जास्त येऊं लागतो, तसतसा तो अधिक शहाणा होऊन मनोनिग्रहानें सद्वर्तनाकडे वळण्यास योग्य होतो. जे अशिक्षित असतात त्यांच्या अंगीं मुळींच क्षमा नसते; परंतु सुशिक्षित व अनुभवी असून क्षमाशील असतात ते बहुधा भांडाभांडीवर येत नाहींत. उदार मनाचे पुरुष असतात ते दुसऱ्याचा उणेपणा काढीत नाहींत. कित्येक वेळां कमीपणा दूर करणें मनुष्याच्या शक्तीबाहेर असतें, हें त्यांस ठाऊक असतें.

---

१ आपणास पीडा झाली तरी मर्मच्छेद करणारें भाषण करूं नये किंवा मनांत दुसऱ्याचा द्वेष करूं नये,—ज्या भाषणाच्या योगानें दुसऱ्याचें मन दुःखित होतें तें बोलूं नये, त्याच्या योगानें परलोकाची हानि होते.

आपला संसार चांगला किंवा वाईट असणें हें बहुतांशीं मनुष्याच्या स्वाधीन आहे. ज्याचें मन उल्हासी व शांत आहे, त्याचे घरीं नेहमीं उल्हास व शांति हीं वास करतात. ज्याचें मन उदास त्याच्या भोंवतालीं सर्व दगदगच असते. घरच्या मालकाच्या स्वभावाची छाया इतर माणसांच्या स्वभावावर पडते. जर तोच दिवसभर लोकांशीं घासाघीस करूं लागला तर सर्वांस तीच संवय लागते. तो जर तापट व तिरसट असला तर जवळचे लोक तसेच होतात.

जगांत आपणास लोकांनीं मानावें, आपली प्रतिष्ठा व्हावी, लोकांनीं आपणाशीं सौजन्यानें वागावें, असें ज्यास वाटत असेल त्यानें प्रथमतः आपण लोकांचा मान ठेवून त्यांशीं गोडीनें वागलें पाहिजे. मूर्ति तितक्या प्रकृति अशी ह्मण आहे. आपणास जी एकादी गोष्ट आवडते तीच लोकांस आवडत नाहीं ह्मणून त्यांनीं आपणास नांवें ठेवूं नये असें वाटतें, त्याप्रमाणेंच त्यांच्या आवडीच्या गोष्टी आपणास पसंत नसल्या तरी त्यांबद्दल त्यांस दोष देणें रास्त नाहीं. आपले दोष दुसऱ्यांस कळतात तसे आपणास कळत नाहींत. दोषापासून मुक्त असा मनुष्य सांपडणें कठिण. आपणास कोणीं नांवें ठेविलीं तर कित्येकांस फार राग येतो. त्यामुळें त्यांस लोकांचे दोष काढण्याची संवय लागते. असें झालें ह्मणजे ते आपल्या आचरणानेंच आपणास अनेक शत्रु उत्पन्न करतात.

आत्मसंयमनाची संवय व्यक्तीच्या सुखवृद्धीस मात्र कारण आहे असें नाहीं. देशाच्या भरभराटीस देखील ही संवय अत्यावश्यक आहे. लोकांच्या अंगीं मनोनिग्रह नसल्यामुळें दुष्ट व्यसनें लागून देशांचे देश धुळीस मिळाले आहेत. अफूचें व्यसन लागल्यामुळें चिनी लोकांचें फार नुकसान झालें. आपल्या भरतखंडांत इंग्लिशांचें सार्वभौमत्व होऊन कित्येक सुगुण आले त्या सुगुणांबरोबर जे दुर्गुण आले आहेत त्या सर्वांचा राजा मद्यपानप्रसार हा होय. आमच्या पूर्वजांनीं मद्यपानास पंचमहापातकांत गणिलें

होतें; परंतु आलीकडे कित्येकांस तो दोष वाटत नाहीं इतकेंच नव्हे तर तो गुणच वाटतो. मद्यपान करणें हें जुनीं भलभलतीं मतें टाकिल्याचें चिह्नच आहे असें समजतात. हजारों वर्षांपासून ज्या देशांत मद्यपान हें महापाप असें लोक समजत होते, तेथें दहा वीस वर्षांत इतकी बदल झाली कीं, ज्यांच्या योगानें हें व्यसन पसरलें त्यांपैकींच केनसाहेबासारखे गृहस्थ येऊन लोकांस मद्यपाननिषेधक व्याख्यानें देऊं लागले ! कालगति किती विचित्र आहे ? या मद्यपानाच्या योगानें पुष्कळ श्रीमान् लोक भिकेस लागले. पुढें देशास जे अलंकारभूत झाले असते असे अनेक तरुण विद्वान् या सुरेच्या नादीं लागून अतिश्रमानें संपादिलेल्या विद्येचें फळ न भोगितां मृत्यूच्या तडाक्यांत सांपडून मातीस मिळाले. याकरितांच मोरोपंतांनीं ह्मटलें आहेः—

**न करील कां पित्याची दुर्गतिची माउली सुरा माती ॥**

सरकारानें एकादा कर जुलुमानें बसविला तर लागलाच मोठा गोंगाट होतो, अनेक अर्ज होतात, परंतु हा सुरेचा जुलूम नाहींसा करण्यास कोणी ह्मणत नाहीं. हा जुलूम फौज पाठवून किंवा जुलुमाचे कायदे करून झालेला नाहीं. त्यापासून सुटण्याची लोकांची इच्छा नाहीं, हेंच तो चालण्याचें कारण होय. सुरेचा जुलूम नाहींसा करण्यास आत्मसंयमनाशिवाय दुसरें साधन नाहीं. मुंबईहून एक गृहस्थ एकवार माहिमास गेला होता; त्यास त्याच्या मित्रांनीं बागाईत पाहावयास नेलें, तेव्हां तेथील बागाईत जमिनीचा उत्तम सुपीकपणा व त्याच्या मालकांचें दारिद्र्य पाहून गृहस्थास आश्चर्य वाटलें. त्यानें वाडीवाल्यास विचारलें, तुमच्या जमिनी इतक्या उत्तम असून तुह्मी दरिद्री कां ? वाडीवाला ह्मणाला, सावकारांनीं आमच्या सर्व जमिनी गाहाण घेऊन आह्मांस बुडविलें. जवळच एक ह्मातारा वाडवळ होता तो ह्मणाला, महाराज, सावकार आह्मांस बोलावण्यास येत नाहींत. आमच्या लोकांनीं दारूचें व्यसन सोडलें तर एका वर्षांत कर्ज

फिटून जमिनी मोकळ्या होतील ! शोध करतां असें कळलें कीं, एका माहीम तालुक्यांत सुमारें दोन लाखांची दारू खपते. सभा केल्या, मद्यपाननिषेधक वचनें ह्मणून व्याख्यानें दिलीं, पुष्कळ विद्याभ्यास केला, तरी मनोनिग्रहाशिवाय मद्यप्राशनाचा प्रसार कमी होणार नाहीं. स्वेच्छेनें जो इंद्रियें विषयाच्या स्वाधीन करतो, त्यास सद्वर्तन लागण्यास मार्ग नाहीं. व्यक्ति किंवा समाज एकवार विषयसुखाच्या स्वाधीन झाला ह्मणजे त्याची स्वतंत्रता, सुख, बल, शौर्य, धैर्य हीं नष्ट झाल्याशिवाय राहणार नाहींत. दुर्व्यसनाचा एकवार प्रसार झाला ह्मणजे ती गोष्ट लोकांच्या प्रचारांत पडून तिचा वाईटपणा देखील लोकांच्या मनांतून जातो. हल्लीं जसें मद्यपान साहजिक झालें तशी पूर्वींपासून इषकबाजी झाली आहे असें वाटतें. एक्वार शूद्रस्पर्श झालेलें उदक पिणारासुद्धां ज्या जातींत पंक्तिबाह्य होतो त्या जातींत अनेक वर्षें शूद्री किंबहुना यवनी यांशीं रत होणारा जातिबाह्य होत नाहीं, हें आश्चर्य आहे ! !

मनुष्यास दुर्व्यसन लागलें असतां मनोनिग्रहानें तें सोडून दिलें तरच स्वहित होईल; त्याप्रमाणेंच देशाचें आहे. कांहीं वेळ देशांतील लोकांनीं मोठा निग्रह केल्याशिवाय मोठालीं कामें होत नाहींत. शंभर वर्षांपूर्वीं अमेरिकेंत इंग्लिशांचें राज्य होतें, त्यांनीं तेथें छापील कागद सुरू केले, त्यामुळें लोकांचें फार नुकसान होऊं लागलें. तेव्हां त्यांनीं सर्व व्यवहार पतीवर चालवून छापील कागद मुळींच न घेण्याचा यत्न केला, त्यामुळें त्यांचा मोठा फायदा झाला. तसेंच तेथील लोकांस चिनी चहाचा मोठा नाद लागल्यामुळें लाखों रुपयांचा चहा खपूं लागला; तेव्हां चहावर जबरदस्त कर बसून लोकांचा तोटा होऊं लागला. तेव्हां सर्वांनीं एकमत करून कांहीं दिवस चहा घेण्याचें सोडून दिलें; त्यामुळें मोठा फायदा झाला. सांप्रत आपल्या देशाचें नुकसान अनेक

प्रकारांनीं होत आहे, त्यांपैकीं कित्येक प्रकार निग्रहानें दूर करता येतील, पण आह्मांमध्यें त्याचा गंध देखील नाहीं.

आत्मसंयमनाचे प्रसंग प्रत्येकास वेगळाले आहेत. पण मन स्वाधीन ठेवून संसारांत आपल्या योग्यतेप्रमाणें वागण्याचा प्रसंग सर्वांस आहे. भलत्याच गोष्टींत मनुष्य लोकांस भितात, त्यामुळें पुष्कळ अडचणी सोसाव्या लागतात. दुसरा करील तसें आपण करावें, असे लोक पुष्कळ आहेत. त्यामुळें वस्त्रपात्र इत्यादिकांकरितां सामर्थ्यापेक्षां अधिक खर्च करून लोक पुष्कळ दुःखें भोगतात. जो तो आपल्यापेक्षां मोठ्याकडे पाहतो. त्यामुळें भिकारी, श्रीमंत, सर्वच दुःखी असतात. कित्येक तर अंगीं निग्रह नसल्यामुळें कोरड्या डौलाकरतां कर्ज काढून, असतात त्यापेक्षां भिकारी होतात. कित्येक सोकाजी असे आहेत कीं, त्यांस लग्नकार्यांत कमी खर्च करण्यास, साधा धोतरजोडा नेसण्यास, किंवा कमी किंमतीचें लुगडें घेण्यास लाज वाटते; पण सावकाराच्या तगाद्यांची लाज वाटत नाहीं !

खरा मनुष्य आहे त्यास लोक आपणास योग्यतेपेक्षां अधिक श्रीमंत मानूं लागले तर बरें वाटणार नाहीं. तो फुका डौल सांगून आपली शेखी मिरविणार नाहीं. त्यास लोकांनीं गरीब ह्मटलेलें पतकरेल, पण कर्ज काढून खर्च करणें पतकरणार नाहीं. खोटें बोलणारा मनुष्य खरी हकीकत एका प्रकारची असून आपल्या बोलण्यानें वेगळ्या प्रकारची भासवितो ह्मणून त्यास लुच्चा ह्मणतात. तसाच भिकारी असून श्रीमंती दाखविणारा हा लुच्चा होय. ही कित्येकांस अत्युक्ति वाटेल, पण वस्तुतः असत्य भाषणापेक्षांही ही गोष्ट अधिक वाईट आहे. कारण खोटें बोलणाराची लबाडी बोलण्यांत असते, पण डौली मनुष्याची लबाडी कृतींत असते. पैसा पुष्कळ मिळाल्यानें मनुष्य श्रीमंत होतो असें नाहीं, राजास देखील कर्ज असतें. जो आपल्या उत्पन्नाच्या आटोक्यांत खर्च ठेवतो तोच खरा श्रीमंत होय. ऐश्व-

र्यांची इच्छा धरणें वाईट नाहीं, पण ती प्रामाणिकपणानें उद्योग करून तृप्त करून घ्यावी; कर्ज काढून लोकांस बुडवून श्रीमंती भोगणें यासारखा भिकारपणा कोणताच नाहीं. कित्येक असे वस्ताद आहेत कीं, कितीही कर्ज झालें तरी लोक कर्ज देत आहेत तोंपर्यंत ते आपणास गरीब समजत नाहींत. पाहिजे तो व्याजाचा दर लिहून देऊन मारवाड्यापासून जिन्नस आणून ते चैन करण्यास सोडीत नाहींत. कर्ज हें मोठें नरकाचें साधन आहे, असें पूर्वींपासून आमचे लोक समजत असत.

**न विषं विषमित्याहुर्ऋणं हि विषमुच्यते ॥**
**एकाकिनं हन्ति विषमृणं पुत्रप्रपौत्रकान् ॥ १ ॥**

**अर्थः**—विष हें विष नव्हे, कर्ज हें विष होय; विष एकट्याचाच नाश करतें, पण कर्ज नातू, पणतू यांचा देखील नाश करतें.

पूर्वीं सावकार परागंदा होऊन शेंपन्नास वर्षें झालीं तरी देशांतरीं त्याच्या वंशाचा शोध लावून नातू पणतू देखील आजाचें व पणजाचें कर्ज फेडीत. आत्मकार्यार्थ घेतलेला दुसऱ्याचा पैसा परत न देणारा असा मनुष्य क्वचित् असे. यामुळेंच देण्याघेण्याचा व्यवहार विश्वासावर किंवा मारुतीची साक्ष घातलेल्या खतावर चाले. परंतु हल्लींची स्थिति फारच शोचनीय झाली आहे. मद्यपानादि जे दोष हल्लीं आमच्यांत नवीन आले आहेत त्यांपैकींच हा एक होय. दुष्काळांत प्राण जाण्याची वेळ आली असतां ऋण देऊन प्राण वांचविणाऱ्या सावकारास सुद्धां उलटजबाब सांगणारे निर्लज्ज लोक झाले आहेत. ते अनेक युक्ति करून दस्तैवज मुदतीच्या बाहेर घालविण्यास सांपडला तर उजळ ठकपणानें "तुमच्यानें काय होईल तें करून घ्या" असें सावकारास निःशंकपणें सांगतात.

या मुदतीच्या कायद्यामुळें शहाणे म्हणविणाऱ्या कित्येक लोकांच्या समजुती बदलल्या आहेत. एके ठिकाणीं मंडळी बसली असतां अशी गोष्ट निघाली कीं रिणकोला द्रव्य मिळेल तर त्यानें

कायद्यानें मुदतीच्या बाहेर गेलेलेंही कर्ज सावकारास द्यावें हें योग्य होय. त्यावर एक वकीलसाहेब ह्मणाले, राजा देखील मुदतीबाहेर गेलेलें कर्ज न देणें यासच न्याय ह्मणतो तर तें न देण्यांत कांहीं वाईट आहे असें नाहीं.

कर्ज फेडण्याच्या संबंधानें स्कातलंद देशांतील सर वाल्टर स्कात् याची गोष्ट येथें सांगण्यासारखी आहे. या विद्वान् व सदाचरणी ग्रंथकाराचें नांव या पुस्तकांत पुष्कळ वेळ आलेंच आहे. हा मोठा प्रामाणिक होता. एके वेळीं हा ज्या व्यापाऱ्याच्या पेढीचा भागीदार होता तिचें दिवाळें वाजण्याचा प्रसंग आला. यांत ह्याचा दोष कांहींच नव्हता, तरी त्यानें पेढीची अब्रू जाऊं दिली नाहीं. त्याचे मित्र पुष्कळ होते ते आपण आंकडा घालण्यास तयार होऊन वर्गणीनें पैसा जमवून सावकारांची समजूत करण्याची सूचना करूं लागले, तेव्हां स्कात् योग्य अभिमानानें ह्मणाला "नाहीं, हा उजवा हात तें सर्व काम करून टाकील."

या संबंधानें त्यानें आपल्या मित्रास लिहिलें "दुसरें सर्व गेलें तर आह्मी आपल्या नांवाला तरी कलंक लावूं देणार नाहीं." असें ह्मणून मरेपर्यंत सतत एकसारखे ग्रंथ लिहिण्याचे श्रम करून त्यानें हजारों रुपये कर्ज फेडिलें. त्यानें एकवार असें लिहिलें कीं "सावकारांनीं आपले आभार मानिले. प्रतिष्ठित आणि प्रामाणिक गृहस्थास योग्य असें कर्तव्य आपण केलें ही सुखकारक गोष्ट मनांत येऊन जशी मला आतां स्वस्थ झोंप येते तशी आली नसती. मला बिकट व अंधकारयुक्त असा मार्ग क्रमणें आहे, परंतु तो मला निष्कलंक कीर्तीप्रत पाववील. कदाचित् मी या कृत्यांत मरूनही जाईन. असें झालें तर चांगलें नांव मिळवून मरेन. जर माझें कार्य सिद्धीस गेलें तर ज्यांच्याशीं संबंध आहे ते माझे आभार मानतील आणि माझें मन समाधान पावेल." सतत ग्रंथ लिहिण्याच्या श्रमानें स्कात् याची प्रकृति बिघडत चालली तेव्हां वैद्यानें विश्रांति घ्यावयास सांगितलें तेव्हां स्कात् ह्मणाला, 'आळशी

झालों तर मला वेड लागेल.' मरणाच्या पूर्वीं थोडे दिवस स्कात् ह्मणाला, "माझ्या वेळच्या ग्रंथकारांपेक्षां मीं पुष्कळ लिहिलें आहे, परंतु मीं कोणाच्या मनास दुखविलें नाहीं, किंवा कोणास कुमार्गास लाविलें नाहीं, याच्या योगानें मला समाधान वाटतें. हा मजकूर काढून टाकावा असें मरणसमयीं मला वाटेल असें मीं कांहींएक लिहिलें नाहीं." मरणसमयीं त्याचा जांवई जवळ होता, त्यास तो ह्मणाला 'लाकहार्त, तुझ्याशीं बोलण्यास मला आतां क्षणभरच अवकाश आहे. तूं सद्गुणी, धार्मिक आणि सज्जन हो. त्याशिवाय कोणत्याही गोष्टीपासून तुला अंतकाळीं समाधान प्राप्त होणार नाहीं.'

लाकहार्त हाही सासऱ्याप्रमाणेंच नीतिमान् होता. त्यानें पुष्कळ वर्षें श्रम करून स्कात् याचें सुंदर चरित्र लिहिलें. त्यापासून त्याला पुष्कळ पैसाही मिळाला; परंतु तो त्यानें घेतला नाहीं. स्कात् याच्या कर्जाशीं त्याचा कोणत्याही प्रकारें संबंध नसतां, त्याच्याविषयीं जी त्याची पूज्यबुद्धि होती तिच्या योगानें त्यानें तो सर्व पैसा स्कात् याच्या सावकारांस दिला ! असे पुरुष कोणत्याही देशांत झाले तरी ते जगाचे अलंकारच होत.

कर्ज फेडण्याची भीति कमी झाल्यामुळें कर्ज काढण्याचेंही कोणास पूर्वींप्रमाणें विशेष भय वाटत नाहीं. या स्थितीमुळें न्यायाधीशाकडे वर्षास कर्जाच्या हजारों फिर्यादी होऊन छापील कागद, वकिलाचें बक्षीस, अशा गोष्टींनीं हजारों रुपये खर्च होऊन दारिद्र्य वाढत चाललें आहे; याकरतां पूर्वींप्रमाणें ऋणाची भीति व तें फेडण्याची सचोटी या गोष्टी लोकांनीं वाढविल्यास देशाचें कल्याण होईल.

कर्जाच्या योगानें कित्येक श्रीमंतांचीं व जहागिरदारांचीं घराणीं जमीनदोस्त झालीं. मन स्वाधीन ठेवून आपल्या योग्यतेप्रमाणें जो राहील त्याचाच संसार पुष्कळ दिवस व्यवस्थित चालेल.

# भाग ७.

## कर्तव्यकर्म.

**अकृत्यं नैव कर्तव्यं प्राणत्यागेऽपि संस्थिते ॥**
**न च कृत्यं परित्याज्यं धर्म एष सनातनः ॥ १ ॥ मनुः.**

जगांतील प्रत्येक मनुष्यास कर्तव्यकर्म आहेच. उच्च नीच कोणत्याही स्थितींत मनुष्य असला तरी त्यास अवश्य केलें पाहिजे असें कांहीं तरी कृत्य असणारच. तें त्यानें केलेंच पाहिजे. तें त्याकडून झालें नाहीं तर त्याच्या अंगीं सद्वर्तन रहाणार नाहीं. उद्योग, प्रयत्न, दृढनिश्चय यांशिवाय कर्तव्यकर्म करतां येणार नाहीं.

आयुष्याच्या अमुकच भागांत मनुष्यास कर्तव्यकर्म करावयाचें असतें असें नाहीं; जन्मभर तें त्याच्या पाठीमागें लागलेंच आहे. लहानपणीं आईबापांच्या आज्ञेंत वागण्यापासून कर्तव्यकर्मास आरंभ होतो. पुढें स्त्रीपुरुष, पितापुत्र, गुरुशिष्य, स्वामिसेवक इत्यादि संबंध मनुष्यास प्राप्त होऊन त्याप्रमाणें आपलें कर्तव्य करावें लागतें. हे सर्व घरांतील संबंध झाले. यांशिवाय पुरुषांस स्त्रियांशीं, स्त्रियांस पुरुषांशीं, घरंदाजांस शेजाऱ्यांशीं, राजास प्रजेशीं, व प्रजेस राजांशीं, अधिकाऱ्यांस हाताखालच्या लोकांशीं व हाताखालच्यांस अधिकाऱ्यांशीं वागण्याचे अनेक प्रसंग जगांत आहेत. त्या सर्व प्रसंगीं योग्य रीतीनें वागलें तरच मनुष्याचें सद्वर्तन कायम राहील.

परमेश्वरास भिऊन सदाचरणानें वागून परलोकास पात्र होणें हें मनुष्याचें सर्वांत मुख्य कर्तव्य होय. परमेश्वरानें आपणास जन्मास घालून मनुष्यदेह दिला आहे, तो केवळ खाण्यापिण्याची मजा मारण्याकरतां नव्हे, तर आपणास जीं साधनें प्राप्त झालीं आहेत त्यांच्या योगानें आपल्या जन्माचें सार्थक्य करण्याकरितां होय. असें न केल्यास आपण मोठे दोषी होऊं.

कर्तव्यकर्माकडे लक्ष ठेवून दृढनिश्चयानें तें करणें हेंच सद्वर्तनाचें खरें स्वरूप होय. असें करणें हीच मनुष्याची उत्तम स्थिति होय. असें न केलें तर मनुष्याचा केव्हां नाश होईल याचा नेम नाहीं. कर्तव्यकर्म करण्याचा दृढनिश्चय अंगीं असेल तर कशींही संकटें आलीं तरी मनुष्य भिणार नाहीं.

कर्तव्यकर्माकडे ज्याचें लक्ष आहे त्याच्या हातून कधींही अन्याय घडणार नाहीं. अन्याय न करणें हा मनुष्याचा चांगुलपणा होय. अमुक स्थितींत किंवा अमुक कामांत कर्तव्यकर्माकडे लक्ष पाहिजे असें नाहीं. तें सर्व स्थितींत सर्व कामांत सर्वकाळ असलें पाहिजे. कर्तव्यकर्माकडे लक्ष ठेवून सदसद्विचारानें वागलें असतां मनुष्याच्या हातून दुर्वर्तन होणार नाहीं. अंगीं मोठी विद्वत्ता किंवा बुद्धिमत्ता व अधिकार असून कर्तव्यकर्माकडे लक्ष व सदसद्विचार या दोन गोष्टी नसतील तर त्यापासून हित न होतां उलटा तोटा होण्याचा संभव आहे. सदसद्विचाराच्या योगानें चांगलें वाईट कृत्य कळून कर्तव्य करण्याच्या निश्चयानें तें करण्यास धैर्य येतें. सदसद्विचार हा मनाचा शास्ता आहे. तोच सत्कर्म, सुविचार, सद्भाव, सदाचरण, यांकडे मनुष्याची प्रवृत्ति करतो. त्याशिवाय सद्वर्तनाचा मार्ग सांपडणार नाहीं.

सदसद्विचाराच्या योगानें मनुष्यास चांगलें वाईट कळलें तरी सत्कर्माकडेच लक्ष ठेवणें हें मनुष्याच्या इच्छेवर आहे. सत्कर्मच करावयाचें अशी इच्छा असल्याशिवाय तें आपोआप घडावयाचें नाहीं. अशी इच्छा दृढ नसल्यामुळें विद्वानांच्या हातून दुष्कृत्यें घडलीं आणि तीं असल्यामुळें यःकश्चित् हलक्या कुळांत उत्पन्न झालेले मनुष्य उदयास येऊन महत्व पावले. कर्तव्यकर्माकडे लक्ष ठेवून केलेल्या कृत्यांत यश न आलें तरी अंतःकरणांत समाधान असतें. आपल्या स्वाधीन होतें तितकें आपण केलें असें मनांत येऊन मनाची तळमळ होत नाहीं.

ज्या थोर मनुष्यांचें कर्तव्यकर्माकडे लक्ष असतें, ते ऐश्वर्यादि-

कांची किंबहुना आपल्या जिवाची देखील पर्वा करीत नाहींत. रामशास्त्रीबावांनीं राघोबादादास देहांत प्रायश्चित्त सांगितलें तेव्हां माझा राजाश्रय जाईल, मला दारिद्य येईल, वगैरे गोष्टी मनांत आणिल्या नाहींत. रावसाहेब मंडलिक कायदे करणाऱ्यांच्या मंडळीचे सभासद असत, तेव्हां राजपुरुषांस आवडेल न आवडेल याचा विचार न करतां आपला योग्य अभिप्राय असे तो निःशंकपणें सांगत. अधिकाराच्या जोरावर राजपुरुषांनीं त्या वेळेस त्यांचें ऐकिलें नाहीं तरी मागून त्यांच्या अभिप्रायाप्रमाणें त्यांस करावें लागे असा रावसाहेबांचा अभिप्राय विचारपूर्वक सर्वदा दिलेला असे. प्रजेच्या हिताकडे लक्ष न देतां राजपुरुषांची मर्जी संपादणारे कित्येक सभासद अधिकाऱ्यांच्या मताप्रमाणें अभिप्राय देतात तसें त्यांनीं कधीं केलें नाहीं. संसार हें एक प्रकारचें युद्ध आहे, त्यांत जयपराजय नेहमीं आहेतच. पराजयाची वेळ आली तरी न भितां रणांगणीं जे पडतात ते शत्रूचा पराभव करून जय मिळविणाऱ्यांपेक्षां कमी शूर असतात असें नाहीं. याकरितां संसारांत कोणत्याही कृत्यांत जय किंवा पराजय झाला तरी धैर्यानें आपलें कर्तव्य करील तोच शूर होय. ईश्वरानें आपणास जें थोडेंबहुत आंगबळ किंवा बुद्धिबळ दिलें आहे त्याचा मुळींच उपयोग न करणें किंवा अपव्यय करणें हें पाप होय.

बुद्धीचें चांचल्य व मनाचा अनिश्चय यांच्या योगानें कर्तव्यकर्म करण्यास मोठा अडथळा येतो. एकीकडे अमुक गोष्ट चांगली ती करावी आणि अमुक गोष्ट वाईट ती करूं नये असें मनास कळत असतें, पण आळस, स्वहित, उपभोगेच्छा, कामक्रोधादि षड्रिपु, यांच्या योगानें अनेक चांगल्या कृत्यांकडे प्रवृत्ति न होतां मनुष्य तसाच लोंबत रहातो. कांहीं वेळानें तरी निश्चय झाला तर बरा, नाहीं तर एकवार आळसादिकांचा पुरा अंमल बसला कीं त्या मनुष्याच्या हातून नांव घेण्यासारखें कांहींच होणार नाहीं. याकरितां सद्वर्तन अंगीं बिंबावें अशी ज्यास इच्छा

असेल त्यानें कामक्रोधादि रिपूंचा पराजय करून सत्कर्माविषयीं उद्युक्त असण्याची संवय लाविली पाहिजे. सत्कर्माची संवय, दुष्कर्माचा त्याग, इंद्रियांचा जय, स्वाभाविक स्वहितप्रवृत्तीचा निग्रह, या गोष्टी प्राप्त करून घेण्यास जरी पुष्कळ श्रम केले पाहिजेत तरी कर्तव्यकर्माकडे लक्ष ठेवून त्यांची संवय लागल्यावर त्या सोप्या वाटूं लागतात. ज्यानें मनोनिग्रहाच्या योगानें आपणास सद्गुणांची संवय लाविली आहे तोच खरा शूर होय. मनास अनावर सोडून जो इंद्रियांच्या स्वाधीन झाला आहे, त्यासारखा पापी कोणी नाहीं.

मनाचा दृढनिश्चय कायम ठेवणें हें मनुष्याच्या इच्छेवर आहे. हें त्यास दुसऱ्यांच्या मदतीनें प्राप्त व्हावयाचें नाहीं. सत्याचा स्वीकार व असत्याचा तिरस्कार, परोपकाराची आवड व परदुःखाची नावड, हे गुण ज्याचे त्यानें यत्नानें वाढविले पाहिजेत. निष्पाप व संतुष्ट असणें किंवा पापी व कष्टी असणें हें मनुष्याच्या स्वाधीन आहे. याकरितांच व्यासांनीं **'आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः'**[1] असें ह्मटलें आहे. अमुक स्थितींत आपण रहावें हें मनुष्याच्या स्वाधीन नाहीं, पण जी स्थिति प्राप्त होईल तिच्या मानानें चांगलें वागणें हें त्याच्या स्वाधीन आहे. तसेंच अमुक स्थितींत सुख आहे व अमुक स्थितींत दुःख आहे असेंही ह्मणतां येत नाहीं. ऐश्वर्य सर्वांस आवडतें, पण मोठमोठे गर्भश्रीमंत व राजे देखील ऐश्वर्यसंपन्न असून सुखी नसल्याचीं व गरीब लोक आमच्यापेक्षां किती सुखी आहेत! असे त्यांनीं वारंवार उद्गार काढल्याचीं उदाहरणें पुष्कळ आहेत. तसेंच अगदीं गरिबींत असून प्राप्त झालेल्या स्थितींत संतोषानें राहून काळ घालविणारेही पुष्कळ आहेत.

मनुष्य केवढाही बलाढ्य असला तरी कर्तव्यकर्म करण्याकडे त्याचें लक्ष असलें तरच त्याच्या हातून महत्कृत्यें होतील. शिवा-

१ खरोखरच आपला बंधु आपणच आणि आपला मित्र आपणच.

जीवर अनेक महासंकटें गुदरलीं, तरी त्यास जें एकदां वाटलें होतें कीं, यवनांचा पराभव करून गोब्राह्मणांचा प्रतिपाळ करणें हें आपलें कर्तव्य आहे, तें करण्याकरितां त्यानें कोणत्याही संकटास जुमानिलें नाहीं.

अमेरिकेंतील लोकसत्ताक राज्याच्या स्थापकांपैकीं मुख्य जो वाशिंगतन त्याचें चित्त सर्वकाळ आपलें कर्तव्य करण्याकडे असे. यामुळेंच त्यास धैर्य व उत्साह येऊन त्याचें सद्वर्तन कधींही सुटलें नाहीं. लोकांत आपली प्रतिष्ठा व्हावी, आपणास कीर्ति, संपत्ति किंवा अधिकार प्राप्त व्हावा ह्मणून त्याचा प्रयत्न नसे, परंतु केवढेंही संकट आलें तरी योग्य गोष्ट कोणती व ती करण्याचा योग्य मार्ग कोणता याचा विचार करून तो नेहमीं त्याप्रमाणें वागे. तो मोठा नम्र असे. एके समयीं सैन्यावरील मोठ्या अधिकाराची जागा त्यास सरकारानें दिली. ती त्याच्या मनांत स्वीकारावयाची नव्हती, पण सर्वांच्या आग्रहामुळें स्वीकारावी लागली. देशाचें कल्याण किंवा अकल्याण होणें ज्या अधिकाऱ्याच्या कर्तृत्वावर आहे असा अधिकार आपणास दिला याबद्दल आभार मानीत असतां तो ह्मणाला, "मी विनंतिपूर्वक सर्वांस एवढें ध्यानांत ठेवण्यास सांगतों कीं, दुर्दैवानें जर एकादी गोष्ट माझ्या कीर्तीला प्रतिकूळ अशी घडली, तर मी आजच सांगून ठेवितों कीं, जो अधिकार मला सन्मानपूर्वक दिला आहे त्यास मी योग्य आहें असें खरोखरच मला वाटत नाहीं." पुढें लोकसत्ताक राज्याचा अध्यक्ष झाल्यावरही लोकप्रियतेकडे लक्ष न देतां त्याला योग्य वाटे तेंच तो करी. राज्यव्यवस्थेच्या संबंधानें एका कामाच्या वेळेस त्याचें वजन कमी होण्याचा व अधिकार जाण्याचा देखील प्रसंग आला होता तरी न्याय्य गोष्ट होती ती करण्यास तो कचरला नाहीं. त्यानें केलेला ठराव अमलांत न आणण्याविषयीं कोणीं पत्रें लिहिलीं त्यांस त्यानें असें उत्तर लिहिलें कीं, पुष्कळ कृत्यांत स्वदेशबंधूंनीं माझें करणें मान्य केलें त्याबद्दल मी त्यांचे

मोठे उपकार मानतों. तथापि ही मान्यता सदसद्विचारशक्तीस योग्य वाटते तेंच करून मला मिळविली पाहिजे.

कर्तव्यकर्माकडे लक्ष असणें जसें प्रत्येक मनुष्याच्या हितास कारण आहे तसेंच देशहितासही कारण आहे. ज्या देशांत आपलें कर्तव्य करणारे पुरुष पुष्कळ असतात त्याच देशाची भरभराट होते. त्याचें वर्चस्व कायम रहातें. नुसते स्वदेशाभिमानावर निबंध लिहून किंवा व्याख्यानें देऊन लोक आपापल्या सामर्थ्याप्रमाणें देशहिताच्या संबंधानें आपलें कर्तव्य करणार नाहींत तर त्यापासून कांहीं उपयोग नाहीं. मनापासून देशहिताकरितां झटणारे पुरुष देशांत असल्यामुळेंच प्राचीनकाळीं एवढ्या थोरल्या अवाढव्य इराणी सैन्याचें ग्रीक लोकांनीं कांहीं चालूं दिलें नाहीं. हानिबल यानें रोमन लोकांस बहुत वर्षें जर्जर केलें, परंतु शेवटीं त्या देशाभिमानी लोकांनीं त्याचा पराजय केला. ग्रीस देशाच्या इतिहासांत फोशिअन नांवाचा मनुष्य प्रसिद्ध आहे. कर्तव्यकर्माकडे लक्ष देण्याविषयीं त्याचें उदाहरण घेण्यासारखें आहे. याच्या वेळेस ग्रीस देशास पडती कळाच आली होती. शिकंदरबादशहाचें ग्रीकलोकांशीं युद्ध चाललें असतां फोशिअन हा त्यांचा सेनापति होता. त्याचा पराक्रम पाहून शिकंदरास आश्चर्य वाटलें, तेव्हां त्यानें त्यास निरोप पाठविला कीं, 'जर तुह्मी आमच्या पक्षास मिळाल तर तुह्मांस अमुक प्रांताचें राज्य देईन.' एवढी थोरली लालूच पुढें असतांही फोशिअन आपल्या कर्तव्यास विसरला नाहीं. त्यानें असा खणखणीत निरोप पाठविला कीं, 'शिकंदराची मजवर मेहरबानी झाली असेल तर त्यास सांगा कीं, आपलें राज्य आपल्याजवळ ठेवा, माझी अब्रू एवढी मजजवळ राहूंद्या ह्मणजे झालें!'

शाहूराजाच्या वेळेस कित्येक मराठ्यांच्या सरदारांस निजामउल्मुल्क वगैरे मुसलमानांनीं फितविण्याचा यत्न केला, त्यांपैकीं एकदोन निमकहराम सरदार फितूरही झाले. पण बाजीरावासारखे

फितव्य

जे खरे देशाभिमानी होते त्यांचा निश्चय होता कीं, आपणास जर महत्त्व प्राप्त होणें असेल तर तें आपलें कर्तव्य स्मरून यजमानाची चाकरी करूनच मिळेल. पुढें राज्यनाशक बाजीरावाच्या वेळेस स्वतः यजमानांनीं भिऊन पोबारा केला तरी बापू गोखला हा शूर सरदार आपल्या कर्तव्यास विसरला नाहीं. त्यास वाटलें कीं, आपण ब्राह्मण असून शिपाईबाणा पत्करला आहे, तर आपल्या धंद्यास बट्टा येण्यासारखी गोष्ट जीव गेला तरी आपल्या हातून होऊं देऊं नये, रणांगणीं मरणें हेंच आपलें कर्तव्य आहे.

इंग्लंदाच्या इतिहासांतील प्रसिद्ध शूर ड्यूक आफ् वेलिंगतन यानें एके ठिकाणीं ह्मटलें आहे कीं, 'सरळ मार्गानें चालून सर्वांनीं आपापलें कर्तव्य केलें पाहिजे. असें न केलें तर जगण्यांत कांहीं अर्थ आहे असें नाहीं.' वेलिंगतन याचें सर्व कामांत आपल्या कर्तव्याकडे लक्ष असे. वाटर्लु येथील समरांगणांत लढत असतां तो आपल्या सैनिकांस ह्मणाला, 'गड्यांनो, धैर्यानें उभे रहा. इंग्लंदांत लोक आपणास काय ह्मणतील याचा विचार करा.' यावर सैनिक ह्मणाले, "महाराज, भिऊं नका, आह्मी आपलें कर्तव्य जाणतों."

इंग्लिश लोकांचा केवळ कंठमणि जो शूर नेलसन तोही जिवापेक्षां आपल्या कर्तव्यास जपे. 'प्रत्येक मनुष्यानें आपलें कर्तव्य करावें अशी इंग्लंदाची इच्छा आहे.' हे शब्द त्यानें त्राफल्गार येथील रणांगणावर समराच्या आरंभीं आपल्या सैनिकांस सांगितले, ते इंग्लंदांत आबालवृद्धांच्या तोंडीं झाले आहेत. या लढाईत इंग्लंदास जय मिळाला, परंतु नेलसन गोळी लागून पडला. मरतेसमयीं तो ह्मणाला, "मीं आपलें कर्तव्य केलें, त्याबद्दल मी परमेश्वराची स्तुति करतों."

सिंहगडच्या लढाईत तानाजीच्या फौजेनें मोठा पराक्रम करून शत्रूचा पराभव केला ही गोष्ट शिवाजीस हितकारक झाली, परंतु तानाजी रणांगणीं पडला असें ऐकतांच मोठें दुःख होऊन शिवाजी ह्मणाला "गड मिळाला परंतु सिंह गेला." याप्रमाणेंच

त्राफल्गार येथें जय झाल्यामुळें इंग्लिश लोकांस आनंद झाला पण नेलसन पडल्यामुळें सर्वांस वाईट वाटलें.

ज्या देशांत कर्तव्यकर्माकडे लक्ष देणारे पुरुष पुष्कळ नाहींत तो देश धनाढ्य, सुपीक, विद्याचारसंपन्न असला तरी त्याची दुर्दशा झाल्याशिवाय रहात नाहीं. ही गोष्ट इतिहास वाचला असतां सहज कळण्यासारखी आहे.

कर्तव्यकर्माकडे ज्याचें लक्ष आहे त्याच्या अंगीं सत्य, सचोटी वगैरे गुण आपोआप येतात. त्यास खोटेपणानें वागण्याचा प्रसंगच येत नाहीं. तो जें मनांत असेल तेंच बोलेल, बोलेल तेंच करील, व करील तें योग्य रीतीनें आणि योग्य वेळींच करील. सत्याच्या योगानें जगांतील सर्व व्यवहार चालतात. सत्याशिवाय लोकसमुदाय जमणार नाहीं. याकरितां मनूनें ह्मटलें आहेः—

**वाच्यर्था नियताः सर्वे वाङ्मूला वाग्विनिःसृताः ॥**
**तां तु यः स्तेनयेद्वाचं स सर्वस्तेयकृन्नरः ॥ १ ॥**

सर्व दुर्गुणांमध्यें असत्यासारखा फार वाईट दुर्गुण कोणताच नाहीं. त्यापासून दुसरे बहुत दुर्गुण उत्पन्न होतात. पुष्कळ लोकांस लबाड बोलण्याचें प्रथमतः इतकें भयंकर स्वरूप वाटत नाहीं; ह्मणून ते आपल्या बायकामुलांशीं लहानसहान लबाड्या बोलण्यास भीत नाहींत. परंतु असें होतें कीं, त्यांच्या मनांतून लबाडीचें भय जाऊन तीं पुढें त्यांसच फसवूं लागतात. कित्येक असे लबाड असतात कीं, लबाडी बोलावयाची असली ह्मणजे ते द्व्यर्थी भाषण करितात; यामुळें त्यांस तोंडावर कोणी लबाड ह्मटलें नाहीं तरी लोकांस त्यांची लबाडी कळल्याशिवाय रहात नाहीं; द्व्यर्थी भाषण करणें हें कित्येकांस मोठें चातुर्य वाटतें, पण नुसत्या लबाडीपेक्षांही तें वाईट आहे.

---

१ सर्व व्यवहार उत्पन्न होण्यास कारण वाणी आहे. वाणीच्या योगानें सर्व व्यवहार चालतात. अशा वाणीला जो चोरितो (खोटें बोलतो) तो सर्व वस्तु चोरणारा होय.

केवळ बोलण्यांतच असत्य असतें असें नाहीं; सत्य सांगणें हें आपलें कर्तव्य आहे, अशा वेळेस उगाच बसणें हेंही असत्यच आहे. तसेंच आपलें मत प्रतिकूळ असतां अनुकूळ असल्याप्रमाणें चेहऱ्यावरून दाखविणें हेंही असत्यच आहे. सत्यशील मनुष्य नम्र असतो. तो अंगीं असलेल्या गुणांचा गर्व वहात नाहीं. पण लबाड मनुष्य उद्धट असतो. जे गुण आपल्या अंगीं नाहींत त्यांचा सुद्धां त्यास गर्व असतो. मनुष्य एकवार लबाड बोलला कीं ती लबाडी झांकण्याकरितां त्यास अनेक वेळ खोटें बोलावें लागतें. एकवार असत्याचा प्रवेश मनुष्याच्या अंतःकरणांत झाला ह्मणजे त्याच्या हातून आपलें कर्तव्य व्हावयाचें नाहीं. याकरतां ज्यास आपलें कर्तव्य करावयाचें असेल त्यानें सत्याची संगति सोडूं नये.

---

## भाग ८.

### सभ्यपणा–सुस्वभाव.

वयसः कर्मणोऽर्थस्य श्रुतस्याभिजनस्य च ॥
वेषवाग्बुद्धिसारूप्यमाचरन् विचरेदिह ॥ १ ॥ मनुः.

'शीलं परं भूषणम्'. भर्तृहरिः.

सभ्यपणा हा मनुष्याच्या बाह्यगुणांपैकीं एक अलंकार होय. कुरूप मनुष्यासही अलंकारानें थोडीशी शोभा येते त्याप्रमाणें वाईट मनुष्यास सुद्धां सभ्यपणामुळें थोडा मान मिळतो. मनुष्य सुरूप असूनही घाणेरडे कपडे वापरणारा असला ह्मणजे तो जवळ नकोसा होतो, त्याप्रमाणें मनुष्य विद्वान् असूनही चावट, दांडगा असला तर त्याची संगति नकोशी होते. कोणतेंही कृत्य सभ्यपणानें केलें असतां तें अधिक शोभतें. सभ्य मनुष्याची संगति लोकांस प्रिय व सुखावह होते. कित्येकांस सभ्यपणाचें मोठें माहात्म्य वाटत नाहीं; पण सदाचरण देखील सभ्यपणानें युक्त नसेल तर

तें शोभत नाहीं. सभ्यपणानें बहुशः मनुष्याची परीक्षा जगांत होते, व त्यामुळें लोकांतही मनुष्याचें वजन वाढतें. दुसरे मोठे गुण अंगीं असून हा नसेल तर ते दिसण्याचा प्रसंग येण्यास अडचण पडते. सभ्यपणामुळें मनुष्याचें पुष्कळ हित होतें. इतर गुण असून केवळ सभ्यपणा नसल्यामुळें पुष्कळांचें नुकसान झालें आहे. बोलण्याचालण्याच्या रीतीभातींवरून जो प्रथम दुसऱ्याच्या मनांत ग्रह उत्पन्न होतो तो जात नाहीं. सभ्यपणा अंगीं असल्यास हा ग्रह चांगला होतो. मनुष्याचे अंगीं दांडगेपणा असला ह्मणजे त्यानें कोणाचें नुकसान केलें नाहीं तरी लोकांस त्याचा त्रास येतो. सभ्य मनुष्यापासून कांहीं लाभ नसला तरी तो लोकांस आवडतो. त्रासिक व दांडगा मनुष्य मनाचा कोमल असला तरी लोकांस त्याचा तिटकारा येतो.

सभ्यपणा ही एक सदाचरणाची खूण आहे. त्यावरून मनुष्याचे विचार, स्वभाव, संगती, आवड यांचें बरेंच ज्ञान होतें. लुच्चेगिरीनें मुद्दाम खोटा सभ्यपणा धरतात तो वेगळा; पण सुशिक्षणाच्या योगानें वाढलेला स्वाभाविक सभ्यपणा हें मनुष्याच्या योग्यतेचें चिन्ह होय. सुशिक्षितपणाशिवाय खरा सभ्यपणा येत नाहीं. याकरतां मोठी बुद्धिमत्ता किंवा विद्वत्ता असली तरी सुशिक्षितपणाशिवाय खरी योग्यता येत नाहीं. सभ्यपणाचे योगानें मनुष्याचे गुण दुसऱ्याचे मनांत तेव्हांच शिरतात. याकरतां सभ्यपणा हा शहाणपणाचा एक भाग आहे असें ह्मणण्यास हरकत नाहीं. मनाचा सभ्यपणा नसून केवळ बाह्य बसण्याउठण्याची व वस्त्रपात्राची ठाकठिकी करून सभ्यपणाचें सोंग आणणें व्यर्थ आहे. मनाच्या कोमलपणाशिवाय शरीराचा चांगुलपणा हा ज्यास सुगंध नाहीं अशा फुलासारखा होय. खरा सभ्यपणा प्रामाणिकपणाशिवाय येत नाहीं. प्रामाणिकपणाशिवाय नुसता सभ्यपणा हा मुलाम्यासारखा आहे. त्यास खऱ्या सोन्याची शोभा यावयाची नाहीं, व तो झिजल्याशिवाय राहणार नाहीं. खरा सभ्यपणा दयेपासून

दूर रहात नाहीं. दुसऱ्याचें अंतःकरण तिळप्राय न दुखविणें हेंच सभ्यपणाचें मूळ होय. आपण लोकांशीं सभ्यपणाची वागणूक केल्याशिवाय लोकही आपणाशीं सभ्यपणानें वागणार नाहींत.

छिचोर मनुष्याचें लोकांशीं वांकडें पडलें तरी हरकत नाहीं, पण त्याच्यानें छिचोरपणा केल्याशिवाय राहवत नाहीं. एका क्षणाच्या गमतीकरतां मित्रांशीं देखील वांकडें पाडून घेणें हा केवढा मूर्खपणा आहे? सभ्य मनुष्य आपल्या खऱ्या मोठेपणाचाही डौल मिरवीत नाहीं, पण छिचोर मनुष्य सर्व गोष्टींत आपलीच बढाई मिरवितो. सभ्य मनुष्य तोंडानें बोलल्याशिवाय चांगली गोष्ट करून दाखवितो, पण छिचोर मनुष्य कांहीं न करतां अनेक प्रकारची बडबड मात्र करतो. दांडगा मनुष्य दुष्ट असतो असें नाहीं. पण त्यास असें वाटतें कीं, आपण मात्र यथेच्छ वागावें; आपणापासून त्रास झाला तरी लोकांनीं सोसून घ्यावा; आपणास मात्र लोकांनीं कांहीं बोलूं नये. लोकांच्या दांडगेपणाचा आपणास जसा त्रास येतो तसाच आपल्या दांडगेपणाचा लोकांस येत असेल, असें त्याच्या स्वप्नींही नसतें. त्याच्यानें आपल्या मनास मुळींच आवर घालवत नाहीं. ज्याचें मन अनावर आहे त्याशीं वागणें मोठें कठिण आहे. अशा मनुष्याच्या संगतीपासून कोणासही सुख होणार नाहीं, इतकेंच नव्हे, उलटा त्याचा त्रास येऊन तो जवळ नसावा असें वाटेल. मन स्वाधीन नसल्यामुळें अंगीं इतर गुण असून त्यांपासून मनुष्याचा नफा होत नाहीं. परंतु मन स्वाधीन असल्यानें साधारण गुणांच्या योगानेंही मोठें हित होतें. बुद्धि, विद्या, इत्यादि गुणांचा जगांत मनुष्यास मोठा उपयोग होतो; परंतु स्वभाव चांगला असल्याशिवाय त्यास सुख प्राप्त व्हावयाचें नाहीं.

केवळ दांडगेपणानें बोलल्यानेंच दुसऱ्यास त्रास होतो असें नाहीं. वाईट पोषाक करणें, घाणेरडेपणानें वागणें, यापासूनही लोकांस त्रास होतो. सभ्यपणा हें कुलीनपणाचें लक्षण आहे. हें

गरीब व श्रीमंत या उभयतांसही हितावह आहे. सभ्य श्रीमंताची श्रीमंतांत प्रतिष्ठा होईल, तशी सभ्य मजुराची मजुरांत प्रतिष्ठा होईल. सभ्यपणा धरण्यास खर्च लागत नाहीं. सभ्यपणाची मुख्य शाळा घर होय. आईबापांनीं सभ्यपणानें वागून लहानपणापासून मुलांस सभ्यपणाची संवय लाविली पाहिजे; असें आहे तरी पूर्ण सभ्यपणा केवळ गृहशिक्षेनें यावयाचा नाहीं. तो मनुष्यानें शहाण्या लोकांत वागूनच शिकला पाहिजे.

सुस्वभाव हें ऐहिक सुखाचें मोठें साधन आहे. बुद्धिमत्ता असून स्वभाव चांगला नसला तर सुख व्हावयाचें नाहीं. सुख होण्यास दया, शांति, क्षमा, परोपकार हे गुण मनुष्याचे अंगीं अवश्य पाहिजेत. शक्तीप्रमाणें नेहमीं थोडाबहुत परोपकार करून दुसऱ्याच्या सुखाचा यत्न करणें हाच स्वसुखाचा उत्तम मार्ग होय.

जगांत कित्येक असे उत्तम मनुष्य असतात कीं, ते स्वभावतःच दुसऱ्याच्या हितास झटणारे असतात. कोणीं पीडा दिली तरी ते त्यांचें वाईट चिंतीत नाहींत. त्यांस दुःख झालें तरी ते अंतःकरणांतील समाधान नाहींसें होऊं देत नाहींत. या त्यांच्या समाधानवृत्तीमुळें ते सर्वांस प्रिय होतात. या उत्तम स्वभावामुळें दुःखाच्या वेळींही ते धीर व उत्साह धरून आपलें हित करून घेतात.

मनुष्याचा स्वभाव जन्मतः उत्पन्न होतो हें खरें, तथापि तो उल्हासी ठेवणें किंवा न ठेवणें हें त्याच्या स्वाधीन आहे. सुखदुःखें हीं सर्वांस आहेतच, परंतु जो संसाराचें खरें स्वरूप ओळखून सदाचरणानें वागतो तो आनंदी असतो. पण ज्यास जगाचें खरें स्वरूप कळत नाहीं, तो सुखदुःखांविषयीं अनेक विचार मनांत आणून ते सफल न झाल्यामुळें उद्विग्न रहातो. गुणग्राही मनुष्य असतो तो दोषांकडे लक्ष न देतां गुणांचेंच ग्रहण करतो; परंतु दोषदृष्टि असतो त्यास जिकडेतिकडे सर्व गोष्टींत दोषच दिसतात. ही दोष पाहाण्याची संवय एकवार लागली ह्मणजे कोणत्याच गोष्टीपासून समाधान वाटत नाहीं.

परोपकारासारखें सुखाचें साधन जगांत कोणतेंच नाहीं. परोपकार ह्मणजे नेहमीं दुसऱ्यास कांहीं तरी दिल्यानेंच होतो असें नाहीं. परोपकाराचें मुख्य बीज मनाचें औदार्य होय. पुष्कळ पैसा खर्चणारा मनाचा कृपण असेल, व एकादा अगदीं गरीब असूनही उदार असेल. पैसा खर्चणें हें द्रव्याच्या अनुकूलतेवर अवलंबून आहे. परंतु औदार्य हा मनोधर्म आहे; यापासूनच मनुष्याची योग्यता वाढते. चांगलें वाईट, खरें खोटें, न्याय अन्याय, इत्यादि कांहीं झालें तरी निमूटपणें ऐकून घेणें हा चांगला स्वभाव नव्हे. जो स्वभावतः खरा चांगला असतो त्यास चांगल्याची आवड आणि वाइटाचा तिटकारा स्वाभाविक असतो. तो लोकांविषयीं उदासीन न राहतां सर्वकाळ कोणाचें कांहीं तरी बरें करण्यास झटतो. तो तात्कालिक सुख किंवा कीर्ति यांकडे लक्ष न देतां इहपरलोकीं परिणामीं सुखकारक होईल असें आचरण करतो. ज्याची सर्वकाळ केवळ स्वसुखाकडेच दृष्टि असते त्याच्या अंगीं दया, भक्ति इत्यादि गुण उत्पन्न व्हावयाचे नाहींत. दिवसभर त्याचें कांहींतरी बिघडलेलेंच असतें; त्यामुळें त्याची कुरकुर कधीं संपत नाहीं; आणि सुखाचें मूळ जो संतोष तो त्याच्या मनांत रहात नाहीं.

संसारांत चांगलें वागत असतांही लहानसहान अडचणी यावयाच्याच. कधीं कोणतेंही संकट यावयाचें नाहीं असें तर होणेंच नाहीं. याकरतां धैर्य धरून संतुष्ट राहून अडचणी दूर करण्याची संवय केली पाहिजे. असंतोषी मनुष्य आलेल्या संकटानेंच दुःखी असतो असें नाहीं. तो नानाप्रकारच्या पुढें येण्यासारख्या अडचणी मनांत आणून उगाच काळजी करीत बसतो. पुढें कोणत्या अडचणी येतील तें मनांत आणून त्या निवारणार्थ उद्योग करणें ठीक आहे; पण तसें न करतां नानाप्रकारच्या व्यर्थ चिंता करून अस्वस्थ होण्यापासून कांहीं उपयोग न होतां मोठा तोटा आहे. कारण अशा मनुष्यास कधींच सुख व्हावयाचें नाहीं. नु-

सती पुढील काळजी करून ती दूर होत असें नाहीं. तीपासून उद्योगांत व्यत्यय मात्र येतो. चित्त संतुष्ट असल्यानें मनुष्य स्वस्थ राहून उद्योग करतो, त्यामुळें त्याचीं संकटें आपोआप नाहींतशीं होतात. पुष्कळ वेळ कार्यघात झाल्यामुळें निराश होऊन यत्न सोडण्यापासून कार्यसिद्धीचा मुळींच संभव नाहीं, परंतु आशा न सोडतां प्रयत्न चालू ठेविला तर कधीं तरी फलप्राप्ति होण्याचा संभव आहे. याकरतांच मनूनें सांगितलें आहेः—

**नात्मानमवमन्येत पूर्वाभिरसमृद्धिभिः ॥**
**आमृत्योः श्रियमन्विच्छेन्नैनां मन्येत दुर्लभाम् ॥ १ ॥**

मनुष्याच्या मनोधर्मांत आशेसारखा दुसरा चालक धर्म कोणताच नाहीं. आशेपासून कार्यसिद्धीपर्यंत जें सुख आहे तें पुढें नाहीं. जगांत एकदम विजयी झालेल्या पुरुषांपेक्षां पुष्कळ वेळ पराजित झालेल्या मनुष्यांकडूनच महत्कृत्यें झालीं आहेत. कशाचीही आशा नसेल तर मनुष्याचें जीवन दुःखमय होईल.

कित्येकांस अशी खोड असते कीं, कोणी कांहीं बोललें तरी त्याचें खंडन करावयाचें. ही खोड फार वाईट होय. कित्येक वेळां असें होतें कीं, मनुष्य आज ज्या गोष्टीचें मंडन करतो तिचेंच उद्यां खंडन करूं लागतो. कोणी कांहीं ह्मटलें तरी त्याच्या उलट बोलणें जसें वाईट तसेंच कांहीं ह्मटलें असतां होय ह्मणणेंही वाईट आहे. ह्या दोहींच्याही योगानें आपल्या मनाची किंमत नाहींशी होते. सभ्यपणाची खरी रीत ह्मटली ह्मणजे आपलें मत असेल तें नम्रपणानें सांगणें ही होय. दांडगेपणा जसा वाईट आहे तसाच भित्रेपणाही वाईट आहे. प्रसंग आला असतां खऱ्या गोष्टीस न भिणें हाच खरा सभ्यपणा होय.

---

१ पूर्वीं फलप्राप्ति झाली नाहीं, ह्मणून आपण दुर्भाग्य असें समजूं नये. मरणापर्यंत संपत्ति मिळविण्याचा उद्योग करावा. ती दुर्लभ आहे, असें मानूं नये.

# भाग ९.

## ग्रंथावलोकन.

**यथा यथा हि पुरुषः शास्त्रं समधिगच्छति ॥**
**तथा तथा विजानाति विज्ञानं चास्य रोचते ॥ १ ॥**

**मनुः.**

सद्वर्तन अंगीं ठसण्यास जशी सुसंगतीची आवश्यकता आहे, तशी ग्रंथावलोकनाची आहे. उत्तम ग्रंथ हा उत्तम मित्र होय. तो सर्वदा सारखा उपयोगीं पडतो. संपत्तींत किंवा विपत्तींत त्यापासून सारखें सुख व समाधान प्राप्त होतें. एक उत्तम मित्र असला ह्मणजे त्याच्या योगानें दुसऱ्या पुष्कळांशीं स्नेह होतो; त्याप्रमाणें ग्रंथावलोकनाच्या योगानें विद्वानांशीं परिचय होऊन आपला ज्ञानसंचय वाढतो.

उत्तम ग्रंथकारांनीं जगांतील लोकांवर मोठा उपकार केला आहे. व्यास, शंकराचार्य, विद्यारण्य, वाल्मिकि, कालिदास, इत्यादिकांच्या ग्रंथांपासून असंख्य मनुष्यांच्या अंतःकरणवृत्ति प्रफुल्लित झाल्या आहेत. रामायण वाचून रामासारखें वागल्यानें केवढी कीर्ति होते, रावणासारखें वागल्यानें केवढी हानि होते, हें मनांत येऊन लाखों मनुष्य दुर्मार्गापासून निवृत्त होऊन सुमार्गाकडे वळले असतील. दुष्टांनीं कितीही छळ केला व ते कितीही बलाढ्य असले तरी सदाचरण सोडलें नाहीं तर ईश्वर अनुकूल होऊन सर्व संकटांतून पार करील; हें महाभारत वाचल्यानें कळून येतें. तारुण्यांत पुस्तकें वाचून मनास जो संस्कार होतो तो तसाच रहातो. उत्तम ग्रंथ हे ज्ञानवीराचे जयस्तंभ होत. मोठाल्या इमारती नाहींतशा झाल्या तरी हे कायम रहातात. ते दुराग्रह व अज्ञान यांचा पराजय करून मनुष्यांचें सुख वाढविण्याविषयीं आपणास उत्तेजन देतात. उत्तम ग्रंथ हीं सुविचाराचीं भांडारें होत. त्यांतील रत्नें आपणास पाहिजे तेव्हां उपयोगीं पडतात. त्यांची ज्यांस पारख आहे, त्यांस समाधानाची उणीव पडणार नाहीं.

उत्तम ग्रंथकार हे या मर्त्यलोकचे सृष्टिकर्तेच होत. याच अभिप्रायानें समर्थ श्रीरामदासस्वामी यांनीं कवीचें खालीं लिहिल्याप्रमाणें उत्तम वर्णन केलें आहे.

**आतां वंदूं कवीश्वर । जे शब्दसृष्टीचे ईश्वर ॥**
**नातरी हे परमेश्वर । वंदावे तरी ॥ १ ॥**
**कीं हे सरस्वतीचें स्थान । कीं हे नाना कळांचें जीवन ॥**
**नाना सद्विद्यांचें भुवन । यथार्थ होय ॥ २ ॥**
**कीं हे पुरुषार्थाचें वैभव । कीं हे जगदीश्वराचें महत्त्व ॥**
**नाना लाघवें सत्कीर्तिस्तव । निर्माण कवी ॥ ३ ॥**
**कीं हे शब्दरत्नांचे सागर । कीं हे मुक्तसरोवर ॥**
**नाना विधींचे वैरागर । निर्माण झाले ॥ ४ ॥**
**कवी मुमुक्षूचें अंजन । कवी साधकांचें साधन ॥**
**कवी सिद्धांचें समाधान । निश्चयात्मक ॥ ५ ॥**
**कवी स्वधर्माचा आश्रयो । कवी मना मनोजयो ॥**
**कवी धार्मिकाचा विजयो । विजयकर्ते ॥ ६ ॥**
**कवी वैराग्याचें संरक्षण । कवी भक्तांचें भक्तिलक्षण ॥**
**नाना स्वधर्मसंरक्षण । ते हे कवी ॥ ७ ॥**

अनंतशक्तिपरमेश्वरानें अपार चातुर्यानें जसें असंख्यचमत्कारपरिपूर्ण स्वप्रभावज्ञापक असें हें विश्व निर्माण केलें आहे, त्याचप्रमाणें कवीश्वर परमेश्वरानें दिलेल्या आपल्या प्रतिभेच्या योगानें ग्रंथसृष्टि उत्पन्न करून लोकांस आनंदित करतात. सृष्टिकर्ता जसा सज्जनांस सामर्थ्य देऊन त्यांच्याकडून नानाप्रकारचीं मोठमोठीं सत्कृत्यें करवून त्यांस कीर्तिमान् करतो, त्याप्रमाणेंच हे काव्यसृष्टिकर्ते सज्जनांची कीर्ति अजरामर करतात, व दुर्योधन रावण यांचीं उदाहरणें लोकांच्या डोळ्यांपुढें मांडून त्यांस परधन व

परस्त्री यांचें हरण करण्यास प्रवृत्त झाल्यास समूळ नाश होतो असें शिकवितात.

उत्तम ग्रंथ हे आपले अजरामर गुरु होत. ते आपणास जन्मभर पढवीत असतात. त्यांच्या आज्ञेत राहिल्यास आपलें हित झाल्याशिवाय रहाणार नाहीं. त्यांच्या योगानें आपणास पाहिजे त्या मोठ्या मंडळींतलें पाहिजे त्या काळचें सुखदुःख अनुभवितां येतें. सभापर्व वाचूं लागलें ह्मणजे द्रौपदीची दुर्दशा आपणापुढेंच होत आहे काय, असें मनांत येऊन डोळ्यांतून ढळढळां अश्रुधारा वाहूं लागतात; व कर्णपर्व वाचतांना भीमानें दुःशासनाचें हृदय फाडिलें हें पाहून शत्रूस शासन झाल्यामुळें आपणास समाधान वाटतें. अयोध्याकांड वाचूं लागलें ह्मणजे मंथरेनें लाविलेली कलागत, कैकेयीचा हट्ट, दशरथाचें सत्य व शोक, रामाची पितृभक्ति व भरताचें भ्रातृप्रेम, यांच्या योगानें मी अयोध्येंत राहणाऱ्यांपैकींच आहें असें समजून वाचकास रामाच्या वनवासाचें दुःख होऊन तो ढळढळां रडूं लागतो. ग्रंथाच्या योगानेंच प्राचीन काळचे दुष्यंत, भरत, नल, दिलीप, रघु इत्यादि राजे अमर झाले आहेत.

व्यास, शंकराचार्य, वाल्मिक, गौतम, जैमिनि, पाणिनि, कालिदास इत्यादि सत्पुरुष संस्कृत ग्रंथांच्या योगानें जगांत अमरत्व पावले. त्यांचें नांव जगांतून नाहींसें होण्याचें भय नाहीं. भारतरामायणांतील कथा निघाली कीं व्यासवाल्मिकांचें स्मरण झालेंच. तत्त्वविचार करूं लागलें कीं न्यायमीमांसा यांचा प्रसंग येऊन शंकराचार्य, गौतम व जैमिनि यांची आठवण होतेच. पाणिनीविषयीं तर असें वाटतें कीं, तो आपली अष्टाध्यायी भरतखंडांत आज हजारों वर्षें पढवून आतां यूरोपखंडांतील जर्मनी वगैरे देशांत 'वृद्धिरादैच्' इत्यादि सूत्रांचा पाठ सांगत आहे! कालिदासानें तर शकुंतला नाटकाच्या योगानें युरोपांतील गोएथसारख्या महापंडितास नाचावयास लावलें. ज्ञानेश्वर, तुकाराम, रामदास, वा-

मन, मोरोपंत, श्रीधर इत्यादि प्राकृत ग्रंथकारांचें नांव महाराष्ट्र-भाषा आहे तोंपर्यंत नाहींसें होणार नाहीं. यांनीं कीर्तनघोषानें सर्व महराष्ट्र देश गाजवून दिला ह्मटलें तरी चालेल. कारण कोठेंही कीर्तन झालें तरी तेथें यांचीं शब्दमौक्तिकें निघाल्याशिवाय त्यास रंग यावयाचा नाहीं. नरसीमेथा, प्रेमानंद यांनीं गुजराथी लोकांचीं मनें भक्तिरसानें भरून टाकिलीं आहेत. तुळसीदासानें आपलें नांव सर्व हिंदुस्थानांत प्रिय केलें आहे.

सद्वर्तनाच्या संबंधानें पाहिलें तर थोर पुरुषांचीं चरित्रें वाचण्यापासून मनुष्यास मोठा लाभ आहे. पूर्वीं होऊन गेलेल्या मनुष्यांचें वर्तन, त्यांचीं कृत्यें, त्यांजवर आलेलीं संकटें, त्यांनीं भोगिलेलीं दुःखें, हीं लक्षपूर्वक वाचल्यापासून मनुष्याचें हित झाल्याशिवाय रहाणारच नाहीं.

चरित्रें वाचण्याची आवड थोडीबहुत पूर्वींपासून सर्व देशांत आहे. तीं लिहिण्याची चाल मात्र प्रत्येक ठिकाणीं वेगळाली आहे. नाटकें, कादंबऱ्या, हीं एका प्रकारचीं चरित्रेंच होत. मनुष्यांनीं यांतील चांगल्या पात्रांचें अनुकरण करावें ह्मणूनच हीं लिहिलेलीं असतात. पण त्यांत कल्पित भाग पुष्कळ असल्यामुळें विवक्षित कार्य होत नाहीं. यापेक्षां खऱ्या चरित्रापासून पुष्कळ नफा आहे. आपल्या मराठी भाषेंत जुना लिखित चरित्रसंग्रह ह्मटला ह्मटजे बखरींच्या रूपानें असे. कांहीं कांहीं बखरी फारच उत्तम मनोवेधक रीतीनें लिहिलेल्या आहेत. व्यास, वाल्मिकि, कालिदास, पाणिनि यांचीं चरित्रें लिहिलेलीं असतीं तर किती उपयोग झाला असता. भारत, रामायण यांसारखे ग्रंथ लिहिण्यास त्यांस कसा उद्योग करावा लागला, ग्रंथ संपविण्यास किती काळ लागला, कोणत्या जुन्या ग्रंथावरून किंवा गुरूपाशीं त्यांनीं अध्ययनास प्रारंभ केला, संसारांत त्यांच्या आईबापांची व त्यांची काय स्थिति होती, त्यांस शत्रुमित्र कोण होते, मनुष्यांशीं त्यांची वागणूक कशी होती, वगैरे गोष्टी कळल्यापासून किती

लाभ झाला असता. साक्रेतिसाचें चरित्र मराठी भाषेंत झालें आहे तें वाचल्यानें किती आनंद होतो!

आलीकडे शिवाजी, बाजीराव, वगैरे कित्येक पुरुषांचीं चरित्रें प्रसिद्ध झालीं आहेत. उत्तरोत्तर अनुकरणीय अशीं चरित्रें वाढविणें हें देशहितेच्छूंच्या अनेक कर्तव्यांपैकीं एक आहे. तें कालेंकरून घडून येईल. चरित्रांत मनुष्याच्या सर्व मोठ्याच गोष्टी लिहिल्या पाहिजेत असें नाहीं, किंवा मोठाल्या राजांचीं मात्र चरित्रें हितावह आहेत असें नाहीं. डाक्तर जान्सन् यानें असें ह्मटलें आहे कीं, कोणताही मनुष्य असला तरी त्याच्या चरित्रापासून कांहीं तरी लाभ होईल. त्याचा अनुभव, त्याचीं दुःखें, त्यावर आलेलीं संकटें, त्याचे जय व पराजय, यांपासून कांहीं तरी कळल्याशिवाय राहणार नाहीं. एका पंडितानें असें ह्मटलें आहे कीं, चरित्रांत केवळ चांगल्याच गोष्टी लिहूं लागलें तर त्यापासून कांहीं उपयोग होणार नाहीं.

चरित्रांत मनुष्याचीं चांगलीं कृत्यें मात्र लिहिलीं तर हा कोणी अद्वितीय दैवशाली मनुष्य होता असें लोकांस वाटून त्याच्या अनुकरणाची इच्छा उत्पन्न होणार नाहीं. परंतु सत्कृत्यांबरोबरच त्याचे दोष, त्याच्या चुका, हीं लिहिलेलीं असलीं तर आपणासारखाच हा साधारण मनुष्य असून प्रयत्नानें प्रसिद्धीस आला, तसा प्रयत्न केल्यास आपणही महत्त्वास पावूं अशी उमेद वाचकांच्या मनांत येईल. कित्येक गोष्टी स्वरूपतः अगदीं क्षुल्लक असतात पण त्यांपासून मोठालीं कार्यें घडून येतात. शिवाजी दिल्लीस औरंगजेबाच्या कैदेंत असतां युक्तीनें सुटून आला, ही गोष्ट साधारण दिसते, पण तीच मराठी राज्याच्या स्थापनेस कारणीभूत झाली. त्या वेळेस शिवाजीची युक्ति फसती तर आज त्याचें नांव देखील कदाचित् कोणास माहित झालें नसतें.

गिबननामक विद्वान् इंग्लिश इतिहासकारानें मुसलमानांच्या पैगंबराची अशीच एक गोष्ट आपल्या पुस्तकांत लिहिली आहे.

नवा धर्म सांगूं लागल्यामुळें मक्का येथें त्यास पुष्कळ शत्रु झाले, तेव्हां तो पळून मदिना येथें गेला. वाटेंत जात असतां शत्रु त्याच्या पाठीस लागले होते. एके वेळेस शत्रु आपल्याला गांठतात असें वाटून महमद एका गुहेंत शिरला. शत्रूंची नजर चुकून ते त्याचा पाठलाग करीत तसेच पुढें गेले; तेव्हां महमद दुसऱ्या वाटेनें मदिना येथें गेला. गिबन ह्मणतो, या वेळेस महमद शत्रूंस सांपडला असता तर एका भाल्याच्या फटकाऱ्यानें आज जगाची स्थिति वेगळीच झाली असती.

फ्रेंच लोकांचें वर्चस्व हिंदुस्थानांत स्थापणारा डुप्ली यानें स्वबुद्धीनें हिंदुस्थानच्या लोकांचा स्वभाव ओळखून एक कल्पना काढिली, तीच हिंदुस्थानांत युरोपियन लोकांच्या राज्याचा पाया दृढ होण्यास कारण झाली. प्रथमतः युरोपियन लोक व्यापाराकरतां येथें आले. राज्यप्राप्ति त्यांच्या स्वप्नीं देखील नव्हती. हिंदुस्थानच्या लोकांबरोबर वागतांना डुप्ली यास असें कळलें कीं, हे लोक फार विश्वासू आहेत, स्वदेशभक्तीचें बीज यांच्या अंगीं नाहीं. यांस कवाईत शिकवून रणशूर केलें तर हेच आमचें राज्य स्थापण्यास उपयोगीं पडतील. हें तत्त्व कळल्यापासून युरोपियन लोकांनीं हिंदुस्थानांत राज्य करण्याचा उद्योग सुरू केला. युरोपांतून सैन्य आणून राज्य स्थापणें असंभाव्यच होतें. देशांतल्या लोकांच्या साहाय्यानें परकी लोकांनीं आपलें राज्य स्थापिलें असें उदाहरण हिंदुस्थानाशिवाय पृथ्वींत कोठें नाहीं.

साधारण मनुष्याच्या चरित्रापासून देखील लाभ आहे, तर मग जगाच्या इतिहासांतील नायक अशा मोठ्या पुरुषांच्या चरित्रापासून केवढा उपयोग आहे! चरित्रापासून मुख्य शिक्षण मिळतें तें हें कीं, मनुष्यास उद्योगाच्या योगानें केवढालीं कामें करतां येतील हें कळून त्यापासून धैर्य व उत्तेजन हीं प्राप्त होतात. फलप्राप्तीची निराशा होत नाहीं. प्रत्येक मनुष्यास दुसऱ्याच्या चरित्रापासून कांहीं तरी शिकतां येईल. चांगलें कृत्य हलक्या मनुष्या-

कडून घडलें असलें तरी त्यापासून आनंद होतो. नारायणराव पेशव्याच्या मरणाच्या वेळेस रामशास्त्रीबावांनीं राघोबादादास जें खरमरीत उत्तर दिलें त्याचा चमत्कार वाटतो; तसाच त्याच्या चापाजी हुजऱ्यानें यजमानास वांचविण्याकरितां त्याच्या अंगावर पडून जीव दिला त्याचाही चमत्कार वाटतो.

चरित्रासारखाच इतिहासाच्या वाचनापासून मनुष्यास मोठा लाभ आहे. इतिहास ह्मणजे चरित्रसंग्रह होय, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. कारण त्यांत मनुष्याचीं कृत्यें आणि त्यांपासून देशांवर व राष्ट्रांवर घडलेले परिणाम यांचेंच वर्णन असतें. रामा शागिर्दास जर यजमान बोलला नसता तर काशीस जाऊन अध्ययन करून, रामशास्त्रीबावा होऊन माधवराव पेशव्याच्या राज्यास अलंकृत करणें हें त्याच्यानें कदाचित् झालें नसतें.

सर वाल्टर स्काट यास लष्करी खात्यांत शिरण्याची हौस होती, पण लहानपणीं धांवत असतां पडून त्याचा पाय लंगडा झाला तेव्हां त्यास विद्येकडे लक्ष लावणें भाग पडलें. असें झाल्यामुळें त्यानें उत्तम ग्रंथ लिहून इंग्रजी भाषेस अधिक सौंदर्य आणिलें.

चरित्रें वाचल्यापासून संसारांत अनेक भिन्न भिन्न प्रसंगीं कसें वागावें हें कळतें. तसेंच इतिहासाच्या वाचनानें राज्यकारभारांत परचक्रादि बिकट प्रसंगीं कसें वागावें याची माहिती होते. ज्यांनीं आपल्या पराक्रमानें संकटप्रसंगीं आपल्या देशाचें रक्षण केलें, ते शिवाजीसारखे राजे जसे काय इतिहासद्वारा लोकांस राजनीतीचें शिक्षणच देत आहेत. ज्या राजांनीं प्राप्त झालेलें प्रजापालनरूप जोखिमीचें काम सावधपणानें न करतां ऐश्वर्यांत निमग्न होऊन आपला नाश करून घेतला, ते संभाजी व बाजीराव यांसारखे राजे इतिहासांत बसून राजांस सांगत आहेत कीं, काळजीनें आपला अधिकार चालवा, नाहीं तर आह्मांप्रमाणें वैभव घालवून अक्षय्य अपकीर्ति पावाल. सुधारलेल्या देशाचा इतिहास इतर देशांस सांगतो कीं, तुह्मांमधील लोकांनीं माझ्यांतील लोकांप्रमाणें

ज्ञानसंपादन करून पराक्रम केल्यास मजप्रमाणें तुह्मी कीर्तिमान् व्हाल. भारत, रामायण, हे प्राचीनकाळचे भरतखंडाचे इतिहासच होत. यांतील कथांच्या श्रवणानें शिवाजी राजाच्या मनांत वीरश्रीनें प्रवेश केला, त्यामुळें त्यानें दुष्टांचा संहार करून इतिहासांत मराठ्यांचें नांव गाजविलें. अशीं उदाहरणें इतिहासांत पुष्कळ आहेत. मनुष्याच्या अंगीं खरी योग्यता येण्यास ग्रंथावलोकन हें मोठें साधन होय.

इंग्लिश, फ्रेंच, वगैरे युरोपियन लोकांमध्यें जे कित्येक अत्युत्तम गुण आहेत, त्यांपैकींच विद्येची आवड हा होय. हा गुण त्यांच्या स्वहितसाधनास उपयोगीं पडतो. युरोपियन लोकांसारखे स्वार्थसाधु लोक भूमंडळावर कोठें नसतील. गोष्ट कितीही दुःसाध्य असो, ती प्राप्त होईपर्यंत ते स्वस्थ बसावयाचे नाहींत. स्वार्थसाधनाकरतां ते पाहिजे तितके श्रम करतील. चांगली वाईट कोणतीही गोष्ट असली तरी तिची पक्की माहिती करून घेतल्याशिवाय ते राहणार नाहींत. ते दुसऱ्या देशांचीं राज्यें मिळवून चैन भोगित स्वस्थ बसले नाहींत. जिंकलेल्या लोकांचा धर्म, राज्यनीति, व्यवहार, आचार, रीति, यांची बारीक माहिती मिळवून तद्वारा त्यांचा स्वभाव ओळखून त्यांच्यावर आपला अंमल चिरस्थायी कोणत्या रीतीनें होईल याविषयीं ग्रंथ लिहून ते नेहमीं चर्चा करतात. 'पुढल्यास ठेंच आणि मागला सावध,' या ह्मणीप्रमाणें नेहमीं ते इतिहास वाचून ग्रीक, रोमन वगैरे लोकांनीं परदेशचीं राज्यें काबीज केलीं तीं त्यांच्या कोणकोणत्या चुकांनीं त्यांजकडून गेलीं याचा विचार करून तशा चुका आपल्या हातून न घडतां कोणत्या रीतीनें आपली भरभराट कायम राहील याचा विचार करून त्याकरितां इष्ट असे उपाय योजितात. मनूला किती वर्षें झालीं, कालिदास कोणत्या शतकांत झाला, वेदांत मूर्तिपूजा आहे किंवा

नाहीं, या गोष्टींची युरोपियन लोक वाटाघाट करतात; हें पाहून आमच्या लोकांस आश्चर्य वाटतें. युरोपियन लोक जिंकलेल्या लोकांचा इतिहास जाणण्यास श्रम करतात, परंतु एशियाखंडांतील लोकांस जिंकणाऱ्यांचा इतिहास देखील समजून घेण्याची आवश्यकता वाटत नाहीं. युरोपियन लोकांनीं जसा इकडील लोकांचा स्वभाव ओळखून उद्योगानें आपलें काम करून घेतलें, त्याप्रमाणें इकडील लोकांनीं त्यांचा स्वभाव ओळखून त्याप्रमाणें वागणूक ठेवून उद्योग केला असता, तर मोठें हित झालें असतें. युरोपांतील लोक दुसऱ्या देशांत जी सुधारणा होईल ती लागलीच आपल्या देशांत सुरू करून लोकांपेक्षां मागें रहात नाहींत, त्यामुळें एकमेकांकडे सहसा कोणी वांकड्या दृष्टीनें पहात नाहीं. तुर्कस्थानासारखे जे देश सुधारणेंत मागें रहातात त्यांवर लोकांचा डोळा असतोच. वस्तु आपली असली तरी ती संभाळण्यास अंगीं सामर्थ्य पाहिजे. यासाठीं विद्या, कला, कौशल्य इत्यादि गुणांत युरोपाची बरोबरी केल्याशिवाय एशियाखंडास वर्चस्व कधींही प्राप्त होणार नाहीं. युरोपांत ज्ञानसंपादनाचे मार्ग सुलभ झाले आहेत असे एशियाखंडांत नाहींत हें खरें आहे, तथापि कोणतीही उपयुक्त गोष्ट कठिण ह्मणून टाकून देतां कामा नये. कठिण असली तर जास्त श्रम करणें हाच ती सुलभ होण्याचा मार्ग होय. बलवान् दुर्बलाच्या ताब्यांत रहातो, परंतु दुर्बल ज्ञानसंपन्न असला तर बलवानाचें कांहीं चालूं देत नाहीं, हें मनुष्यांनीं अश्वादिपशूंस आपल्या सेवेस लाविलें आहे यावरून स्पष्ट आहे.

ग्रंथावलोकन हें विद्याप्राप्तीचें मुख्य साधन होय. विद्येसारखी इहलोकीं सुखदायक वस्तु कोणतीच नाहीं. महापंडित भर्तृहरि यानें तर विद्याहीनास पशूच ह्मटलें आहे.

**विद्या नाम नरस्य रूपमधिकं प्रच्छन्नगुप्तं धनं ।**
**विद्या भोगकरी यशःसुखकरी विद्या गुरूणां गुरुः ॥**

**विद्या बन्धुजनो विदेशगमने विद्या परा देवता ।**
**विद्या राजसु पूजिता न तु धनं विद्याविहीनः पशुः ॥१॥**

या वचनाकडे लक्ष देऊन सर्वांनीं यथाशक्ति विद्यावृद्धीस झटावें हाच कल्याणाचा मार्ग होय.

---

## भाग १०.

### दांपत्य[1].

**तथा नित्यं यतेयातां स्त्रीपुंसौ तु कृतक्रियौ ॥**
**यथा नाभिचरेतां तौ वियुक्तावितरेतरम् ॥ १ ॥**
**अन्योन्यस्याव्यभीचारो भवेदामरणांतिकः ॥**
**एष धर्मः समासेन ज्ञेयः स्त्रीपुंसयोः परः ॥ २ ॥ मनु.**

दांपत्य हा संबंध विवाहापासून उत्पन्न होतो. विवाह हा जगाच्या सर्व सुधारणेचा पाया आहे असें ह्मटलें पाहिजे. ज्ञान व भाषा या दोन गोष्टींनीं मनुष्य सर्व प्राणिवर्गापेक्षां श्रेष्ठ झाला आहे हें खरें, तथापि या दोन साधनांच्या योगानें मनुष्यांनीं जी अनंत सुखसाधनांची परंपरा शोधून काढिली तिची पहिली पायरी विवाह ही होय असें ह्मणण्यास हरकत नाहीं. किंबहुना बोलणें देखील या संबंधाच्या पुढेंच भाषात्वास पावलें असेल असें ह्मणावें लागतें. कारण अलीकडे भूगर्भशास्त्राचा अभ्यास करून भूरचनेची प्रथम स्थिति कशी होती व ती कोणकोणत्या कारणांनीं कोणकोणतीं रूपांतरें पावून वर्तमान स्थितीप्रत पावली आहे, हें जाणण्याचा जसा प्रयत्न अर्वाचीन शास्त्रकारांनीं चालविला आहे, त्याप्रमाणेंच, भाषा कशी उत्पन्न झाली व ती कोणकोणत्या क्रमानें अनेक चमत्कारिक रूपें पावली, याचाही शोध लावण्याचा भाषाशास्त्रकारांनीं प्रयत्न चालविला आहे. कित्येकांचें असें मत

---

[1] विवाहित स्त्रीपुरुषांचा संबंध.

आहे कीं, परमेश्वरानें मनुष्यांस जी भाषणशक्ति दिली आहे तिच्या योगानें प्रथमतः अनंत वस्तूंचे परस्पर जे संयोगवियोग तद्रूप ज्या क्रिया तद्वाचक धातु उत्पन्न झाले व त्यांपासून ती ती क्रिया वारंवार करणाऱ्यांचीं वाचक अशीं, माता, पिता, सूनु, दुहिता इत्यादि नामें उत्पन्न झालीं. भाषाशास्त्राच्या नियमाप्रमाणें शब्दांच्या पूर्वरूपांच्या मागें मागें शोध लावित गेल्यास, निकटसंबंधवाचक जे माता, पिता इत्यादि शब्द ते अनेक भाषांत समान असून एकाच अर्थानें प्रवृत्त झालेले आढळतात, यावरून हे शब्द भाषेच्या आरंभीं उत्पन्न झाले आणि त्याच्या पूर्वींच पितृत्वमातृत्वादि निकटसंबंध पुष्कळ दिवस असावे हें स्पष्ट आहे.

जगांतील सर्व कलाकौशल्याच्या उत्पत्तीचा पाया स्वहित किंवा स्वकीयहित होय. विवाहसंबंध नसता तर हिंसादि कोणत्या तरी उपायानें क्षुधा तृषा शांत करणें हाच काय तो आरण्यक स्वतंत्र पशूंचा व्यवसाय, हीच स्थिति मनुष्याची असती. परंतु विवाहसंबंधामुळें गम्यागम्य, भक्ष्याभक्ष्य, पेयापेय, वाच्यावाच्य, कार्याकार्य इत्यादि विधिनिषेध उत्पन्न झाले. त्यामुळें मनुष्यांस सुखप्राप्ति आणि दुःखनिवृत्ति यांसाठीं अनेक उद्योग करावे लागले. या उद्योगांमुळें मनुष्यांचें ज्ञान वाढून अनेक शास्त्रें व कला उत्पन्न होऊन त्यांस सृष्टीचें साम्राज्य मिळालें आहे. या प्रकारचा हा विवाहसंबंध महत्त्वाचा असल्यामुळें सर्व धर्मांत यास पवित्र मानिलें आहे. या संबंधाविषयीं ज्यांत उल्लेख किंवा थोडेबहुत नियम नाहींत असें धर्मशास्त्र पृथ्वीवर सांपडावयाचें नाहीं. तथापि कालांतरानें धर्मबीजें कायम राहून संस्कारादि बाह्य क्रियांचें रूपांतर होतें, त्याप्रमाणेंच विवाहसंबंधाविषयीं अनेक देशांत अनेक चाली पडल्या आहेत. कोठें पुरुषास एककालीं एकच स्त्री करण्याचा अधिकार, कोठें एकापेक्षां अधिक स्त्रिया करण्याचा अधिकार, कोठें कन्यादान, कोठें स्वयंवर, कोठें पति मृत झाला असतां स्त्रियांनीं जन्मभर वैधव्यांत रहाणें, कोठें पाहिजे तितके वेळ पुनः पुनः स्त्रियांनीं पति करणें,

असे अनेक मार्ग भिन्न भिन्न काळीं वेगळाल्या देशांत प्रवृत्त झाले. मनुष्याची स्वहितप्रवृत्ति स्वाभाविक आहे; यासाठीं त्या त्या कालीं त्या त्या देशांत हे मार्ग सुखकारक ह्मणूनच प्रवृत्त झाले असतील यांत संशय नाहीं. याकरतां सर्वथा त्यांची निंदा न करतां वर्तमान स्थितीस योग्य असे मार्ग प्रवृत्त करणें हें सुधारणेच्छूंचें कर्तव्य आहे. "[१]तातस्य कूपोयमिति ब्रुवाणाः क्षारं जलं कापुरुषाः पिबन्ति" याप्रमाणें केवळ जुन्या चालींस चिकटणें चांगलें नाहीं, तरी विचार न करतां एकदम जुनें तितकें सर्व वाईट असें ह्मणणें हाही वेडपणा होय. याकरतांच महाकवि कालिदासानें ह्मटलें आहे—

> [२]पुराणमित्येव न साधु सर्वं
> न चापि सर्वं नवमित्यवद्यं ॥
> संतः परीक्ष्यान्यतरद्भजंते
> मूढः परप्रत्ययनेयबुद्धिः ॥

विवाहसंबंधानें आपल्या देशांत जुन्या व नव्या लोकांमध्यें पुष्कळ मतभेद उत्पन्न झाला आहे, व तो होण्यास कारणेंही आहेत.

स्वयंवर हा विवाहाचा स्वाभाविक प्रकार दिसतो, तथापि अनेक कारणांनीं केवळ त्यासच अवलंबून राहतां येत नाहीं. विवाह हा जन्माचा संबंध होय; तो जुळविणाऱ्यांच्या अंगीं मोठें चातुर्य व दूरदृष्टि पाहिजे. युरोपांत वस्त्रालंकारभूषित तरुण स्त्री आणि पुरुष एकाद्या महोत्सवाच्या प्रसंगीं एकमेकांच्या दृष्टीस पडून एकमेकांचें मन आकर्षून घेतात, त्यामुळें त्यांमध्यें जो आकस्मिक प्रेमा उत्पन्न होतो तो चिरस्थायी होत नाहीं. अशा शिथिल प्रे-

---

१ हा माझ्या बापाचा आड आहे, असें ह्मणून मूर्ख लोक खारें पाणी पितात. २ जुनें तेवढें सगळें चांगलें असें नाहीं. तसेंच नवें तेवढें सर्व वाईट असेंही नाहीं. सज्जन आहेत ते जुनें व नवें या दोहोंचीही परीक्षा करून त्यांतून एक चांगलें असेल तें घेतात. मूर्ख असतो तो दुसरा करील तसें करतो.

मबंधानें स्त्रीपुरुष संयुक्त झाल्यामुळें परस्पर मुखचंद्रदर्शनानें उचंबळलेल्या प्रेमाब्धीच्या लहरी काहीं वेळानें नाहींतशा होऊन त्यास ओहोटी लागते. काहीं वेळानें उभयतांचीं अंतःकरणें शांत होतात. प्रथम प्रेमवसंताचा बहार गेल्यावर उभयतां संसारभार वाहूं लागलीं ह्मणजे परस्परांचे दोष मनांत येऊन एकमेकांस अप्रिय होऊं लागतात. असें होतां होतां प्रेमबंध तुटून परस्पर वियुक्त होतात. ह्या प्रेमबंधछेदाच्या न्यायाकरतांच युरोपांतील राष्ट्रांत अनेक न्यायाधीश नेमावे लागतात. उभयतां तरुण व सज्ञान होऊन जगांत आपणास कोणत्या रीतीनें वागावयाचें, आपल्या अंगीं शारीर किंवा मानसिक शक्ति किती आहे, या गोष्टी उभयतांस कळून आल्यावर जो विवाहसंबंध होईल तो दृढ व्हावा हें खरें, तथापि या गोष्टी घडून येण्यास फार अडचणी असतात. साधारण न्यायतत्त्वें सुलभ असतात, परंतु न्यायसभेंत न्याय चालला असतां दोहों पक्षांकडील वकील बुद्धिकौशल्यानें आपापल्या पक्षाकडील वैगुण्याचें आच्छादन करून गुणांचें मंडन करतात, त्यामुळें सत्पक्ष कळण्यास अडचण पडते, त्याप्रमाणें तरुण स्त्रीपुरुषांची गांठ पडली ह्मणजे मुद्दाम परस्परांवर प्रेम बसेल अशा रीतीनें तीं वागतात, त्यांमुळें एकमेकांचा खरा स्वभाव कळत नाहीं. निकट संबंध होऊन परस्परांचा स्वभाव कळला ह्मणजे पूर्वीचें प्रेम नष्ट होऊन अप्रीति उत्पन्न होते. याकरतां केवळ स्वेच्छाप्रवृत्ति न करतां जीं आपल्यापूर्वीं जगांत पुष्कळ दिवस वागत आलीं आहेत व अनेक प्रसंग पाहून ज्यांस जगाचा बराच अनुभव आला आहे अशीं मातापितरें किंवा दुसरीं हितेच्छु वडील माणसें असतील त्यांचा विचार विवाहसंबंध करणाऱ्यांनीं घ्यावा हें योग्य आहे, असें कोण विचारी मनुष्य कबूल करणार नाहीं?

तरुण स्त्रीपुरुषांनीं केवळ स्वेच्छाप्रवृत्तीनें विवाहसंबंध करणें हें जसें वाईट तसेंच, वधूवरांची शरीरप्रकृति, त्यांचें रूप, त्यांच्या

मनाचा कल, त्यांचा स्वभाव, त्यांची आवड, त्यांचे विद्याविनयादि गुण, यांकडे लक्ष्य न देतां त्यांच्या बाल्यावस्थेंत केवळ आईबापांनीं सासुसासरेपणा प्राप्त होण्याकरतां किंवा कसें तरी बाळ्याचें लग्न करून संसारांतील भार उतरण्याकरितां किंवा हुंड्याच्या लोभाकरितां विवाहसंबंध करणें हेंही वाईट होय. बालविवाह व तरुणविवाह अथवा परेच्छाप्रवृत्त विवाह व स्वेच्छाप्रवृत्त विवाह या दोहोंतही सारख्याच अडचणी आहेत. त्या दूर करण्यास आमच्या शास्त्रकारांनीं पुष्कळ तजविजी योजिल्या आहेत. अलीकडे युरोपांतील सुधारलेल्या देशांतील कित्येक विद्वानांचें असें मत आहे कीं, आपल्या कुटुंबाचें पालन पोषण करण्यास आपण समर्थ आहों अशी खात्री असल्याशिवाय मनुष्यानें लग्न करूं नये. कारण असे विवाह पुष्कळ झाल्यानें देशांत भिकार फार वाढतें. या गोष्टीकडेही आमच्या शास्त्रकारांचें लक्ष होतें. विवाहांत वाग्निश्चय, कन्यादान इत्यादि संस्कारांवरून असें दिसतें कीं मातापित्रादि वडील माणसांच्या अनुमतीशिवाय विवाह करूं नये असें शास्त्रकारांचें मत होतें. त्या योगानें त्यांनीं केवल स्वेच्छाप्रवृत्तीनें होणाऱ्या विवाहापासून होणारे वाईट परिणाम टाळण्याचा यत्न केला. मुलांचा विवाह हा केवळ आपल्या सुखसोहळ्याकरतां आहे असें न समजतां दंपत्याच्या सुखार्थ आहे व तो होईल तितका योग्य रीतीनें करणें ही आपणांवर मोठी जबाबदारी आहे असें आईबापांनीं समजलें पाहिजे. आपल्या कर्तव्यकर्माकडे लक्ष देऊन वधूवरांचें कुल, शील, वय, रूप, विद्या, विनय, सामर्थ्य या गुणांचा विवाहकालीं विचार झाला पाहिजे. बाळ्याचे कसे तरी दोन हातांचे चार हात करणें हेंच केवळ कर्तव्य नाहीं. विद्यादि अवश्य गुणांनीं युक्त पुत्र नसेल तर दुसऱ्याच्या मुलीच्या हिताहिताचा विचार न करतां त्याचा विवाह करणें अयोग्य होय. मुलगा विवाहार्ह असेल तर त्याचा विवाह अधिक सुखावह कशानें होईल तें पाहून त्याप्रमाणें करणें एवढेंच वडिलांचें कर्तव्य आहे. 'माझ्या

हृदयासारखें तुझें हृदय असो', 'माझें वचन चित्त देऊन ऐक', 'आपण मित्र होऊं' अशीं वचनें विवाहसंस्कारप्रयोगांत आहेत. यावरून हें स्पष्ट आहे कीं वधूवरांचें ज्ञान व वय या ठरावाची योग्यता ध्यानांत येण्यासारखें असलें पाहिजे. तसेंच दुसरें असें आहे कीं, आमच्या वेदशास्त्रांनीं विद्यासंपादन हें अवश्य कर्तव्य ह्मणून सांगितलें आहे, परंतु विवाह तसा सांगितला नाहीं. बारा-वर्षें निदान विद्यासंपादन करावें असें शास्त्रकारांचें मत आहे. विद्याप्रारंभाचा काळ आठवें वर्ष, तेथून बारा वर्षें विद्या संपादन करणें ह्मणजे वीस वर्षांची उमर येते. या वयांत मनुष्याच्या आं-गचे विद्या, बुद्धि, विनय, सामर्थ्य इत्यादि गुण दिसून येतात. या वयांत वराचें लग्न झाल्यास तो कसा निघेल याची चिंता ब-हुशः रहाणार नाहीं; व ज्याच्या अंगीं हे गुण नसतील त्याचा विवाह होण्यासही अडचण पडेल. गृहस्थाश्रमाविषयीं जो उत्सुक नसेल त्यास छत्तीस वर्षें विद्या संपादन करून शेवटीं ईश्वरचिंत-नांत काळ घालविण्यास शास्त्राची आज्ञा आहेच. परंतु गृहस्थाश्र-माविषयीं जो उत्सुक असेल त्याच्या डोक्यावर मात्र अतिथिपूजन, अपत्यपालन, आप्तपोषण इत्यादि कर्तव्यांचा बोजा आहे. याकरतां अंधपरंपरेच्या चाली सोडून व शास्त्रकारांचा अभिप्राय मनांत आणून वधूवर वर सांगितलेलीं गृहस्थाश्रमांतील कर्तव्यकर्मं क-रून परस्परांच्या साहाय्यानें संसारसागर तरून जाण्यास ज्या री-तीनें समर्थ होतील त्या रीतीनें विवाहसंबंध करण्यास सर्वांनीं झ-टावें हें योग्य होय.

सद्वर्तन कायम राहून संसारांत सुख होण्यास स्त्रीपुरुषांचें प्रेम असणें अवश्य आहे. विद्याशौर्यादि गुणांच्या योगानें धन व कीर्ति यांचा लाभ करून घेणें हें पुरुषाच्या करामतीवर आहे; परंतु सुखकारक गृहस्थिति राखणें हें बहुतांशीं स्त्रीच्याच स्वाधीन आहे. घरीं आल्यावर स्त्री प्रेमानें दोन शब्द बोलली ह्मणजे बा-हेर केलेले सर्व कष्ट पुरुष विसरतो. सुस्त्रीसारखा दुसरा मित्र कोण

आहे? तात्पर्य, संसारांतील सर्व सुख स्त्रीच्या चांगुलपणावर आहे. स्त्री चांगली मिळाल्यास संसारांत कितीही संकटें आलीं तरी मनुष्य त्यांतून पार पडण्याचा यत्न करील, व ती वाईट असल्यास कितीहि ऐश्वर्य असलें तरी त्यास सुख होणार नाहीं.

परमेश्वरानें स्त्रीपुरुषें उत्पन्न करून उभयतांस वेगवेगळीं कृत्यें लावून दिलीं आहेत. उभयतांनीं आपापलीं कृत्यें करून संसारास शोभा आणिली पाहिजे. त्यांस एकमेकांचीं कृत्यें करतां येणार नाहींत. त्यांचीं संसारांतील कृत्यें अगदीं भिन्न आहेत. उभयतांचें अस्तित्व स्वतंत्र असून अन्योन्यसापेक्ष आहे. उभयतांशिवाय जग चालावयाचें नाहीं. त्याचप्रमाणें उभयतांची सुधारणा झाल्याशिवाय जगांत सुधारणेचा विस्तार व्हावयाचा नाहीं.

संसारास उभयतां स्त्रीपुरुषें आवश्यक आहेत; तथापि त्यांच्या शक्तीमध्यें फार अंतर आहे. पुरुष बळकट व धीट असतो, आणि स्त्री नाजूक व भीरु असते. पुरुषामध्यें शौर्य अधिक आहे. आणि स्त्रीच्या ठायीं मार्दव अधिक आहे. शौर्यानें मोठालीं कामें होतात, परंतु संसारांतील सर्व कामांत मार्दवाची गरज लागते. खरें प्रेम व सुख हीं कोमल अंतःकरणापासून प्राप्त होतात. दोघांचेही गुण आवश्यक आहेत; पण त्यांचा विपर्यय झाला तर दोघेंही व्यर्थ होतील. धाकट्या बाजीरावासारखे भित्रे पुरुष व झांशीच्या राणीसारख्या शूर स्त्रिया कधीं कधीं होतात, परंतु वरील सामान्य नियमाचे हे अपवाद होत.

पुरुषाचे ठायीं विद्यादि बुद्धिमत्तेचे गुण पाहिजेत, व स्त्रीच्या ठायीं कोमलपणा इत्यादि अंतःकरणाचे गुण पाहिजेत. तथापि पुरुषास प्रसंगविशेषीं कोमलपणा धरिला पाहिजे, व स्त्रीसही शहाणपणानें संसार करण्यास विद्या शिकली पाहिजे. क्रूर पुरुष व मूर्ख स्त्री हीं दोघेंही भयंकर होत. याकरतां स्त्री व पुरुष या उभयतांसही नीतिशिक्षण देणें आवश्यक आहे. ज्यास लोकांची दया नाहीं असा मनुष्य व जिच्या अंगीं ज्ञान नाहीं अशी स्त्री हीं

दोन्हीही व्यर्थ होत. कित्येकांस असें वाटतें कीं, स्त्रियांस ज्ञान प्राप्त झाल्यास त्या पुरुषांची मर्यादा ठेवणार नाहींत, परंतु ही समजूत कोतेपणाची आहे. ज्ञान ही वस्तु अशी आहे तीं, तिच्या योगानें कोणाचा तोटा व्हावयाचा नाहीं. लोकसमुदाय आचारसंपन्न राहण्यास पुरुष व स्त्रिया हीं दोघेंही सुशिक्षित पाहिजेत. स्त्रीच्या हातून जी गोष्ट झाली असतां ती त्याज्य होते तीच गोष्ट उघड रीतीनें करण्यास पुरुषास मोकळीक आहे असें समजणें यासारखा मूर्खपणा दुसरा कोणताच नाहीं. स्त्रीनें दुसऱ्याबरोबर नुसतें भाषण केलें तरी ज्यांस राग येतो अशांनीं तिच्या देखत यथेच्छ दुराचरण करणें यासारखा मनुष्यत्वास अश्लाघ्य असा दुसरा पशुपणा कोणता आहे? आपण स्वतः सदाचरणानें वागणें यासारखा दुसऱ्यास सदाचरण शिकविण्याचा चांगला मार्ग कोणताच नाहीं.

कांहीं लोकांस असें वाटतें कीं, स्त्रिया ह्मणजे पशूसारख्या केवळ पुरुषाच्या सुखाकरतांच उत्पन्न केल्या आहेत. त्यामुळें ते त्यांच्या सुखाकडे तिळमात्र पहात नाहींत. वस्तुतः पुरुषासारखेंच स्त्रीचें महत्त्व आहे हें मागें सांगितलेंच आहे. मनूनें स्त्रियांची योग्यता मोठी मानिली आहेः—

**पितृभिर्भ्रातृभिश्चैताः पतिभिर्देवरैस्तथा ॥**
**पूज्या भूषयितव्याश्च बहुकल्याणमीप्सुभिः ॥ १ ॥**
**यत्र नार्यस्तु पूज्यंते रमंते तत्र देवताः**
**यत्रैतास्तु न पूज्यंते सर्वास्तत्राफलाः क्रियाः ॥ २ ॥**
**शोचंति जामयो यत्र विनश्यत्याशु तत्कुलम् ।**
**न शोचंति तु यत्रैता वर्धते तद्धि सर्वदा ॥ ३ ॥**
**जामयो यानि गेहानि शपंत्यप्रतिपूजिताः ॥**
**तानि कृत्याहतानीव विनश्यंति समंततः ॥ ४ ॥**

**तस्मादेताः सदा पूज्या भूषणाच्छादनाशनैः ॥**
**भूतिकामैर्नरैर्नित्यं सत्कारेषूत्सवेषु च ॥ ५ ॥**
**प्रजनार्थं महाभागाः पूजार्हा गृहदीप्तयः ॥**
**स्त्रियः श्रियश्च गेहेषु न विशेषोऽस्ति किंचन ॥ ६ ॥**
**अपत्यं धर्मकार्याणि शुश्रूषा रतिरुत्तमा ॥**
**दाराधीनस्तथा स्वर्गः पितॄणामात्मनश्च ह ॥ ७ ॥**

**अर्थ.**—बहुत कल्याण इच्छिणारे असे जे बाप, भाऊ, पति, दीर, यांनीं स्त्रियांचा मान राखावा; व त्यांस अलंकारभूषणें द्यावीं. जेथें स्त्रियांचा मान राहतो तेथें देव संतुष्ट होतात. जेथें स्त्रियांचा मान रहात नाहीं, तेथील सर्व क्रिया निष्फल होत. जेथें कुलस्त्रियांस दुःख होतें, तें कुल सत्वर नाश पावतें. जेथें त्यांस पीडा होत नाहीं, तेथें त्यांची सर्वदा भरभराट होते. अपमानानें असंतुष्ट होऊन कुलस्त्रिया ज्या घराण्यांचें अहित इच्छितात, तीं घराणीं अवदशा पाठीमागें लागून सर्वप्रकारें नष्ट होतात. याकरतां हितेच्छु पुरुषांनीं सणवार, लग्नकार्य, इत्यादि उत्सवांच्या वेळेस वस्त्रालंकार, उत्तम भोजन, इत्यादिकांनीं कुलस्त्रियांचा मान राखावा. चांगल्या स्त्रिया ही घराची शोभा आहे. संतति चांगली व्हावी याकरतां त्यांचा सत्कार ठेविला पाहिजे. घरामध्यें स्त्रिया आणि लक्ष्मी यांमध्यें कांहीं भेद नाहीं. संतति, धर्मकृत्य, सेवा, सुख, त्याचप्रमाणें पूर्वजांची व आपली स्वर्गप्राप्ति, स्त्रियांच्या स्वाधीन आहेत.

विवाहित स्त्रीपुरुषांनीं परस्परांस सुख होईल अशा रीतीनें वागलें पाहिजे. उभयतां मिळून संसार करावयाचा आहे, तर एकमेकांच्या दोषांकडे दुर्लक्ष केलें पाहिजे, व उभयतांची संवय, स्वभाव आणि आवड, हीं एकसारखीं ठेविलीं पाहिजेत. याशिवाय संसाराचा गाडा सुरळीत चालणार नाहीं. ह्मणूनच मनूनें त्यांचें कर्तव्य थोडक्यांत उत्तम रीतीनें सांगितलें आहेः—

**तथा नित्यं यतेयातां स्त्रीपुंसौ तु कृतक्रियौ ॥**
**यथा नाभिचरेतां तौ वियुक्ताावितरेतरम् ॥ १ ॥**

**अर्थ.**—परस्परांची फुटाफूट होऊन उभयतांस त्रास होणार नाहीं, असा विवाहित स्त्रीपुरुषांनीं सर्वदा यत्न करावा.

भरतखंडांत गार्गी, अनसूया, सीता, अरुन्धती, सावित्री, शकुंतला अशा अनेक स्त्रिया प्राचीनकाळीं कीर्तिमान् झाल्या. अर्वाचीन काळींही स्वराज्यांत अहल्याबाईसारख्या कांहीं प्रख्यात स्त्रिया झाल्या. सांप्रतकाळीं विद्या, कला इत्यादि गोष्टींमध्यें युरोपाचें पाऊल पुढें असून तेथें समाजव्यवस्थाही अगदीं वेगळी असल्यामुळें पुरुषांप्रमाणें कित्येक स्त्रियाही नामांकित होऊन गेल्या, त्यांपैकीं कांहींविषयीं येथें थोडा मजकूर लिहितों.

डिटाक्केल ह्मणून एक मोठा विद्वान् गृहस्थ फ्रान्सदेशांत असे, तो ह्मणे कीं सुस्वभाव आणि सदाचरणी स्त्री यांसारखा संसारांत मनुष्यास दुसरा कोणताच आधार नाहीं. कित्येक साधारण मनुष्य अशा स्त्रीच्या योगानें चांगले झाले आहेत. व कित्येक चांगले गृहस्थ वाईट स्त्रीच्या योगानें बिघडले आहेत. डिटाक्केल यास फारच चांगली बायको मिळाली होती. तो जसजसा जगाचा अनुभव घेत गेला तसतसें त्यास असें वाटूं लागलें कीं, मनुष्याच्या आंगचे सद्गुण आणि सदाचरण वाढण्यास गृहस्थिति चांगली असणें आवश्यक आहे. त्यानें आपणाविषयीं एके ठिकाणीं असें ह्मटलें आहे, 'मला पुष्कळ सुखकारक गोष्टी प्राप्त झाल्या, पण मनुष्याच्या सुखांपैकीं पहिलें असें जें कुटुंबसुख तें दिल्याबद्दल मी ईश्वराचे अधिक उपकार मानतों. जो आयुष्याचा काळ वाईट असें तारुण्यांत मला वाटत होतें तोच आतां मला चांगला वाटतो. सर्वस्वनाश झाला तरी आतां मला वाईट वाटणार नाहीं.'

डिटाक्केल हा मोठा निस्पृह होता. याच्या वेळेस फ्रान्सदेशांत राज्यक्रांतीची वगैरे फार गडबड होती त्यामुळें त्यावर अनेक वा-

ईट प्रसंग आले, परंतु कुटुंबांत शांति असल्यामुळें त्यानें ते स्वस्थपणें सोसले. एके समयीं त्यानें आपल्या जिवलग मित्रास पत्र लिहिलें त्यांत असें लिहिलें आहे कीं, 'ईश्वरानें मला जीं सुखें दिलीं आहेत त्या सर्वांत मेरीसारखी सुस्त्री दिली हें मोठें होय. मोठ्या संकटसमयीं तिचें किती साहाय्य होतें त्याची कल्पना देखील तुह्मांस नसेल. ती नेहमीं अगदीं सौम्य असते, तरी तिला अशा प्रसंगीं मोठें धैर्य व उत्साह प्राप्त होतात. माझ्या नकळत ती मला जपत असते. ती सांत्वन करून मला शांत करते. ज्या संकटांनीं मी घाबरून जातों त्यांत शांत राहून ती मला धैर्य देते.' दुसऱ्या एका पत्रांत त्यानें आपल्या एका सज्जन मित्रास लिहिलें आहे, 'तुमच्यासारखेंच जिचें मन चांगलें व सुशिक्षित आहे अशा स्त्रीच्या समागमांत मला पुष्कळ दिवस जें सुख झालें आहे तें वर्णितां येत नाहीं. जेव्हां एकादी गोष्ट पूर्णपणें योग्य आहे असें वाटून मी बोलतों किंवा करतों तेव्हां तिचा चेहरा लागलाच उल्हासयुक्त होतो. हें पाहून मला आनंद होतो. तसेंच जी गोष्ट वाईट असें मला वाटतें तिच्या योगानें तिचें तोंड उतरून जातें. जरी ती माझ्या धाकांत आहे तरी मला तिचा धाक वाटतो; या गोष्टीचा मला संतोष वाटतो. याप्रमाणेंच मी तिजवर प्रीति करीत असलों तर माझ्या हातून कोणतीही वाईट गोष्ट व्हावयाची नाहीं अशी माझी खात्री आहे.'

डिटाकेल याच्या निस्पृहतेमुळें त्याचें सरकारी काम सुटलें तेव्हां तो ग्रंथ लिहिण्यांत आपला काळ घालवूं लागला. फ्रान्स देशांतील राज्यक्रांतीवर त्यानें उत्तम ग्रंथ लिहिला आहे. हा त्यानें लिहिलेला शेवटला ग्रंथ होय. तो लिहित असतां त्यानें असें लिहिलें आहे, "पांच सहा तासपर्यंत लिहित बसल्यावर माझा हात चालत नाहीं. आतां मला पुष्कळ वेळ विश्रांति पाहिजे. ग्रंथाचा उपसंहार करतेवेळेस ग्रंथकारास ज्या अडचणी येतात त्या सर्वांचा विचार कराल तर तुह्मांला त्याचें आयुष्य वाईट वाटेल. बायको माझें मन शांत करून नवा उत्साह आणते ह्मणून मीं

आपला ग्रंथ चालविला आहे, नाहीं तर माझ्यानें कांहीं झालें नसतें. माझ्या उलट तिचा स्वभाव असून दोघांचें असें ऐक्य सांपडणें अशक्य. मी नेहमीं दुखण्यानें त्रासलेला व रागीट असा असतों, पण परमेश्वरानें तिचें साहाय्य दिलें आहे तें सर्वदा माझ्या उपयोगीं पडतें."

**गिझो** नांवाचा दुसरा एक महापंडित फ्रान्सदेशांत होऊन गेला. हाही राज्यकारभारांत गुंतलेला असल्यामुळें त्यावरही अनेक बिकट प्रसंग आले. तथापि त्यास कुटुंबाचें सुख चांगलें असल्यामुळें त्याचें मन संतुष्ट असे. त्यानें एके ठिकाणीं ह्मटलें आहे, 'मनुष्यानें कितीही उद्योग करून मोठालीं कामें करून जय मिळविला तरी त्याला खऱ्या प्रेमाच्या सुखाची इच्छा झाल्याशिवाय रहाणार नाहीं. ही गोष्ट मला आज वार्धक्यांत वाटते असें नाहीं. तारुण्याच्या आरंभापासून असेंच वाटत आहे. कुटुंबांतील प्रेम हेंच मोठालीं कृत्यें हातीं घेण्याचें कारण आहे. कुटुंबाचें व मित्रत्वाचें सुख नसेल तर मनुष्याची लोकांत मोठी प्रतिष्ठा झाली तरी त्यास खरें सुख होणार नाहीं.'

गिझो याच्या लग्नाची गोष्ट मोठी चमत्कारिक आहे. हा तरुणपणीं पारिस शहरीं राहून ग्रंथरचनेवर आपला निर्वाह करित असे. त्याच वेळेस पारिस शहरीं एक विद्वान् स्त्री एक वर्तमानपत्र काढित असे, तिचा याचा परिचय झाला. एके समयीं तिच्यावर मोठें संकट गुदरून ती आजारी पडली. तेव्हां आपल्या पत्राचें काम तिच्यानें चालेनासें झालें. अशा प्रसंगीं तिला एक निनांवी पत्र आलें, त्यांत असें लिहिलें होतें कीं, तुमच्या पत्रास शोभेल असा मजकूर मी पाठवीत जाईन. त्याप्रमाणें भाषा, नाटकें वगैरे विषयांवर मजकूर वेळच्या वेळेस येऊन छापत असे. पुढें ती पत्रकर्त्री दुखण्यांतून बरी झाली तेव्हां मजकूर लिहिणाऱ्यानें आपलें नांव कळविलें; तेव्हां गिझो यानें हें काम केलें असें कळून उभयतांची मैत्री झाली. पुढें त्यांचें लग्न झालें. तेव्हांपासून ती गिझो याच्या

सुखदु:खांची व श्रमांची विभागी झाली. लग्न होण्यापूर्वी त्यानें तिला विचारलें, कदाचित् पुढें जर माझी वाईट स्थिति झाली तर तुला वाईट वाटेल कीं नाहीं? त्यावर ती ह्मणाली, मी खात्रीनें सांगतें कीं तुमच्या विजयापासून मला खरोखर आनंद होईल, तथापि पराजय झाला तर मी तिळमात्र कुरकुर करणार नाहीं. पुढें गिझो हा लुईस फिलिपी याचा मुख्य प्रधान झाला, तेव्हां तिनें लिहिलें आहे, "आतां पतीची माझी भेट माझ्या इच्छेपेक्षां कमी होते तथापि अगदीं होत नाहीं असें नाहीं. जोंपर्यंत देव आह्मां उभयतांस कायम ठेवील तोंपर्यंत कितीही अडचणी व संकटें आलीं तरी मी सर्वकाळ मोठ्या सुखांत आहें असें मानीन."

इंग्लंदांतील प्रसिद्ध वक्ता एद्मंद बर्क हाही कुटुंबसुखाच्या संबंधानें मोठा दैववान् होता. त्याची स्त्री सुंदर, प्रेमळ, व सदाचरणी असे, त्यामुळें राजकीय कामाच्या संबंधानें बाहेर त्यास कितीही त्रास झाला तरी घरांत पूर्ण सुख असे. तो आपल्या गृहसुखाविषयीं असें ह्मणत असे कीं, "घरांत पाय ठेविल्याबरोबर माझ्या सर्व चिंता नष्ट होतात."



एद्मंद बर्क.

लूथर हा असें ह्मणे कीं, "सुशील व सदाचरणी बायको प्राप्त होणें हें ईश्वरापासून मनुष्यास प्राप्त होणाऱ्या सर्व सुखांत श्रेष्ठ होय. अशा स्त्रीपासून त्यास स्वास्थ्य आणि

शांति प्राप्त होईल. आपलें सर्वस्व, किंबहुना जीव आणि सुख देखील अशा स्त्रीच्या स्वाधीन करावें."

सर वुइलियम हामिल्तन ह्मणून एक मोठा तत्त्वज्ञ इंग्लंदांत होऊन गेला. हा कांहीं दिवस एडिन्बरो येथील विद्यालयांत न्यायशास्त्र व मानसशास्त्र यांचा अध्यापक होता. त्यास अत्युत्तम स्त्री मिळाली होती ह्यामुळें त्यास फार उपयोग झाला. वयाच्या छप्पन्नाव्या वर्षीं अर्धांगवायूच्या दुखण्यानें तो बेजार झाला, तेव्हांपासून त्याच्या डोळे वगैरे अवयवांचें काम बायको करूं लागली, त्यामुळें त्यानें असे उत्तम ग्रंथ लिहिले कीं त्यापासून त्याची कीर्ति सर्व युरोपखंडांत पसरली. ती त्यास दुसरे ग्रंथ वाचावयाचे असत तें वाचून दाखवी. दुसऱ्या ग्रंथांतलीं प्रमाणें काढी. त्याच्या ग्रंथांचे हस्तलेख तयार करून शुद्ध करी. जें जें काम तिच्या हातून होण्यासारखें असेल तें तें करून त्याची मेहनत कमी करी. पतीविषयीं पूर्ण प्रेम असून तिच्या मध्यें इतकें धैर्य व चातुर्य होतें कीं तिच्या साहाय्यामुळेंच त्याचे उत्तम ग्रंथ प्रसिद्ध झाले. तो मोठा बुद्धिमान् होता तरी अव्यवस्थित असे, परंतु ती त्याच्या कामाची व्यवस्था लावी. त्यास विद्येची आवड असे तरी त्याचा स्वभाव आळशी असे, पण ती मोठी उद्योगी असे. जे गुण त्यामध्यें नव्हते ते तिच्यामध्यें होते. तिच्या धैर्यानें व उद्योगानें त्याची बुद्धिमत्ता उदयास आली.

हामिल्तन यास व्याख्यानकाराची जागा मिळाली तेव्हां त्याच्यानें हें काम होणार नाहीं असें त्याची स्पर्धा करणाऱ्यांनीं भविष्य केलें होतें, परंतु तें खोटें झालें. व्याख्यानें तयार नसल्यामुळें दुसऱ्या दिवशीं जें व्याख्यान द्यावयाचें त्याचा खर्डा तो पूर्वदिवशीं तयार करी. बायको तो शुद्ध करून त्याची चांगली प्रत लिहून तयार करी. याप्रमाणें पुष्कळ दिवस चालून सर्व व्याख्यानें संपलीं, तेव्हां त्याची युरोपांतील तत्त्ववेत्त्यांत गणना झाली.

युरोपांतील जिनीवा या शहरीं ह्यूबर ह्मांवाचा एक सृष्टिशास्त्र-

वेत्ता होता, त्याच्या बायकोची गोष्ट मोठी वर्णनीय आहे. तो आपल्या वयाच्या सत्राव्या वर्षींच दोन्ही डोळ्यांनीं अंध झाला; तथापि ज्याच्या अभ्यासास दृष्टि तीक्ष्ण पाहिजे अशा सृष्टिशास्त्राच्या एका भागाचा अभ्यास त्यानें बायकोच्या दृष्टीच्या योगानें केला. दृष्टिहानीचें दुःख कमी व्हावें या हेतूनें तिनें शास्त्राभ्यास करण्यास पतीस उत्तेजन दिलें, त्यामुळें त्याचें आयुष्य सुखानें गेलें. शेवटीं तो असें ह्मणूं लागला कीं मला दृष्टि पुनः प्राप्त झाली तर मी दुःखी होईन. माझ्यासारख्या स्थितींत असलेला मनुष्य किती आवडेल हें मला कळत नाहीं. माझी बायको मला नेहमीं तरुण, अभिनव आणि सुंदर वाटते ही गोष्ट लहान नव्हे. ह्यूबर यानें 'मक्षिका' या विषयावर अत्युत्तम ग्रंथ लिहिला आहे. त्यांत मक्षिकांची उत्पत्ति व स्वभाव यांचें सूक्ष्म उत्तम निरूपण केलें आहे. हा ग्रंथ लिहिला तेव्हां दृष्टि जाऊन पंचवीस वर्षें झालीं होतीं, तरी तो वाचूं लागलें ह्मणजे असें वाटतें कीं, ज्याची दृष्टि फार तीक्ष्ण आहे अशा मनुष्यानें हा लिहिला असावा !

कित्येक स्त्रियांनीं पतींस मोठ्या संकटांतून सोडविलें आहे. ग्रोटिअस नांवाचा एक मोठा नामांकित ग्रंथकार युरोपखंडांत होऊन गेला. कांहीं दोषारोप आल्यामुळें जन्मठेपीची शिक्षा होऊन एका किल्ल्यांत सरकारानें त्यास ठेविलें होतें. तेथें त्याच्या बायकोस राहण्याची परवानगी मिळाली. यामुळें त्यास एकांतवासाचें दुःख कमी होऊन तो ग्रंथावलोकन व ग्रंथरचना यांत काळ घालवूं लागला. पतीकरतां पुस्तकें आणण्यास मात्र आठवड्यांतून दोन वेळ शहरांत जाण्याची तिला परवानगी होती. त्याप्रमाणें जाऊन ती पुस्तकें आणी व काम झालें ह्मणजे परत पाठवी. कधीं कधीं पुस्तकें फार आणावीं लागत तीं ती एका मोठ्या पेटींत घालून आणी व परत पाठवी. त्या पेटींत काय आहे याची चौकशी कांहीं दिवसपर्यंत बारिक रीतीनें पाहरेकरी करीत असत, परंतु नेहमीं तींत आर्मिनिअन व इतर पुस्तकें किंवा कापड असतें असें पाहून ते रोज चौकशी करितनासे झाले. त्यामुळें ग्रोटिअस

याच्या बायकोस नवऱ्यास बंदींतून सोडविण्याची युक्ति सुचली. एके दिवशीं पुस्तकें परत नेण्याच्या पेटींत पतीस घालून तिनें पेटी रवाना केली. पेटी नेणाऱ्या दोन मनुष्यांनीं ती पेटी उचलली तेव्हां ती त्यांस रोजच्यापेक्षां फार जड वाटली. ग्रोटिअस हा आर्मिनिया प्रांतांतला असे ह्मणून त्यास आर्मिनिअन असें ह्मणत. त्यावरून ते मनुष्य थट्टेनें ह्मणाले, यांत आर्मिनिअन तर नाहींना. यावर त्या चतुर बायकोनें लागलेंच उत्तर दिलें कीं कदाचित् आर्मिनिअन पुस्तकें असतील. याप्रमाणें पेटी शहरांत पोंहचल्यावर ग्रोटिअस सुटून फ्रान्सदेशीं निघून गेला, पुढें बायकोही तेथें जाऊन त्यास भेटली !

लार्ड बर्ले ह्मणून इंग्लंदांत एक मोठा चतुर व अनुभवी मनुष्य होऊन गेला. त्यानें लग्नाच्या संबंधानें आपल्या मुलास उपदेश केला आहे, तो ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. "जेव्हां ईश्वराच्या कृपेनें तुला संसारसुख प्राप्त होण्याची वेळ येईल तेव्हां मोठ्या हुशारीनें व दूरदृष्टीनें स्त्रीची निवड कर. कारण पुढें तुझें चांगलें किंवा वाईट होणें हें या गोष्टीवर अवलंबून आहे. ज्याप्रमाणें लढाईत एकदा चुकी झाली कीं झालीच, तिची दुरुस्ती पुनः होणें नाहीं, त्याप्रमाणें हें तुझ्या आयुष्यांतील कृत्य आहे. या गोष्टींत मनुष्य एकदा चुकला ह्मणजे संपलें. तिचा स्वभाव कसा आहे, तिच्या आईबापांची तरुणपणीं कशी वागणूक होती, याची प्रयत्नानें चौकशी कर. चांगल्या स्वभावाची असली तरी अगदीं भिकाऱ्याची मुलगी करूं नको. नुसत्या चांगल्या स्वभावानें कांहीं होत नाहीं. केवळ पैशाकरतां हलक्या कुळांतली किंवा कुरूप स्त्री वरूं नको. त्यामुळें लोकांत फजीति होईल व तुलाही तिचा वीट येईल. खुजट किंवा मूर्ख अशी स्त्री वरूं नको. स्त्री कुरूप असल्यामुळें तुझी संतति कुरूप होईल, व मूर्ख असली तर नेहमीं फजीति होईल. मूर्ख स्त्रीसारखें त्रासदायक दुसरें कांहीं नाहीं, तुझ्या अनुभवास आलें ह्मणजे तुला फार दुःख होईल."

# भाग ११.

## अनुभव.

संसारांत उपयोगीं पडण्यासारखें खरें शहाणपण शिकण्याची मुख्य शाळा अनुभव होय. ग्रंथांतरीं कितीही नीतिवचनें वाचलीं तरी प्रसंग पार पाडण्याचें शहाणपण अनुभवाशिवाय येणार नाहीं. जगांत टक्केटोणपे खाऊन खाऊन पुष्कळ दिवस चांगल्या लोकांचा सहवास घडेल तेव्हांच मनुष्याच्या अंगीं सद्वर्तन बिंबेल.

संसारांत अनेक संकटें, विघ्नें व मोहक प्रसंग आल्याशिवाय सद्वर्तनास दृढपणा येत नाहीं. एकांतवासांत वागून सद्वर्तनास पक्केपणा येणार नाहीं; व एकलकोंड्या माणसांचें सद्वर्तनही निरुपयोगी आहे. सामर्थ्याप्रमाणें श्रम करून सदाचरणानें काळ घालविणें व यथाशक्ति परोपकार करणें हें प्रत्येक मनुष्याचें काम आहे; तें जो करित नाहीं, तो जगांत असला नसला सारखाच. लोकांत वागल्याशिवाय प्रपंच व परमार्थ या दोहोंचेंही वास्तविक ज्ञान होणार नाहीं. फार काय, पण लोकांशीं वागल्याशिवाय मनुष्यास आपली योग्यता सुद्धां कळणार नाहीं. लोकांशीं वागण्याचा प्रसंग न पडल्यामुळें मनुष्य गर्विष्ठ, हट्टी, दुराग्रही असा होऊन तसाच मूर्ख राहतो.

स्वतःची खरी योग्यता समजणें हेंच जगांतील सर्वांत मोठें शहाणपण होय. यापासून मनुष्याचा मोठा फायदा आहे. हें नसल्यामुळें फार नुकसान होतें. भांडणें, कज्जे, द्वेष इत्यादि सर्व गोष्टींस स्वतःचें खरें रूप न समजणें हेंच कारण होय. स्वरूपाच्या अज्ञानामुळेंच मनुष्य भवचक्रांत पडून अनेक दुःखें भोगितो. पण तो जर मी कोण, माझी योग्यता काय, मला कोणत्या प्रकारचें वर्तन हितावह आहे, वगैरे गोष्टींचा विचार करून त्याप्रमाणें वागेल तरच संसारांतून पार पडेल. आपली योग्यता काय व आपली स्थिति कोणती, आपणास कोणतें काम करतां येईल व को-

णतें करतां येणार नाहीं, हें कळणें प्रत्येक मनुष्यास आवश्यक आहे. ज्यास अनुभवानें शहाणपणा मिळविणें असेल त्यानें नेहमीं दुसऱ्यांपासून शिकलें पाहिजे. पुष्कळ अनुभव असल्यामुळें आपल्यापेक्षां जे शहाणे झाले आहेत त्यांपासून शिकण्यांत अप्रतिष्ठा आहे असें समजूं नये. अनुभवी मनुष्याच्या सहवासापासून कांहीं तरी फायदा झाल्याशिवाय रहाणार नाहीं. अंगीं समंजसपणा येणें हें अनुभवाचें फळ होय. संसार ही अनुभव शिकण्याची शाळा होय, व त्यांतील अनेक बिकट प्रसंग हे शिक्षक होत. हे मनुष्यास धाक दाखवून उद्योग, मनोनिग्रह, विपत्कालीं धैर्य, ऐश्वर्यात क्षमा, जितेंद्रियता, परमेश्वरावर विश्वास, इत्यादि गुण शिकवितात. त्यांचें शिकविणें आपणांस कठिण वाटतें, तरी तें शिकलें पाहिजे.

अनुभवानें असें कळेल कीं, कोणतेंही मोठें कृत्य तडीस नेण्यास प्रथमतः आपल्या मनाची उत्कंठा पाहिजे, महत्कार्याच्या आरंभीं संकटें येणार नाहींत अशी गोष्ट होणेंच नाहीं. संकटांस लाथाळून पुढें सरसावेल तोच विजयी होईल. तोच उत्तम मनुष्य समजावयाचा. या अर्थानेंच भर्तृहरीनें उत्तम मनुष्यांचें लक्षण सांगितलें आहे तें असें:—

**प्रारभ्यते न खलु विघ्नभयेन नीचैः**
**प्रारभ्य विघ्नविहता विरमंति मध्याः ॥**
**विघ्नैः पुनःपुनरपि प्रतिहन्यमानाः**
**प्रारब्धमुत्तमजना न परित्यजंति ॥**

**अर्थः**—हलके लोक अडचणी येतील या भयानें कोणतेंच काम आरंभित नाहींत. मध्यम असतात ते आरंभितात पण अडचणी आल्या ह्मणजे सोडून देतात, पण उत्तम असतात ते अनेक वेळ अडचणी आल्या तरी आरंभिलेलें काम सोडित नाहींत.

कोलंबसानें नवीन महाद्वीपाचा शोध लावण्यास आरंभ




कोलंबस.

केला, तेव्हां नानाप्रकारचीं संकटें आलीं. अज्ञानी लोकांनीं हंसून त्याची टर उडविली. खलाशांनीं निराश होऊन त्यास समुद्रांत टाकण्याचा बेत केला, तथापि त्यानें धैर्य सोडिलें नाहीं. त्याचें धैर्य व पराक्रम हीं अद्वितीय होत. इतिहासांत या तोडीची दुसरी गोष्ट सांपडायाची नाहीं. घर्षणाशिवाय चंदनाचा सुगंध सुटत नाहीं, तावल्याशिवाय सुवर्णाचें उज्ज्वलरूप दिसत नाहीं, त्याचप्रमाणें संकटें प्राप्त झाल्याशिवाय सद्वर्तनाचें खरें रूप कळावयाचें नाहीं. संकटें सोसणें हा त्याच्या प्राप्तीचा अभ्यासच होय. जन्मापासून सर्व गोष्टी यथास्थित असून ज्यांनीं महत्तर कृत्यें

केलीं अशा पुरुषांचीं उदाहरणें सर्व इतिहासांत एका हाताच्या बोटांइतकीं देखील सांपडणें कठिण; परंतु पूर्वीं संकटें, विपत्ति, दारिद्र्य, यांची पीडा भोगून उदयास आलेल्या पुरुषांचीं उदाहरणें हजारों आहेत. प्रथमतःच कार्यसिद्धि झाल्यामुळें मनुष्य तेवढें काम करून आळशी होतो. परंतु वारंवार कार्यघात झाल्यानें अधिक उद्योग करून विलक्षण महत्त्वास चढतो. अशीं उदाहरणें इतिहासांत पुष्कळ आहेत. खऱ्या पराक्रमाच्या बीजावर पराजयाचें दडपण पडलें तरी त्यास पुनः पुनः धैर्याचें पाणी मिळालें तर अंकुर आल्याशिवाय राहणार नाहीं.

ज्याप्रमाणें कित्येक ठिकाणीं जमीन भाजली असतांच अंकुर जोरदार येतो त्याप्रमाणें कित्येक वेळां संकटेंच मनुष्याच्या हातून महत्कृत्यें करविण्यास कारण होतात. बाळाजी विश्वनाथास रोजगाराकरतां बाहेर जावें लागलें नसतें तर त्याच्या हातून मोठे पराक्रम झाले नसते. रामा शागीर्दास यजमान बोलला नसता तर काशीस जाऊन अध्ययन करण्याची बुद्धि त्यास झाली नसती. रघुनाथशास्त्री पर्वते यांस दुर्दैवानें कारागृहवास प्राप्त झाला नसता तर कदाचित् त्यांच्या हातून मराठी भाषेंत भाषाविवृत्तीसारखा मराठींत उत्तम ग्रंथ लिहिण्याचा उद्योग झाला नसता. इंग्लंदांतील प्रसिद्ध ग्रंथकार जान्सन, गोल्दस्मिथ, राले, बनियन, यांवर दारिद्र्य, कारागृहवास अशीं महासंकटें आलीं तींच त्यांच्या कीर्तीस कारण झालीं.

इंग्लंदांतील माजी मुख्य प्रधान डिझरायली यांविषयीं लिहिलेली एक गोष्ट मोठी चमत्कारिक आहे. पहिल्यानें त्यांनीं पार्लमेंत सभेंत भाषण केलें तेव्हां त्यांस बोलतां आलें नाहीं, त्यामुळें ते खालीं बसले. त्या वेळेस लोक त्यांस हंसूं लागले, तेव्हां त्यांनीं सांगितलें कीं आज तुह्मी माझें भाषण ऐकत नाहीं, पण मी तुह्मांकडून कधीं तरी तें ऐकवीन. नंतर त्यांनीं असा उद्योग केला कीं, सर्व इंग्लंदांत उत्तम वक्ते होऊन हे पुष्कळ वर्षें मुख्य प्रधान होते.

उद्योग करणें एवढेंच मनुष्याचें काम आहे. उद्योगापासून सर्वांस सारखाच विजय मिळेल असें नाहीं. एकंदरी पाहिली तर जयापेक्षां पराजय फार. तथापि एवढें खरें आहे कीं, जय होणें असला तर उद्योगानेंच होईल, आळसानें कधींही होणार नाहीं. जगांत सुखी किंवा दुःखी रहाणें हें आपल्या मनावर आहे. मन संतुष्ट ठेविलें तर सर्वत्र सुख आहे; असंतुष्ट असलें तर सर्व दुःखच आहे. सज्जनांस दुःख, दुर्जनांस सुख, अशा चमत्कारिक गोष्टी जगांत पुष्कळ आहेत, त्यांचा पूर्वापरसंबंध आपणास कळत नाहीं. याकरतां परमेश्वरावर भरंवसा ठेऊन सद्वर्तनानें चालावें एवढेंच आपलें कर्तव्य आहे. हें केल्यावर कोणाचें भय नाहीं. यासाठींच शास्त्रकारानें ह्मटलें आहे, "जर तूं मनोदेवतेस भीत नसशील ह्मणजे जें वाईट आहे; असें कृत्य केलें नसशील तर तुला तीर्थयात्रेस जाण्याचें कारण नाहीं." स्त्रीपुत्रादि विषय केवळ जडदेहास सुख देणारे आहेत; याकरतांच मनूनें ह्मटलें आहे—

**नामुत्र हि सहायार्थं पिता माता च तिष्ठतः ॥**
**न पुत्रदारा न ज्ञातिर्धर्मस्तिष्ठति केवलः ॥ १ ॥**
**तस्माद्धर्मं साहायार्थं नित्यं संचिनुयाच्छनैः ॥**
**धर्मेण हि सहायेन तमस्तरति दुस्तरम् ॥ २ ॥**

**अर्थ**—परलोकीं साहाय्य करण्यास आई, बाप, पुत्र, भार्या, भाऊबंद हीं येत नाहींत; धर्म मात्र उपयोगीं पडतो. यासाठीं परलोकीं साहाय्य व्हावें ह्मणून नेहमीं हळहळ धर्मसंचय करावा. धर्माच्या साहाय्यानें दुस्तर अशा संसारदुःखांतून मनुष्य पार पडतो.

जसा निश्चिंत मनुष्य दिनचर्या आटोपल्यावर स्वस्थ निजतो, त्याप्रमाणें जो महात्मा कामादि मोहक शत्रूंचा विवेकशौर्यानें पराभव करून सद्वर्तनयुक्त राहील तो महानिद्राकालीं स्वस्थचि-

त्यानें परमेश्वरस्मरण करीत जडदेहाचा त्याग करून परमात्मसान्निध्य पावेल. हेंच परमेश्वरानें गीतेंत अर्जुनास सांगितलें आहे.

**अंतकाले च मामेव स्मरन् मुक्त्वा कलेवरम् ।**
**यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः ॥**






